# गोंडवनांतील प्रियंवदा

आणि

# घरकुट्टे घराण्याचा इतिहास.

लेखक

डॉ० श्रीधर व्यंकटेश केतकर,

एम्. ए., पीएच्. डी.

आवृत्ति १ली १९२६
पुनर्मुद्रण १९५५

मूल्य
रु. ३/४/-

प्रकाशिका :
सौ. वीरा शर्मा
१६३ हिंदू कॉलनी,
दादर, मुम्बअी–१४.

मुद्रक :
क्षितीश आणि अशोक जठार
कर्नाटक प्रिंटिंग वर्क्स,
धारवाड.

# प्र स्ता व ना

कादंबरीच्या लेखकाचे नांव गूढ ठेवावें कां स्पष्टपणें पुढे मांडावें यासंबंधानें विचार करून असें ठरविलें कीं कर्त्याच्या नावासंबंधानें अधिक दिवस गुप्तता राखणें अनवश्य आहे. गुप्तता राखण्याचा मुख्य हेतु एवढाच कीं कर्त्याच्या नांवामुळें वाचकवर्गाचें मत ठरूं नये. विद्यासेवकाच्या संपादकास कादंबरीच्या स्तुतिपर जीं अनेकाकडून पत्रें आलीं त्यावरून बऱ्याच व्यक्तींचे स्वतंत्र मत व्यक्त झालेंच आहे.

ही कादंबरी लिहिण्यास प्रवृत्ति कशी झाली हें थोडक्यात सांगतों. उमरावतीचे सुप्रसिद्ध कादंबरीकार रा. बाळकृष्ण संतुराम गडकरी हे माझे लहान वयापासून स्नेही आहेत. यानीं मी लिहिलेल्या एक दोन गोष्टी पाहून माझी परीक्षा केली आणि सरळपणें मला सांगितलें कीं " तुम्हीं पाहिजे तर निबंध लिहावेत पण कादंबरीच्या भानगडींत पडूं नये." ज्ञानकोशाची योजना त्यांस जेव्हा कळली तेव्हा तुम्हीं आपल्या योग्य व्यवसाय घेतलात असें ते म्हणाले. बोलण्यात खोच अशी कीं, जे कादंबरी लिहावयास लायख नाहींत त्यानीं निबंध लिहावेत किंवा वाटल्यास किंवा झेपल्यास ज्ञानकोशहि लिहावा. नागपूर येथें १९१६ च्या उन्हाळयात वाकर रोडवर ऑफिस होतें आणि मे महिन्याच्या शेवटीं कंपनी रजिस्टर करण्यासाटीं कागद पाठविले होते. ८ जुलै पर्यंत कंपनी रजिस्टर झाली नाही. तोपर्यंत, म्हणजे सबंध जून महिना रिकामा होतो; बसलो काहीतरी लिहीत. त्या काळात लिहिलेले काहीं लेख ज्ञान-कोशालाहि अंशतः उपयोगी पडले. पण त्या वेळेस जें आणखी काहीं लिहिले, तेंच " गोंडवनांतील प्रियंवदेचें चरित्र " होय. त्यावेळेस २०।२१ प्रकरणें लिहिलीं होतीं. व कादंबरी अपूर्ण स्थितींत नऊ दहा वर्षें पडली होती. पूर्वीच्या कादंबरींतलीं अलीकडे चार प्रकरणें फाडून टाकली. पहिलीं सोळा प्रकरणें जुनीं लिहिलेलीं आहेत. पुढचीं नवीन आहेत.

या कादंबरींत कांहीं कालविपर्यासाचे दोष राहून गेले आहेत. १८९३|९४ सालीं रामभाऊ एफ. ए. नापास होऊन कादंबरीच्या कथानकास प्रारंभ होतो. व १८९७/९८ सालीं तो विलायतेहून परत येतो, असें असतां आयडाचा जन्मकाल त्याला अनुसरून नाहीं, कायसरेहिंद पदक मिळवावें म्हणून अनंतराव मुलीला सांगतो तें त्यावेळीं बाजारांत आलें नव्हतें. हे दोष सहज दूर करतां आलें असते.

*श्री. व्यं. केतकर*

---

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक दोन शब्द

ज्ञानकोशकर्ते डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर याची ही पहिली कादंबरी. ही कादंबरी, तत्कालीन कादंबरीतील दुबळेपणा दूर करून, नवें, अधिक सकस, अधिक रमणीय ललित लेखन आपण लिहूं शकूं अशा आत्मविश्वासानें लिहिली गेली. या विश्वासाची सूचक प्रस्तावना डॉ. केतकर यानीं स्वतःच लिहिली आहे.

डॉ. केतकर यानी जें कादंबरी लेखन यानंतर केलें, त्या लेखनानें आजच्या प्रथितयश कादंबरीकारात त्यानीं स्वतःसाठीं बहुमानाचें स्थानहि निर्माण करून ठेविलें असल्यामुळें त्याचा आत्मविश्वास अकारण नव्हता हें स्पष्ट झालें आहे. परंतु अजूनहि डॉ. श्री. व्यं. केतकर याच्या कादंबऱ्या ह्या कादंबऱ्याच नव्हत ; ओबडधोबड भाषेंत, विस्कळित कंटाळवाण्या चर्चोचें लेखन त्यानीं केले असें लिहिणाऱ्या टीकाकाराचा, पदवीधराचा वर्ग आपली अडाणी लेखणी दुराग्रहानें चालवीत आहे. लोकरंजनाबद्दलच्या कोत्या दृष्टीमुळें असे हल्ले होतात. म्हणूनच लेखकाची भूमिका सर्व साधारण वाचकास समजण्यासाठीं हे दोन शब्द लिहिणें अवश्य वाटत आहे.

'गोंडवनातील प्रियंवदा' ही कादंबरी लिहिण्यास १९१६ सालीं सुरवात झाली व ती नंतर दहा वर्षोनीं डॉ. केतकर यांनी प्रसिद्ध केली. दहा वर्षें भिजत पडलेली ही कथा अजूनहि वाचनीय आहे असें कायम स्वरूपाचें लालित्य कथेंत असल्याबद्दल डॉ. केतकराची खात्री होती. अभिजात वाङ्मयाची तीं एक कसोटी आहे. अभिजात वाङ्मयांतील गोडी शाश्वत टिकाऊ असते.

वास्तविक ललितकृतींतील विषय तात्कालिक वस्तुनिष्ठ वर्णनात्मक असेल तर त्या त्या परिस्थितीबद्दलचें अगत्य संपताच या वाङ्मयातील रस आटून गेला असता. केवळ विशेष काळच्या सामाजिक स्थितीचें वाङ्मयांत नमूद झालेलें

ऐतिहासिक स्वरूप एवढेंच या कादंबरीचें महत्त्व नसून एका ज्या प्रथेचे कादंबरीकार म्हणून डॉ. केतकर यार्नी महत्त्वाची कामगिरी केली तिची सुरवात म्हणूनच या कादंबरीचें महत्त्व आहे.

१९१२ सालच्या अखेरीस डॉ. केतकर परदेशाहून स्वदेशास परत आले. या देशाच्याहि सर्व भागात राहून १९१६ च्या सुमारास 'मराठी ज्ञानकोश' लिहिण्याचें स्वतःचें कार्यक्षेत्र त्यांनीं निश्चित केलें. एवढी मोठी जोखीम शिरावर घेण्याइतकें शिक्षण व अनुभव त्यांनीं संपादन केला होता. त्यांनीं युरोप अमेरिकेंतील वास्तव्यांत एक नवें विश्व पाहिलें व नवी चिकित्सक शास्त्रीय दृष्टीहि संपादन केली होती. या नव्या दृष्टीनें ते भारतीय समाजाचें निरीक्षण सतत करीत होते. करमणूकीसाठीं स्थानिक वाङ्मय वाचलें तरी तेहि याच नव्या दृष्टीनें. भोवतालचें जीवन आणि वाङ्मय तपाशीत असता प्रगमनशील शक्ति कोणत्या, यातील शास्त्रशुद्ध भाग किती, त्यांत अज्ञानमूलक गैरसमज प्रगतीला विरोधक होत असले तर त्या दोघाची आपल्या लोकास जाणीव करून द्यावी, जीवनाबद्दलची आसक्ति व जोम वाढवावा अशा इच्छेनें, आतरिक तळमळीनें डॉ. केतकर प्रत्येक शब्द लिहीत.

सर्व क्षेत्रात एकप्रकारचें परावलंबी, इंग्रजी राजसत्तेच्या बऱ्या वाईट गुणाचें प्रतिबिंब उमटलेलें त्याना दिसे. सरकारी नोकर केवळ स्वत:चे हितसंबंध व प्रतिष्ठा वाढविण्यांत दंग, राजकारणी व समाजकारणी नेते स्थानिक परिस्थिति-बद्दल अनभिज्ञ व परदेशी लोकाच्या तंत्रानें वागण्यात कृतार्थता मानणारे; व्यापारी व कारखानदार या सर्वांची ही एकच गत होती.

ललित वाङ्मयाचीहि हीच स्थिति असल्याचें डॉक्टरना तीव्रत्वानें जाणवत होतें. आजच्या जमान्यांतला लेखक ललित लेखन करीत असताना स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव वाचकाला होऊं देत नाहीं. कथेंतील व्यक्ति व त्या कथेंतील घटनाचें वर्णन वाचणारा वाचक लेखकाला विसरला तरच स्वतःला विसरून कथेशीं समरस होऊं शकतो. डॉ. केतकर प्रथमच कादंबरी लिहीत असल्यामुळें त्यांनीं हें तांत्रिक अवधान पाळलें नाहीं.

प. वा. हरिभाऊ आपटे याच्या कादंबरींतील एक सुधारक ‘ गणपतराव ’ यांचें एक मत डॉक्टर केतकरनां आवडलें नाहीं. त्यानीं प्रियंवदेच्या पहिल्याच प्रकरणात ‘ गद्धे गणपतराव ’ असा उल्लेख केला. किती शिकलेल्या मुलीचें किती शिकलेल्या पुरुषाशी लग्न व्हावें याचे गणीत महाराष्ट्रांतील सुधारक नेत्यांस समजलें नाहीं; समाजाला विवाह संस्थेचे कार्य व उदिष्ट समजले नाहीं — तें शिकविणारे डॉ. केतकर स्वतःचा उद्वेग झाकूं शकले नाहींत. समाजशास्त्री व ललित लेखक यातील अंतर त्यानीं नंतरच्या कादंबऱ्यात पाळलें. विचारानें अतिशय आधुनिक असलेले डॉ. केतकर कथा–निवेदनातील अतिशय जुनें सूत शौनकादि ऋषीचे तंत्र अवलंबिते झाले. कथन करणारानें स्वत:ची पसंति नापसंति ही वाचकाच्या लक्षात आणून द्यावयाची, पण ती अप्रत्यक्षपणें, सूचकतेनें — पण डॉ. केतकर हे स्वभावतः जसे कमालीचे सौजन्यशील तसेच प्रामाणिक मताबद्दल आडदाड होते. ( आडदाड हा शब्द कोणी अशिष्ट मानील पण त्या शब्दानेंच डॉक्टर केतकरांची लढाऊवृत्ति यथार्थतेनें व्यक्त होते. ) त्यांना समाज सुधारक वर्ग अडाणी वाटे; याचे कारण हिंदी समाजधूरिणापैकी फारच थोड्या लोकांनीं आधुनिक व पौराणिक या दोन्हीं समाजशास्त्राचा अभ्यास केला होता, व तोहि डॉ. केतकराच्या ज्ञानाच्या पासंगासहि पुरण्याइतका नव्हता. संस्कृत अभिजात वाङ्मयांतील रसरशीत ‘ रस ’ न चाखल्यामुळें नवशिक्षित कादंबरी लेखक ‘ प्रेम ’ वगैरे विषय हाताळताना निर्जीव भासतात असाहि अभिप्राय डॉ. केतकरानीं त्याच प्रकरणांत व्यक्त केला आहे. ‘ अर्वाचीन कादंबऱ्यांतील आणि गोष्टींतील नवऱ्याला चहा पाजण्यांतच केवळ रोमान्स मानणाऱ्या मुंबईच्या किचकट आणि स्वतः चहा पिऊन दुर्बल झालेल्या कादंबरीकारांच्या डोक्यांतून निघालेल्या नायिकांप्रमाणें ही प्रियंवदा नव्हती.” स्वतःची रगेल व रंगेल वृत्ति झाकून न ठेवितां एखाद्या ‘ पठ्ठे बापूरावाच्या ’ अभिनिवेषानें डॉ. केतकर ‘ नव नवतीचा श्रृंगाररस ’ वाचकांस पाजीत आहेत. या करामतींत डॉ. केतकरांचा इरसाल निस्पृह रसिक स्वभाव व भारतीय संस्कृतींत पुरेपूर रमलेली वृत्ति व्यक्त झाली आहे. ‘ जगन्नाथरायाच्या. श्रृंगारविलासांतील अगर भर्तृहरीच्या श्रृंगारशतकांतील मौजेचे श्लोक घेऊन त्यांचा अर्थ ’ निःशंक

मनानें नवऱ्यास विचारणारी डॉ. केतकरांची प्रियंवदा म्हणजे डॉ. केतकरांनीं दुबळया वृत्तीच्या मराठी कादंबरीकारांस करून दाखविलेले रंगेल प्रात्यक्षिकच होय. कलावन्ताना तंत्र अभ्यासताना उस्ताद प्रात्यक्षिकरूपाने शिकवितो — तोच प्रकार डॉ. केतकरांनीं 'गोंडवनांतील प्रियंवदा' लिहिताना अरंभिला होता. जयदेव कवींच्या गीतगोविंदाचा उतारा देताना नागपुरी संऱ्यांचीं साले नवऱ्यास फेकून मारणारी डॉ. केतकरांची नायिका ही अधिक रसरशीत व सजीव भासते. 'एकच प्याल्यां'त आधुनिक सुशिक्षित हा सामान्यतः भीरु नेभळट आहे असें राम गणेश गडकरी यांनींहि रामलाल व भगीरथ या पात्राच्या रूपानें दर्शविलें आहे. तळीराम व सुधाकरासारख्या तुफानी भूमिकाच्यासमोर ही सुशिक्षित माणसें दुबळी, हतबुद्ध भासतात. पण कोणतेंहि पात्र दुबळे असण्यापेक्षां मराठी ललित लेखकच रामलाल व भगीरथा च्या वर्गातले आहेत असें डॉक्टर केतकरांना सुचवायचें आहे व हेंच मराठी ललित वाङ्मयाचें दूषण दाखवून तें दूर करायचे मार्ग डॉ. केतकर स्वतः उदाहरण घालून दाखवीत आहेत.

ललितकथेचा संसार आत्मप्रत्ययानें समाजाच्या वस्तुनिष्ठ पहाणींवर आधारलेला असावा. ही पहाणी शक्य तों बदल न करून वाचकांस सादर करावी व मग स्वतःचा अभिप्राय सूचित करावा असें तंत्र डॉ. केतकर यानीं 'प्रियंवदे'च्या कथनांत प्रस्थापित केलें आहे. मराठी कादंबरी व कथालेखक वस्तुनिष्ठ परीक्षण करूनच कादंबऱ्या लिहीत असतां डॉक्टर केतकरांनीं यांत नवीन काय सांगितलें असा प्रश्न स्वाभाविकच उद्‌भवतो. पण 'प्रियंवदे'चें अंतरंग नीट अभ्यासलें तर या प्रश्नाचें बिनतोड उत्तर वाचकांस मिळतें.

डॉ. केतकरांच्या कादंबरीचें क्षेत्र भरपूर ऐसपैस आहे. एखादी व्यक्ति मुख्य व तिच्या अंतःकणांतील छोट्यामोठ्या हालचालीचें विश्लेषण येथें महत्त्वाचें नाहीं. चार चौघींच्या जीवनांत प्रणय व विवाह या विषयाची वैचित्र्यपूर्ण हकीगत पाहून त्यांनीं स्वतःच्या समाजशास्त्रीय दृष्टीनें प्रत्येक विवाहांतील आर्थिक अनुकूलतेची बाजू पूर्णपणें वाचकाच्या लक्षांत आणून दिली आहे. सरकारी

नोकर, गिरणीचे चालक, कथेकरी, पुराणीक, इतिहास संशोधक वगैरे भिन्न-क्षेत्रांतल्या व्यक्तींच्या जीवनांचे वैचित्र्यपूर्ण वळण, उपजीविकेचें साधन संपादण्याच्या प्रत्येकाच्या भिन्न परिस्थितीनें निर्माण होतें. ही अर्थव्यवस्था सर्व मनांची घडण बनविण्यांत, निदान प्रत्येक नीति बनविण्यास कारण होत आहे, ही गोष्ट डॉ. केतकरांनीं या कादंबरींत ठळकपणें दर्शविली आहे. अगदीं सूत शौनकादि ऋषींच्या प्राचीन लकबीनें कथा सांगणाऱ्या लेखकाचा अतिशय आधुनिक दृष्टिकोन या अर्थप्रधान समाजविचाराच्या रूपानें मराठींत प्रथमच अवतरलेला दिसतो. सामाजिक प्रतिष्ठेच्या नीतिमत्तेच्या कल्पना हें केवळ आर्थिक परिस्थितीचें प्रतिबिंब असतें व या व्यवस्थेचें मूळ समजेल त्याला सामाजिक मन व सामाजिक समस्यांचे सत्यस्वरूप समजेल ही डॉ. केतकराच्या कादंबरी वाङ्मयाची शिकवण व विशिष्ट दृष्टि आहे.

" तुझ्यासारख्या हिंदुस्थानांत जन्म झालेल्या मनुष्यास जर हिंदुस्थानांतील सामाजिक स्थिति लक्षात घेऊन विचार करतां येत नाहीं "..." बाबारे, खरें प्रेम व खोटें प्रेम असें वर्गीकरण एखाद्या विशेष काळाच्या परिस्थितीसंबंधाने मात्र म्हणतां येईल "...." खरें प्रेम असले म्हणजे तें चिरकाल टिकेल असें थोडेच आहे ! "

कादंबरीच्या पात्रांच्या संवादांतील अशी थोडीशीं जरी वाक्यें चाळलीं तरी कादंबरीकार भावनेच्या उन्मादापेक्षां थंड युक्तिवादावर अधिक भर देत आहे हें स्पष्ट दिसतें. क्षणिक उन्माद व विवाहाची चिर अवस्था यांतील फरक चिकित्सापूर्वक वाचकाच्या गळीं उतरेल असा अभ्यासू प्रयत्न डॉक्टरनीं कादंबरी लेखनांत केल्याचें पदोपदीं दिसतें.

प्रीतिविवाहाची कथा नीट समजायला, प्रियाराधन, सामाजिक जीवन व पुढच्या पिढीची तरतूद या सर्व अवस्थांचें सत्य स्वरूप समजले पाहिजे. प्रेम ही वैयक्तिक व नैसर्गिक अवस्था असली तरी विवाह ही समाजिक घटना आहे व सामाजिक घटनेत मुलाबाळांची सांस्कृतिक व आर्थिक सुरक्षा महत्वाची आहे हें सारें गणित अनेक उदाहरणांनीं डॉक्टरनीं आपल्या अनेक कादंबऱ्यांतून पुनः

पुनः सोडविलें आहे. प्रत्येक व्यक्तीची कथा स्वतंत्र मनोरम आणि वेगळ्याच प्रकारची चित्रिण्यांत डॉक्टरांचा हातखंडा आहे. संस्कृत कवींची रसज्ञता आणि युरोपियन समाजाचा व संस्कृतीचा दृढपरिचय; शिवाय या दोहोंच्या भरीला सामाजिक घटनांचें शास्त्रीय दृष्टीनें पृथक्करण करून पहाण्याची संवय व शिक्षण असतांहि माणुसजातीवर व जीवनावर सखोल प्रेम या गुणांनीं हा जीवनाचा टीकाकार कमालीचा रसाळ बनला आहे. पांडित्य आणि कवित्व यांचा विरोध असल्याबद्दल एक प्रवाद वारंवार ऐकू येतो. पण अभिनव साहसपूर्ण जीवन, जातिवंत रसिकवृत्ति यांनीं हे शास्त्रीबोवा कमालीचे आकर्षक लेखक बनले आहेत. या चिकित्सक वृत्तीच्या शास्त्री माणसाला ललित लेखन साधणार नाहीं असा गैरसमज डॉ. केतकरांच्या मित्रवर्गांतहि दिसून आला तर तो पहिल्याच कादंबरीनें कायमचा पुसून जावा इतकें लालित्य या कादंबरींत पुरेपूर भरून ओसंडून जात आहे.

प्रियंवदेचें स्वभावलेखन, तिचीं नवऱ्याला लिहिलेलीं पत्रें, हरिभय्या-बिंबा प्रणय, शारदा-वैजनाथ शास्त्री यांच्या प्रणयांतील संयम, हें सारें विविध खाद्य पुरविणारा कारागीर किती बहुश्रुत, किती अभ्यासी, किती रसिक आहे हें पाहून वाचक आश्चर्यचकित होतो.

या पहिल्या कादंबरींत डॉक्टर केतकरांनीं ज्या एका विषयावर विशेष जोर दिला आहे तो इंग्रजांबद्दलची हिंदी लोकांच्या मनांत अकारण आदरबुद्धि व अनुकरण बुद्धि असेल ती नष्ट करून टाकण्यावर. डॉक्टर केतकरांना युरोपियन समाजांतील सद्‌गुण भरपूर प्रमाणांत ठाऊक होते. त्यांच्या जीवनांत, विद्येंत वा कलेंत जें जें उदात्त व स्वीकरणीय असेल त्याबद्दल योग्य आदर व प्रेम बाळगूनहि हिंदी नवसुशिक्षितातील न्यूनगंड नाहींसा करण्याची जरूरी त्यांना तीव्रतेनें भासत आहे असें 'प्रियंवदे'त पदोपदीं दिसतें. हिंदी सुधारक वर्गांतील सर्व वैगुण्य या न्यूनगंडानें निर्माण होत आहे असें डॉक्टर केतकरांनीं 'प्रियंवदे'त अनेक प्रकारें सुचविलें आहे. इंग्रजी समाजाचें स्त्रीदाक्षिण्य, इंग्रज स्त्रीचा हिंदी सुशिक्षिताशीं विवाह हे विषय 'प्रियंवदा' लिहिली त्या काळीं समाजाच्या नित्य चर्चेचे विषय होते. उच्च शिक्षणासाठीं परदेशांत जावें व विवाहित अथवा अविवाहितानीं

परदेशी स्त्रीशीं लग्न करून यावें हें अनेकदां घडे व या मिश्र विवाहांतून पुढें काय प्रमेयें निर्माण होतात हाहि काळजीचा विषय अनेक कुटुंबांत झाला होता.

वस्तुस्थितीच्या पहाणीपेक्षा सौंदर्यपूजा व त्यांतूनच उद्भवलेला ध्येयवादहि प. वा. हरिभाऊंच्या 'मी' या कादंबरीनें एक आदर्श म्हणून निर्माण करून ठेविला होता. लोककल्याणासाठीं अथवा कांहीं उदात्त कार्यासाठीं आजन्म अविवाहित रहाणें, देहदंड सोसणें, 'स्वदेशी' व्रत आचरण्यासाठीं 'साखर' (तेव्हा ती बहुशः परदेशी असे) टाकणें वगैरे स्वार्थत्यागाचे अनेक प्रकार समाज चिकित्साशून्य आदरानें स्वीकारीत होता.

डॉ. केतकरांनीं समाजिक मनाचा हा नाजुक भाग 'प्रियंवदे'त इतक्या हळुवारपणें चिकित्साविषय बनविला आहे कीं, डॉ. केतकर हे ललित लेखनांतील कसबी कारागीर असल्याचें सहजच मनाला पटतें. शारदा व वैजनाथशास्त्री यांचे या विषयींचे संवाद म्हणजे हळुवार हातानें मराठी मनांतील या नाजूक भागाची शस्त्रक्रियाच होय. मिळमिळीत मोघमपणाकडून खणखणीत व्यक्त निश्चित ध्येय व ध्येयमार्गाकडे समाजांतल्या ज्ञात्यानांहि खेचले पाहिजे ही शारदाबाईची जाणीव आणि वैजनाथशास्त्रींनीं पुरुषप्रकृतीच्या तात्विक चर्चेपासून कोंकणस्थ ब्राह्मणाची स्वराज्यविषयक पोटतिडीक या विषयींच्या संवादात एक नवा खेळाडूपणा निर्माण केला आहे. एकाद्या व्यक्तीच्या व समाजाच्या भावना दुखावतील म्हणून सत्यचिकित्सा टाळण्यापेक्षां त्या भावुकतेच्या चटणीनें चर्चेची मेजवानी सजवण्याचें वैजनाथशास्त्र्यांचें तंत्र चिंतनीय वाटतें. कादंबरीसारख्या विस्तृत वाङ्मयांत तात्त्विक चर्चेचा वेदात अनातोल फ्रान्स, टॉल्स्टॉय, शॉ वगैरे अनेक युरोपियन लेखकांनीं रूढ करून टाकला आहे. तशाच मनोभूमिकेवरून डॉ. केतकरांनीं 'प्रियंवदे'चे लेखन केले आहे. समाजात बौद्धिक पातळीचें व शिक्षणाचें जेवढे थर असतील त्या सर्व श्रेणींच्या व्यक्ति कथा विषय होऊं शकतात व त्या त्या जीवनाच्या दर्जाची चर्चा प्रसंगशः कादंबरीत निर्माण होऊं शकते.

मी या असल्या विषयांची येथें मुद्दामच चर्चा करीत आहे. सामान्य कथावाचक व लेखक यांजमध्यें वितुष्ट निर्माण करण्याचें उपन्याप असमंजस

टीकाकार अनेकदां करतात ; त्यांचे अप्रबुद्ध टीकालेख वाचून वाचक पूर्वग्रह-दूषित बनतो व वाचनांतील आनंदांत हानी होते. ही आपत्ति टळावी आणि वाचकाची मनोभूमिका पुस्तकांतील रसग्रहणास उत्सुक, पूर्वग्रहरहित आणि खेळीमेळीची व्हावी हा हेतु या प्रास्ताविक चार शब्दांचा आहे.

डॉ. केतकरांनीं ‘गोंडवनांतील प्रियंवदें’तला बराचसा भाग ‘विद्यासेवक’ पत्र चालवितानां लिहिला. ज्ञानकोशाच्या लेखनाच्या निमित्ताने अनेक संशोधक, अनेक विद्वान डॉक्टरांच्या नित्य संबंधांत येत. ‘विद्यासेवकां’तील बहुतेक लेखन हें ज्या पातळीवरच्या वाचकास उद्देशून असे त्याच पातळीवरील वाचकास रम्य वाटेल अशा पद्धतीने ही कादंबरी लिहिली गेली. लो. टिळकांच्या पिढींतील ध्येयवाद व आचार यांचें परीक्षण या काळीं समाजानें अंतर्मुख होऊन करावें हा आशय या कादंबरींत कांहीसा अप्रत्यक्षपणें येतो. स्त्रीच्या जीवनाची समाजशास्त्रीय दृष्टीनें पुनर्रचना व्हावी, स्त्रीच्या हिताच्या दृष्टीनें विवाह व्हावेत, ‘स्त्रिया म्हणजेच राष्ट्र’ हे विचार ‘प्रियंवदें’त व्यक्त झाले त्यांचीच परिणति ‘ब्राह्मणकन्यें’त ‘स्त्रीसत्ताक’ समाजाची आवश्यकता या विचारांत झाली आहे. समाजांत निराधारपणें, हताशपणें जीवित व्यतीत करणाऱ्या वैजनाथशास्त्रीं-सारख्या जीवनांतील सुखांची, आशांची ओसाडी भयावह वाटते. जीवन-वैफल्यानें या प्रचंड प्रयत्नवादी माणसाचें मनहि विकृत तर होत नाही ना असें त्याचीं मतें वाचून वाटतें. पण लौकिक जीवनांतील तकलादिपणाबद्दलचा वैज-नाथशास्त्रींचा आतताई वैताग बराचसा वस्तुस्थितीवर आधारलेला असल्याचीहि वाचकास जाणीव होते.

या पहिल्या कादंबरींत डॉ. केतकर हे स्वतःच ‘सदाशिवपेठी’ बनले आहेत. सुसंस्कृत महाराष्ट्रीयांच्या कल्पना सदाशिव पेठेच्या संकुचित क्षेत्रात जन्मलेल्या व पोसलेल्या आहेत; या कोत्या भूमिकेवरून अधिक व्यापक क्षेत्रात मराठी सुसंस्कृतांनें मन नेलें पाहिजे हा आक्षेप घेणारे डॉ. केतकर ‘सदाशिव पेठी’ संस्कृतीचा रसाळ हृदयंगम भाग ‘गोंडवनांतील प्रियंवदेत’ वर्णन करीत आहेत. मराठी भाषिक जेथें जेथें रहातात तेथें तेथें ही ‘सदाशिवपेठी’ वृत्तिहि आहे. गोंडवनांतील या सदाशिवपेठी भागाच्या जीवनाचीच ही

कादंबरी आहे. शिकणें, विलायतेस जाणें, ध्येयवादी 'राष्ट्रीय' वृत्तीचें असणें, पुस्तकनिष्ठ जीवन जगणें वगैरे सर्व बरे वाईट 'सदाशिव पेठी' गुण हाच या कादंबरीचा कथाभाग आहे. मार्मिक विनोदी खोडकर वृत्तीनें, रगेल रंगेल मनोवस्थेंत लिहिलेली 'गोंडवनातील प्रियंवदा' ही श्रृंगार प्रधान कादंबरी आहे. लेखकाचें लग्नविषयक विचार ताजे गरम गरम असतांनाच ही कादंबरी लिहिली गेली. नूतन विवाहिताचे तत्कालिन समाजाच्या स्थितींत स्थान काय ? कार्यक्षेत्र कोणते, ध्येयवाद योग्य पद्धतीने कसा समजून घ्यावा असे अनेक विचार मनांत दुर्दम्य स्वरूपात उसळत असतां भोंवतालच्या परिस्थितीचे सहृदय खेळकर वृत्तीने चित्रण करणें ही क्रिया डॉक्टर केतकरानी सहज पार पाडली. त्यांनीं प्रचलित वा नवें जुनें कोणतेंच कथन तंत्र महत्वाचें मानलें नाहीं. स्वत चा बहुश्रुतपणा, रसिकता, सहृदयता, विनोदबुद्धि या भांडवलावर विसबून राहून त्यांनीं कथा कथन केले. त्यांत अनुभव, ज्ञान व सौदर्यबुद्धि यांनीं रसरसीत जिवंत व सुरम्य गोष्टी निर्माण केली. आपण जें रंगवून सागूं तें रम्य लालित्यपूर्ण असलेंच पाहिजे अशा आत्मविश्वासानें डॉ. केतकरांनीं ललित लेखनाच्या प्रागणांत हें पहिले पाऊल टाकलें. प. वा. हरीभाऊ आपटे यांनी सामाजिक ध्येयवादाची जी भूमिका स्वतःच्या कादबंऱ्यांत धारण केली तीच भूमिका डॉ. केतकरानींहि सोडली नाहीं. देशाचें स्वातंत्र्य, सामाजिक सुधारणा व ध्येयनिष्ठ जीवनाचें सुखसाफल्य हाच विषय डॉ. केतकऱ्यांच्या कादंबरीत पुनः कथिला गेला. वैयक्तिक अनुभव, मतें भिन्न असलीं तरी डॉ. केतकर हेच मराठी ललित कथेच्या उत्क्रांतीचे पुढारी हरिभाऊंच्या पिढीनंतर ठरले. लघुकथेच्या छोट्या क्षेत्रांत मावेल इतकें थोडें लिहिण्याची डॉ. केतकराची स्वभाव प्रकृति नव्हती. अगदीं सामान्य सामाजिक कल्पना व घटनानीं डॉ. केतकराचें समाजशास्त्रज्ञ मन व्यापक विचाराचा अवाढव्य पट निर्माण करी. समालोचना, समाज पृथक्करण वगैरे अनेक प्रकारच्या शास्त्रीय प्रक्रिया त्यांच्या मनांत सुरूं होत. वाचकाला किती जमती सांगू आणि किती नको असें त्यांस होऊन जाई. प्रत्यक्ष गप्पांच्या त्यांच्या व माझ्या बैठकी निदान आठ ते बारा तास टिकत. एकेका विषयाचीं

अगदीं वरवरची चिकित्सा संपूर्ण रात्रींत पूर्ण होत नसे. संध्याकाळीं ७॥ ला सुरू झालेली चर्चा दुसऱ्या दिवशीं सकाळचा चहा घेतल्यावर उजाडल्यावर संपायची. अगदीं सामान्य व्यावहारिक विचारांपासून कायदा उपनिषदांपर्यंत क्लिष्ट पैलू पडल्यावरच विषयाचें चर्चारूप व्यक्त व्हायचें. श्रोत्याच्या वा वाचकाच्या बुद्धीच्या, अनुभवाच्या, आवडीच्या मर्यादा लक्षांत घेण्याचें भान न राहून डॉ. केतकर आपलें हृद्गत बोलून दाखवीत तसेंच तें त्यानीं कादंबरींतहि कथन केल्याचें आढळतें. ही त्याच्या विचाराची अनावर धाव तंत्रनिष्ठ कथा टीकाकारास आवडत नाहीं. प्रियंवदेसारख्या उत्सृंखल तरुणीचें प्रेम व शारदा-वैजनाथांची 'आरण्यकें' सामान्य वाचकाला एका दमांत वाचणें झेपत नाहीं. आध्यात्म-चर्चेत रमून नव्हे तर प्रेमाच्या आंतरिक आकर्षणानें केवळ परस्पर सहवास-पिपासेनें शारदा–वैजनाथ बोलत राहिलीं कीं अप्रबुद्ध वाचकाचा दम उखडतो. मादाम क्यूरीच्या चित्रपटांत असेंच शास्त्रचिकित्सेचे निमित्त करून प्रेमविकास साधला आहे. ग्रियर गारसनसारखी डोळयानीं, हालचालीनीं प्रेम व्यक्त करणारी नटी असल्यामुळेच सामान्य प्रेक्षकाला हा प्रेमप्रसंग आहे याची जाणीव झाली — त्या घनगंभीर संवाद लेखकानें हें अभिनय कौशल्याचें साहाय्य गृहीत धरून कथा लिहिली. डॉ. केतकरांनीं बिंबाची टीका व फटकळ अभिप्राय जोडून त्या प्रणय कथेचें सत्यस्वरूप वाचकास समजाविलें. पण ललित लेखनांतहि असे कित्येक क्षण येतात कीं तेथे लेखकाच्या मनांतील ललित मनोहर अभिप्राय वाचकानें स्वतःच्या रसिक वृत्तीनें व कल्पनाशक्तीनें जाणला पाहिजे. लेखक व वाचकाची ही समानभूमिका निर्माण करणें हें टीकाकाराचे काम. त्या टीकेचें -स्पष्टीकरणाचें प्रयोजन निर्माण होऊं नये ही उत्तम अवस्था. पण ललितलेखनाचा वाचक क्वचितच इतक्या सावधपणानें वाचन करतो. अशा बेसावध वाचकाला एवढेंच सुचवायचे कीं, सामान्य शिक्षण, सामान्य अनुभव व गोड कथनशैली एवढ्या सामग्रीवर लोकप्रिय कथा सांगणाऱ्यांचें लेखन व असामान्य शिक्षण, असामान्य निरीक्षण व चिकित्सक दृष्टि आणि असामान्य रसिकता यांचा परमोत्कर्ष साधणाऱ्या डॉ. केतकरांचें ललित वाङ्मय वाचतानां वाचकानें जागरूक राहिलें पाहिजे. या लेखनांत फालतू वाक्यच काय

विनाकारण वापरलेला शब्दहि सांपडणें कठीण. प्रत्येक योजना सहेतूक — प्रत्येक शब्द सहेतुक — केवळ नादमाधुर्य साधण्यासाठीं भाषा, भावनावैभवाचें खोटें नाटक उभारण्यासाठीं वर्णनाची नक्षी या लेखनांत योजलेली नाहीं. सत्य, शिव आणि सुंदर असें हें निवेदन जितक्या सहेतुक विचारी भूमिकेवरून लिहिलें गेलें त्या भूमिकेवर पोहोंचून रसग्रहणाचा प्रयत्न करणें हेंच अधिक श्रेयस्कर. एवढी जागरूकता ठेऊन डॉक्टर केतकरांचें ललित लेखन वाचलें तर त्यांत रसात्मकतेची लयलूट अनुभवायला मिळेल.

— *नी. म. केळकर*

प्रकरण १ लें

# विलायतेस प्रयाण

सुमारें तीस वर्षांपूर्वीची गोष्ट, पण ती आजच्या अनेक नागपूरकरांनां कालची म्हणूनच वाटत असली पाहिजे. या कथेंतील काहीं व्यक्ती जरी आज दिवंगत झाल्या असल्या तरी त्यांस ओळखणारी मंडळी आज हजारों हयात आहेत व कथानिर्दिष्ट कित्येक व्यक्ती आज पेन्शन घेऊन धनतोलीस बंगला बांधून राहिल्या आहेत, व आम्ही जें पुढें सांगत आहों त्यांतील कांहीं गोष्टींची आठवण तरुणांस सांगून त्या जिवंत ठेवणें हाच त्यांचा दैनिक उद्योग आहे.

संध्याकाळची वेळ. आज मॉरिस कॉलेजात इंटरमिजिएट परीक्षेचा निकाल ( रिझल्ट ) लागणार होता. त्यावेळीं मॉरिस कॉलेज महालातच होतें, आणि प्रोफेसर ताम्हने याच्या नेतृत्वाखालीं चागल्या तऱ्हेनें ते चाललें होतें. प्रस्तुत संध्याकाळीं कलकत्ता युनिव्हर्सिटीकडून एफ. ए. चा निकाल केव्हा येतो आणि त्यात आपण आपला नंबर केव्हा पाहतों या तऱ्हेची उत्कंठा विद्यार्थ्यांत दिसत असून विद्यार्थी येरझारा घालीत होते. ." आला एकदांचा बाहेर " म्हणून कॉलेजच्या कारकुनाजवळ सर्व विद्यार्थी जमले. कारकुनानें निकालाचे कागद दोन कार्डबोर्डास चिकटविले आणि एक कार्डबोर्ड, नोटीसी लावण्याच्या भिंगाच्या कपाटांत ठेवून दिला. आणि दुसरा कार्डबोर्ड हातांत घेऊन एका-मागून एक नंबर वाचण्यास सुरवात केली ; १३७, १३९, १४३, १५८, १५९ असे आकडे तो भराभर वाचूं लागला. कांहीं विद्यार्थ्यांचा घोळका बोर्डाभोंवती होता आणि कांहीं विद्यार्थी त्या कारकुनाभोंवती जमले होते.

रामभाऊ गोडबोले हा विद्यार्थी त्यावेळेस आधुनिक विद्यार्थ्यांचें ' मणिमंगलसूत्र ' घालून व पाटलूणीच्या एका खिशात हात घालून व दुसऱ्या हातांत टेनीसची बॅट घेऊन ती गरगर फिरवीत आला होता. ' मणिमंगलसूत्र ' हा केवळ आमच्या पदरचा शब्द नव्हे. हा त्या वेळच्या मॉरिस कॉलेजांतील विशिष्ट परिभाषेंतील महत्त्वाचा शब्द होय. अज्ञ जनांच्या [redacted]

कॉलर–नेकटाय असें म्हणतात. त्यावेळच्या कांहीं संस्कृतज्ञ पंडितांस क्लॉलर-नेकटायसारखे प्राकृत शब्द वापरावेसे वाटत नव्हतें. नंबर १९९ हा केव्हां येतो म्हणून रामभाऊ हा मोठ्या उत्कंठेनें वाट पहात होता. १९७ हा आंकडा उच्चारतांच त्याचा जीव उत्कंठेनें व धागधुगीनें अगदीं कासावीस होऊन गेला; पण १९७ नंतर एकदम २०३ हा आंकडा ऐकतांच धागधुगीची एका क्षणांत एकदम निराशा झाली व आज मी "बोहारी" पाटलूण घालून ऐटीनें आलों पण ती ऐट सगळी एकदम बाहेर निघाली हा विचार त्याच्या मनांत आला. तो इकडून तिकडे न पहाता तडक तुळशीबागेकडे गेला; आणि तुळशीबागेची ती प्रचंड विहीर पाहून त्या विहिरींत आपण आपला कडेलोट करून घ्यावा अशी त्यास अनावर इच्छा झाली; आणि तो इकडे तिकडे पाहूं लागला, इतक्यात "काय रामभाऊ! तूं आत्महत्या करावयास निघालास काय?" असे उद्गार काढून धांवत येणारा त्याचा स्नेही घरकुट्टे त्याच्या दृष्टीस पडला.

ही तुळशीबाग म्हणजे खरोखरच बाग आहे. ही पुण्यासारखी नामधारी तुळशीबाग नाहीं, आणि हें आता रमणीय स्थान तरुण विद्यार्थ्यांकडून एकातपणें अभ्यास करण्याकरिता उपयोगिलें जातें. या तुळशीबागेच्या पाठीमागून उन्हाळयात शुष्क व पावसाळयांत धो धो वाहणारी नाग नदी दृष्टीस पडते. आणि तुळशीबागेच्या तटाशेजारींच आट्यापाट्या खेळणारे विद्यार्थी आज अनेक वर्षे दृष्टीस पडत आहेत. चिटणवीस पार्कमध्यें कित्येक तरुण मंडळी हॉकी खेळोत, अगर क्रॅडॉक पार्कमध्यें अगर अंजनी तुरुंगाच्या परिकरांत 'टेनीस' खेळोत, कित्येक जण संपर्कास टाळण्यासाठीं महाराजबाग क्लबात ऑक्शनब्रीजरूपी जुगार खेळोत, तथापि तुळशीबागेच्या परिकराची लोकप्रियता खऱ्या नागपुऱ्यामध्ये नष्ट होणार नाहीं.

"अरे झालें काय? रामभाऊ तूं असा कावराबावरा कां दिसतोस? तुझ्या मनांत काय आलें आहे?"

"अरे झालें काय म्हणजे? सर्वच बुडालें. आता मला घरीं तोंड दाखवावयास सोय नाहीं."

"आणि ती कां ?"

"कां म्हणजे इंटरमिजीएटच्या परीक्षेच्या निकालांत आमच्या महत्वाची परिसमाप्ति झाली."

"काय नापास झालास कीं काय ? आणि झालास म्हणून काय झालें ? अरे, नापास होण्यापासून मोठा फायदा आहे. जे बी. ए. झाले आहेत त्यांनां पुढें काय करावें याची भ्रात पडते आणि नापास झालें म्हणजे त्या प्रकारची पंचाईत एक वर्ष पुढें गेली."

"तुला काय सांगावें ? माझ्या घरची सर्व प्रकारची स्थिति तुझ्या लक्षांत येत नाहीं."

"न यायला काय झालें ? मला सर्व ठाऊक आहे. तुझ्या बापानें गडगंज पैसे मिळवून ठेविले आहेत ; तो पैसा गाडीघोडा घेऊन कसा उडवावा हा प्रश्न तुझ्यापुढें आहे. तूं बी. ए. किंवा एल्. एल्. बी. नसताना गाडीघोडा उडविणें तुला योग्य वाटत नाहीं आणि ती संधी केव्हा मिळेल असें तुला झालें आहे. अरे, या प्रश्नाचें उत्तर एवढेंच कीं, गाडीघोडा उडवायला ओठावर मिशा पाहिजेत, व घरी पैसे पाहिजेत, कारण सभ्य गृहस्थाची लक्षणें एवढीच. तूं परीक्षेत पास होस अगर नापास होस आज एकूणवीस वर्षांचा आहेस, तो तूं पंचवीस वर्षांचा होणारच ; आणि तुला मिशाहि फुटतीलच ! झालें तुझें लग्नहि झालें आहे. लेडी आणि जंटलमन दोघेहि सिव्हिल लाईन्समधून महाराजबागेंत दुडक्या चालीनें धावणाऱ्या घोड्याच्या गाडींत बसून 'हिंडयन्ते' करतीलच. गाडींत असलास म्हणजे नाक्यावरचा पोलीस तुला सलामहि करीलच. म्युनिसिपालिटींत जाशील, चीफ कमिशनरच्या गार्डनपार्टीस तुला आमंत्रणहि येईलच. आणखी काय पाहिजे ? तुझें कोणचें महत्त्व गेलें आहे ?"

बंडू घरकुट्ट्याची ही टकळी ऐकून विषण्णवृत्ति झालेल्या रामभाऊची एक क्षणभर करमणूक झाली ; व परीक्षेच्याखेरीज दुसऱ्या कांहीं गोष्टींना महत्त्व आहेच, हाहि एक विचार क्षणभर त्याचा मनांत आला. परंतु लागलीच दुसरा एक विचार मनात आला आणि त्या विचारामुळें तो स्तब्ध होऊन कांहीं

स्वप्नमय चित्राकडे पहात असल्यासारखा दिसला. तो विचार म्हटला म्हणजे 'लेडी आणि जंटलमन' या उल्लेखासंबंधीं होता.

रामभाऊचें लग्न नुकतेंच झालें होतें. बायको सतरा अठरा वर्षांची प्रौढवधू होती, व त्यावेळच्या परिस्थितीप्रमाणें सुशिक्षित स्त्रियात मोडण्यासारखी होती. ती मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाली होती. रामभाऊचे वडील वारल्याला नुकतेच दोन महिने झाले होते; व लग्न हे बापाच्या हयातींत व बापाच्या मोठे-पणामुळे झाले होतें. मॅट्रिक झालेली मुलगी म्हणजे एखाद्या बॅरिस्टरची अगर आय. सी. एस्. ची बायको असली पाहिजे असे लोकांस वाटत होते; आणि इंग्रजी चार पांच इयत्ता शिकलेल्या मुलीला एखाद्या गरजू-बेटाच्या गळ्यांत अडकवून तिच्या जन्माचे मातेरं करूं नका म्हणून आक्रोश करणारे गद्धे गणपतराव हरी नारायण आपटे याच्या 'भयंकर दिव्यात' दृग्गोचर आहेत. त्या प्रकारचे गणपतराव आमच्या नागपूर शहरात मात्र रगड होते. तीन चार इयत्ता झालेल्या मुलीला जर बॅरिस्टर किंवा आय. सी. एस. लागेल तर मॅट्रिक मुलीला तर त्याहूनहि कोणीतरी मोठा पाहिजे असें लोकास वाटे. त्यातल्या त्यात प्रियंवदा म्हटली म्हणजे अत्यंत देखणी मुलगी, तिच्यासाठीं पुष्कळ मंडळी हपापलेली आणि ती या गोडबोल्याच्या पोरट्याने उपटली म्हणून रामभाऊविषयीं पुष्कळ तरुणास मत्सरबुद्धि वाटत होती. रामभाऊ हा स्वतःच्या बायकोस योग्य नवरा नाहीं असे दाखविण्याची पुष्कळाची खटपट असे, आणि हा रामभाऊ इंटरमध्ये नापास झाला म्हणजे हा केवळ कलकत्ता एन्ट्रन्सवाला होणार म्हणजे बायको-पेक्षांहि हलका ठरणार असें लोक उघड उघड बोलत होते. हलका ठरण्याचें कारण हें कीं त्या वेळेस मुंबईच्या मॅट्रिक अगर बी. ए. पेक्षां नागपुरचा म्हणजे कल-त्याचा एन्ट्रन्स अगर बी. ए. हिणकस अशी लोकांची समजूत झाली होती. अर्थात जे विचार लोकांत चोहोंकडे घोळत होते ते रामभाऊच्या मनात आल्या-शिवाय कसे रहाणार ? व परीक्षेंत नापास झाल्याबरोबर ते विचार दत्त म्हणून रामभाऊच्या मनात उभे राहिले. रामभाऊ आपल्या वैवाहिक स्थितिविषयीं असंतुष्ट होता अशातला भाग नाहीं. उलट प्रियंवदाबाईच्या सौजन्यामुळें आणि एका योग्यतेचे सहचर आणि सहचरी यांच्यामध्यें जें अवर्णनीय प्रेम आढळतें

त्या प्रेमाच्या मधुर अनुभवामुळें हे नवाळीचे दिवस मोठ्या आनंदांत गेले. बायको सातारची होती. लग्नानंतर ती मधून मधून माहेरी जाई परंतु जरी ती माहेरी गेली तरी तिचें मन आपल्या लाडक्या नवऱ्यामध्येच पूर्णपणें गुरफटलेलें आहे कीं काय असें कोणासहि वाटे. नवऱ्याला दररोजचे एक पत्र ठेवलेलेंच आणि तें सुद्धां कधीं कधीं पांच पांच पृष्ठे लांब असावयाचें. अर्थात रामभाऊचीं उत्तर जावयाचींच. परंतु ती आठवड्यातून एक दोन म्हणजे शिकस्त, व या एक दोन पत्रांपैकीं सुद्धां एखादे कार्ड निघावयाचें. रामभाऊचे वडील तात्यासाहेब यास आपल्या नवपरिणीत मुलाचें आणि सुनेचें हे सख्य आणि त्यांच्या सख्यांतील अकृत्रिम भाव पाहून मोठा आनंद होई. प्रियंवदाबाई नवऱ्यास पाहून दूर पळणारी नव्हती.

" गूढानुपूरमात्र शब्दमपि मे काता श्रुतौ पातयेत् ।
पश्चादेत्य शनैः करांबुजवृते कुर्वीतवालोचने ॥ "*

याप्रकारें नवऱ्याचें कोड पुरविणारी प्रियंवदा होती. लहानपणच्या खेळगड्यापाशीं खेळावें त्याप्रमाणें ही नवऱ्यापाशीं खेळे. भीत भीत दूर पळणाऱ्या बायकोस एकटी पाहून तिच्याकडे हरभरे फेंकून मारण्याचें कारण रामभाऊस पडलें नाहीं. उलट नवरा अभ्यास करीत असतां संत्र्याचीं सालें त्याच्या अंगावर फेंकून लपून बसण्याचें तीच स्वतः करी. आणि जगन्नाथरायाच्या शृंगारविलासातील अगर भर्तृहरीच्या शृंगारशतकांतील मौजेचे श्लोक घेऊन त्याचा अर्थ काय म्हणून नवऱ्यास विचारावयास जावयाची देखील तिला शंका वाटत नसे. रामभाऊ मध्येंच म्हणावयाचा कीं तुझ्यासारख्या लहान पोरींनां असलीं चावट पुस्तकें वाचण्याचें प्रयोजन काय? तेव्हां तिनें साफ उत्तर दिलें कीं ' लग्न झाल्या-

*अर्थः— " स्वतः लपून राहून आपल्या केवळ नुपूराचाच ध्वनि माझी लाडकी माझ्या कानावर ( माझी उत्कंठा जागृत करण्याकरिता ) पाडो अथवा माझ्या पाठीमागून मंद मंद पावलें टाकीत येऊन आपल्या करकमलांनीं माझे नेत्र झांको. " प्रस्तुत वाक्य राजा पुरूरवस यानें उर्वशीसंबंधानें कालिदासाच्या विक्रमोर्वशीयांत उच्चारलें आहे.

बरोबर माझें पोरपण गेलें, लग्न होण्यापूर्वी असली पुस्तकें वाचावयाची मला मनाई होती. आतां संस्कृतमध्ये जितकीं म्हणून शृंगारिक उर्फ तुमच्या भाषेंत चावट पुस्तकें असतील तितकी मी वाचून काढणार आणि 'सा विरहेतवदीना, माधव मनसिज विशिख भयादिव भावनया त्वयिलीना' अशा तऱ्हेचीं जयदेवकवीची पद्यें देखील पाठ करणार आणि गाणार. आपण एक नवीन सतार मात्र लवकर आणून दिली पाहिजे. माझी जुनी सतार मोडली." रामभाऊची आई आनंदीबाई हिनें या तऱ्हेचीं सुनेचीं भाषणें ऐकून 'आज-कालच्या मुलींनीं ताळच सोडला' असें कौतुकानें म्हणावें. पण तिच्या गोड चेहऱ्याकडे पाहिल्या-बरोबर आपल्या मुलावर प्रेम करणारी बायको त्यास मिळाली म्हणून तिला आनंदच होई. एखादे वेळी प्रियंवदा आपल्या सासूबाईवर उलटून पडे. तिनें म्हटलें "आम्ही तर ताळ सोळा सतराव्या वर्षी सोडला. पण सासूबाई, गेल्या पिढींतल्या बायकांनीं तर सहाव्या सातव्या वर्षीच ताळ सोडला होता. नवरा आठ वर्षांचा आणि बायको सहा वर्षांची; चूलबोळक्याचे खेळ देखील खेळत असत. आणि त्यामुळें 'जुन्या पिढींतील नवराबायकोंत जे प्रेम असते ते नव्या पिढींत नाही' असें मामंजीनां कित्येकदां तरी बोलतांनां ऐकलें आहे." अशा तऱ्हेचें वाक्य सुनेनें उच्चारल्याबरोबर जुन्या काळाची आठवण होऊन सासूबाई क्षणभर आनंदांत गर्क होत, व "थाब, ते घरी आल्यावर तुम्ही भलत्या सलत्या गोष्टी सुनेदेखत बोलत जाऊं नका असें मी त्यानां बजावणार आहे" असें सासू-बाई म्हणत. एके दिवशीं असें वाक्य ऐकल्याबरोबर सून पुन्हा म्हणाली कीं "पहा आजकालच्या पोरीनीं नवऱ्याला हुकूम करण्याचें काम हातीं घेतलें नाहीं."

शब्द तेच, पण आवाज आणि त्यांचा उच्चार करतांना हृदयांत खेळत असणारा भाव यांच्यामुळेंच फरक होत असतो. एखादें वाक्य जें उलट उत्तर म्हणून समजलें जाई तेंच उच्चारणाऱ्याच्या प्रेमाविषयीं खात्री असल्यामुळें प्रेम-दर्शक वाटतें. सासूचें आपल्यावर पूर्णपणें प्रेम आहे याची मनास पूर्णपणें खात्री असल्यामुळें प्रियंवदा सासूशीं निर्भयपणाने बोले. ज्याप्रमाणें शब्दाचें त्याप्रमाणें कृतीचें. प्रियंवदा आपल्या लाडक्या नवऱ्याचे प्रत्यक्ष कान उपटण्यास कमी करीत नसे; पण त्या कान उपटण्याबद्दल रागावण्याइतका नवरा अरसिक नव्हता.

अर्वाचीन कादंबऱ्यांतील आणि गोष्टींतील नवऱ्याला चहा पाजण्यांतच केवळ रोमान्स मानणाऱ्या मुंबईच्या, किचकट आणि स्वतः चहा पिऊन दुर्बल झालेल्या कादंबरीकारांच्या डोक्यांतून निघालेल्या नायिकांप्रमाणें ही प्रियंवदा नव्हती.

आतांपर्यंत आम्ही वर्णन केलेलें सर्व गृहचित्र रामभाऊच्या डोळ्यासमोर उभें राहिलें आणि आपली बायको जरी आपले सांत्वन करण्यासच प्रवृत्त होईल तरी तिच्या मनांतील आपल्याविषयीं आदर कमी होईल काय ? असा त्याच्या मनांत विचार आला. शिवाय आपण आपल्या पत्नीस आदरस्थान वाटावें ही स्वाभाविक इच्छा त्याच्या मनांत होतीच. पत्नी सुशील असली आणि नवऱ्यावर कितीहि प्रेम करणारी असली तरी तिचें करुणास्थान होण्यापेक्षां आदरस्थान व्हावें असें कोणत्या पुरुषास वाटणार नाही ? प्रेमाची अत्युच्च कल्पना म्हणजे सायुज्यतेची होय. सायुज्यता साध्य होण्यासाठीं एक व्यक्ति साध्य–रूप असली पाहिजे आणि दुसरी साधक–रूप असली पाहिजे. आपले ध्येय–रूपत्व कायम ठेवण्यासाठीं नवऱ्यानें नेहमीं प्रयत्न करीत रहाणें आणि तें अंतर काढून टाकण्यासाठीं स्वतःच्या मनास, वाचेस आणि आचारास उच्च तऱ्हेची शिस्त लावून साधकानें साध्याशीं सायुज्य संपादन करण्यास निकराचा प्रयत्न केला पाहिजे. या प्रकारच्या खटपटींत पतिपत्नी–प्रेम उत्कर्षास पावतें. आणि कवीस, कादंबरीकारास आणि त्याचप्रमाणें नीतिविषयक तत्त्ववेत्त्यास मोहक होतें. या पतिपत्नी-प्रेमाची कल्पना केवळ समानतेसंबंधानें उखाळ्यापाखाळ्या काढणाऱ्या, संस्कृतच्या ऐवजी फ्रेंच शिकणाऱ्या अर्वाचीन अल्पवयस्क अविवाहित विदुषींस होणार नाहीं.

बंडू घरकुट्टे हा सांत्वनपर शब्द बोलला तथापि त्यानें रामभाऊच्या मनांतील खरी स्थिति ओळखली नव्हती असें नव्हते. रामभाऊच्या मनांत काय विचार वागत असतील याची त्याला उत्तम तऱ्हेनें कल्पना होती. यालाच काय पण नागपुरांतील कोणाहि मनुष्यास ती कल्पना सहज झाली असती. तथापि रामभाऊच्या मनाची खरी टोंचणी लक्षांत घेऊन त्यास समर्पक इलाज सांगून त्याचे सांत्वन करणें त्यास शक्य नव्हतें. तथापि कांहीं विचार मनांत आणून तो पुढें म्हणाला, “ तुला या एफ् ए.च्या परीक्षेचे काय महत्त्व आहे ? खरोखर तुझें बॅरिस्टर

होण्याकरिता विलायतेस जावयाचें पूर्वीपासूनच ठरलें नाहीं काय ? आणि तुला बॅरिस्टर व्हावयाचें आहे तर तुला इंटरमिजिएटची किंमत तरी काय ? तुझें इंटर-मिजिएट नापास झाल्यानें काडीइतकें नुकसान झालें नाहीं. जें काय तुला शिकावयाचें तें तर तूं शिकलासच. तुला पास होऊन तरी करावयाचे काय ? आतां तुला जर असें वाटेल कीं नापाशीचा धक्का तुझ्यावर असल्यामुळें तुझी लोकांत अपकीर्ति होईल, तर ती कल्पना चुकीची आहे. कारण प्राप्तयौवन वधूशी ज्याचें नुकतेंच लग्न झालें आहे त्याला निदान एक वर्ष तरी घरीं बसावयास हक्क आहे ; आणि जर तूं पास झाला असतास तर तुझ्याविषयीं मला असें वाटलें असतें कीं तूं केवळ व्यवहार-दृष्टीचा मनुष्य आहेस. तुला रसिकता मुळींच नाहीं आणि सुंदर स्त्रीबरोबर एक-दीड वर्ष आनंदांत कसें घालवावें हें तुला समजत नाहीं. "कष्टावाप्त वधु परिग्रहसुखं यावन्नव विद्यते। ग्रंथालोडनतत्परोहि तरुणो दंडयोनु मन्मंडले॥ आदेशःकुसुमायुधस्य........" हा एका अर्वाचीन कवीचा श्लोक तुला ठाऊक नाहीं काय ? तुझ्या लग्नाच्या वेळेस तुलाच समर्पण केला होता ना ? तर मग आतां सांग कीं तूं विलायतेस कधीं जाणार आहेस ?"

रामभाऊ त्याचे उद्गार ऐकून थोडाबहुत विचारांत गर्क झाल्यासारखा दिसला ; आणि बंडोपंताच्या बोलण्याचा त्याच्या मनावर कांहींतरी परिणाम झाल्यासारखा दिसला. काहीं अंशीं बंडोपंताच्या बोलण्यांत तथ्य बरेंच होतें. कारण त्याच्या गेल्या वर्षापैकीं बराचसा वेळ आपल्या नववधूबरोबर सुखानें कालक्रमण करण्यांत गेला होता ; आणि त्याचा विनोदी बाप मधून मधून असेंहि म्हणे कीं, "नुकतेंच लग्न झालें आहे तर तूं एक वर्ष घरींच बैस. नुकतेंच लग्न झालेल्या मंडळींच्या पाठीमागे आमच्या बेवकूब युनिव्हर्सिट्यांच्या माणसेंमारू परीक्षांचा धोशा लावणें बरोबर नव्हे." शिवाय रामभाऊचे वडील याच वर्षी वारले. त्यामुळें त्याच्या आजारीपणांत, आणि उत्तरक्रियेंत रामभाऊचें बरेच दिवस गेले. वडील वारले त्याच्या सुमारें विसाव्या दिवशीं परीक्षा होती. तथापि वडिलांच्या मृत्यूमुळें या तरुण मुलाच्या अंगावर एकदम मोठी जबाबदारी पडल्यामुळें त्याची वृत्ति बरीच गंभीर झाली होती ; आणि आतां आपण खेडाळूपणांत दिवस घाल-

न्निण्यांत अर्थ नाहीं, आपण आयुष्यक्रमाची जबाबदारी उचलली पाहिजे असें त्यास वाटून परीक्षेच्या अगोदर सहा सात दिवस मोठ्या निकरानें अभ्यास करून रामभाऊ परीक्षेस बसला. त्यास पास होण्याची बरीच आशा वाटत होती. तथापि १९९ हा नंबर पास झालेल्या यादींत पहाण्याचें त्याचें भाग्य नव्हते.

थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे आपल्या आईच्या आणि सुशील पत्नीच्या संमतीनें आणि धाकट्या भावाचा निरोप घेऊन रामभाऊनें एक महिन्याच्या आंतच विलायतेस जाण्यासाठी प्रयाण केलें.

---

**प्रकरण २ रें**

## ' भोंसलेविजय मिल्स '

मागच्या प्रकरणांत बंडूनाना घरकुट्टे यांची वाचकास ओळख झाली आहे. आतां थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे बंडूनाना हे आमच्या रामभाऊचें सहाध्यायी होते. बंडूनाना रामभाऊपेक्षां खरोखरच वडील, परंतु इंग्रजी सहाव्या इयत्तेंत बंडूनानास रामभाऊनें पकडलें. बंडूनानास मालगाडी म्हणत, कारण त्याचा दर स्टेशनवर बराच मुक्काम व्हायचा! उलटपक्षी रामभाऊस मेलगाडी म्हणत; कारण एका वर्षात त्यानें दोन इयत्ता केल्या होत्या. रामभाऊंच्या शिक्षणास सुरवात उशीरानें झाली तथापि या एक दोन कोलांटउड्यामुळें ते लवकरच मॅट्रिक झाले. रामभाऊ ज्यावेळेस इंटरमिजीएटला बसला त्यावेळेस आमच्या बंडूनानाचें मॅट्रिकला बसण्याचें तिसरे वर्ष होतें. मुलगा ' ढ ' म्हणून मास्तरनें काढून ठेवला होता पण तसा तो केवळ ' ढ ' होता असें म्हणता येत नाहीं.

रामभाऊ आणि बंडूनाना यांचें प्रेम मात्र परस्परांवर मोठे होतें. व्यावहारिक बाबतीत बंडूनानास तीक्ष्ण दृष्टि उत्पन्न झाली होती. गांवातील निर-

निराळ्या मंडळांसंबंधानें खडान् खडा माहिती बंडूनानास होती. कांहीं अंशीं बंडूनानाविषयीं लोकमत वाईट झालें होतें. आणि याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे आमची सदोष पुरुषपरीक्षा होय. युनिव्हर्सिटीच्या परीक्षांत जो भराभर पास होईल तो चांगला, जो होणार नाहीं तो वाईट, या तऱ्हेची लोकांत वृत्ति झाल्यामुळें बंडूनाना लोकांत वाईट ठरत असें, एवढेंच नव्हे तर त्याच्या प्रत्यक्ष बापास हा मुलगा चांगला निघाला नाही असें वाटे. मुलावर बापानें केवढाल्या आशा बांधल्या होत्या. याचें शिक्षण चांगलें करून याला सिव्हिल सर्व्हिसच्या परिक्षेस बसण्याकरितां इंग्लंडास पाठवावें, असें त्याचे वडील अनंतराव घरकुट्टे यांस वाटे. अनंतराव हे स्वतः डेप्युटी कमिशनरच्या ऑफिसमध्यें १२ रुपये पगारापासून वाढून एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनरच्या हुद्यापर्यंत वाढत गेले होते. ऑफिसचें अगर फिरतीचे काम असो सर्व काम तडफीनें आणि हुषारीनें अनंतरावानीं करून सरकारी अधिकाऱ्यांत चांगलें नांव मिळविलें. यांच्या अंगी कांहीं जुन्या काळच्या हुषार व मुत्सद्दी म्हणून म्हणवून घेणाऱ्या लोकांचे दोष होते, तथापि त्यांशीं आपणांस काहीं कर्तव्य नाहीं. आपण सध्यां बंडूनानाकडेच लक्ष देऊं.

बंडूनाना यानीं पुढें काय करावें यासंबंधाचे कांहीं विचार त्यांच्या वडिलांच्या मनांत घोळत होतेच. अनंतराव हा गृहस्थ इतरानां कसाहि असो, पण आपल्या एकुलत्या एक मुलांसंबंधानें याच्या मनांत दृढ प्रेम होतें हें खास. आपला मुलगा वाईट निघाला असें त्यास किती जरी वाटलें तरी लोकांनीं त्यास वाईट म्हटलेलें अनंतरावांस बिलकूल खपलें नसतें.

मुलगा तीनदां मॅट्रिकमध्यें नापास झाला हें पाहून अनंतरावांस फार वाईट वाटलें. आतां करावें तरी काय ! आपण साहेबापाशीं वजन खर्च करून यास कसा बसा नायबतहशिलदार करावा, म्हणजे आपण पुढें जसे वाढत वाढत ई. ए. सी. च्या हुद्यापर्यंत येऊन पोंचलो तसा हाहि पोंचेल असें वाटलें, व त्यांनीं वरिष्ठ अधिकाऱ्यापाशीं वजन खर्च करून आपल्या मुलास नायबतहशिलदारी कशी बशी मिळवून दिली. इकडे गोडबोले विलायतेला गेला तर अनंतराव

नायब तहशिलदार झाला. कर्मधर्मसंयोगानें असें झालें कीं याचें आणि तहशिल-दाराचें बिलकुल जुळलें नाहीं. तहशिलदार आपल्या दीड दोनशें पगारातील तीनचारशें खर्च करून पाच-सहाशें रुपये शिल्लक टाकणारा मनुष्य होता. चांदा जिल्ह्यामध्यें सिरोंचा तहशिलींत बंडूनानाची नेमणूक झाली होती. सिरोंचा हें ठिकाण चांद्यापासून शंभराहून अधिक मैल दूर आहे आणि तेथें रेल्वेहि नाहीं, त्यामुळें तेथील तहशिलदारास असे वाटतें कीं आपण राजे किंवा बादशहा आहोंत. अमुक रस्त्यावर तहशिलदाराखेरीज कोणी गाडीच हांकावयाची नाहीं, इत्यादि प्रकारचे त्यानें नियम केले होते आणि तहशिलदारी त्यानें बरीच गाज-विली. या तहशिलदाराच्या पैसे खाण्याच्या कांहीं युक्त्या ठरलेल्या होत्या. यानें घरीं सत्यनारायण करावा, आणि गावांतल्या पुष्कळ कोमटी शेटसावकारास बोल-वावें आणि ज्या कोणास जी लाच द्यावयाची असेल ती त्यानें सत्यनारायणापुढें दक्षिणा म्हणून ठेवावी. अर्थात सत्यनारायणापुढें ठेवलेली रक्कम ब्राह्मणाच्या हातीं पडावयाची नाहीं. ब्राह्मणास फक्त सव्वा रुपया मिळाला म्हणजे पुष्कळ झालें. “ महाराज आपल्या सारख्याने दक्षिणा आणखी द्यावी ” असें जर एखाद्या ब्राह्मणानें म्हटलें म्हणजे “ भटास लोभ सुटला ” असे उद्गार तहशिलदार साहे-बांच्या मुखाबाहेर पडत.

या तहशिलींत कारकुनापासून तहशिलदारापर्यंत सर्व लोक मोठ्या जुटीनें रहात होते. “ सर्व लोक एकच साध्याने प्रेरित झाले, ” म्हणजे जूट ही रहाव-याचीच. अणि तेथील तेलगू तहशिलदार वीरण्णा पंतलुगारु यानें उत्तम प्रकारें जूट कायम राखिली.

सिरोंच्यामध्ये कोणी नवीन कारकून अगर नायबतहशिलदार आला म्हणजे त्याच्यावर छाप पाडून पूर्वापार चालू असलेल्या पद्धतींत त्यास रुळवावा कसा ही एक मोठी कलाच झाली होती. ती कला गोविंदबापू नरके नावांच्या एका कारकुनास साध्य झाली होती. नरके हा अठरा रुपयांवर तेथें कारकून होता, पण त्याने आपल्या तीस वर्षांच्या कारकुनींत बरीच कमाई केली होती. त्यानें दीडशे बिघ्यांची शेती केली होती, आणि एक विहीर आणि एक घर

बांधले होतें. विहीर आपल्या गावांत हवी म्हणून त्यानें बेधडक वर्गणी गोळा केली आणि ती विहीर मात्र आपल्या घराच्या आवारांतच बांधली. कोणी कांहीं काम करून घ्यावयास आला म्हणजे त्याच्याजवळ त्या विहिरीसाठीं काढलेलें वर्गणीचे पुस्तक पुढे केलें जाई. या गोविदबापूस वकील म्हणत असत; कारण कीं एक तर सर्व तहशिलीचें हे वकील होते. आणि कोणा कारकुनाचे कृष्णकृत्य उघडकीस येण्याचा संभव दिसला अगर दुसरी काहीं पंचाईत पडली तर तोंड काय काढावी या बाबतींत गोविदबापूंचें डोकें चांगले चाले.

सिरोंच्यास बंडूनाना हें नवीन "वांसरू" आलें. त्या वांसराकडून तहशिलीच्या कामाचे गाडें बिनबोभाट हांकण्यास त्यास तयार कसें काय करावें असा विचार वीरण्णा आणि गोविदबापू यांच्यामध्ये सुरू झाला. नायबसाहेबांच्या घरीं जाऊन तालीम देण्याचें काम गोविंदबापूनीं अंगावर घेतलें. बंडूनाना संध्याकाळी ऑफीसचें काम घरीं आणून पाहात असता त्या कामाची समजूत करून देण्यासाठीं गोविदबापूंस तहशिलदारांनीं नायबसाहेबांच्याकडे पाठविले.

एके दिवशीं काम साधारणपणें संपत आलें आणि मध्येंच बंडोपंतानां चहा आला; बंडोपंतानीं चहाचे दोन कप आणावयास सांगितलें आणि एक कप गोविदबापूसहि घेण्यास सांगितलें. तेव्हां गोविंदबापू म्हणाले,

"नायबसाहेब, आपल्या तोंडावर आपली स्तुति मी करीत नाहीं, पण आपला थोर स्वभाव आपल्या थोर कुलास साजेसा आहे. कचेरींतली सर्व कारकूनमंडळी यामुळें आपणांस फार चहातात."

"कसचा थोर स्वभाव आणि कसचें काय?" बंडूनानास स्तुति ऐकून आनंद होणें सहजच होते. तथापि वरील प्रकारचें त्यानीं उत्तर दिलें.

"अहो, आपल्यासारख्या राजधानींतल्या लोकांना दरबारी रीती माहीत असतात. आम्ही पडलों खेडवळ माणसें, तर गैरमाहितीमुळें आमच्याकडून कांहीं अपराध झाला तर आपण आम्हांस क्षमा करावी. आपला थोर स्वभाव आणि त्यांत आपल्या अंगी विनय आहे त्यामुळें आपल्या थोर स्वभावाची

आपणांस ओळख नाहीं. या सिरोंच्यामध्यें पंधरा रुपयाचा कारकून देखील आपणांस राजा समजतो. आपण एवढ्या मोठ्या हुद्यावर असून देखील आपल्या अंगी मीपणा नाहीं. त्यामुळें आम्हां कारकून मंडळींत एक तऱ्हेचें आपलें उदाहरण पाहून लाज वाटत आहे."

गोविंदबापूनीं काढलेले हे उद्गार अगदींच खोटे नव्हते. नुकताच नागपुराहून आलेला मनुष्य, त्यास नायबतहशिलदारीची जागा फारशी मोठी वाटत नव्हती. नागपुरात देखील हा विद्यार्थिदशेंतून नुक्ताच बाहेर पडला होता. विद्यार्थिदशेंत असतांना तरुण मंडळीस आपल्या गांवांत तहशिलदारच काय पण डेप्युटी कमिशनर व प्रसंगीं कमिशनरहि कोण आहे याची माहिती नसते, आणि नायबतहशिलदार म्हणजे कोणी यःकश्चित् मनुष्य अशीच त्यास भावना असते. या भावनेमध्येंच आमचे बंडूनाना होते. नायबतहशिलदारी म्हणजे दहावीस हजार लोकांच्या दृष्टीनें मोठी जागा आहे, या भावनेचें त्यांच्या मनात अजून प्रतिबिंब पडले नव्हते; अणि यामुळे तो सर्व मंडळीशीं सरळपणें वागे. कोणी भेटावयास आलें तर त्यास ताबडतोब भेटे. पण याच्या योगानें बंडूनाना कारकूनमंडळीस फारसा प्रिय झाला होता असे नाही. कारण जोंपर्यंत वाटेल त्याला नायबतहशिलदार किरसानी लोकांचे काम ताबडतोब करीत आहे, तोंपर्यंत तहशिलदारापासून कारकुनापर्यंत मिळणारा "मामूल" जरासा बंद झाला होता, आणि यासाठींच गोविंदबापू वकिलाकडून "वाठणांतून नुकत्याच सुटून आलेल्या ढोरास" शिकवणी मिळणें अवश्य होतें.

"अहो, नायबतहशिलदारीची जागा म्हणजे मोठी असे मी समजत नाही." बंडूनाना म्हणाले.

"बरोबर आहे, आपल्यासारख्या मंडळीच्या योग्यतेच्या मानाने, आणि राजधानींतल्या मंडळींच्या दृष्टीने ही जागा मोठी नव्हे हें खरं, तथापि या तालुक्याच्या ठिकाणीं हीच जागा म्हणजे आम्हास फार मोठी भासते आणि आपल्यासारख्या मंडळीस जरी ही मोठी नाहीं तरी या जागेचे महत्त्व तालुक्यांतील लोकांच्या दृष्टीनें कमी होऊं देणें हें देखील चांगलें नाहीं."

" म्हणजे काय ? "

" मी बोलतों याचा राग येऊं देऊं नका. तथापि आपल्यासारखा ऑफिसर जर लोकास सहज भेटला तर लोकांच्या मनांत त्याच्याविषयींचा आदर-भाव कमी होतो. मोठ्या शहरात ऑफिसरहि चागले आणि रयतहि चांगली. पण इकडे असा रिवाज पडला आहे कीं ऑफिसरानें भेटावयास आलेल्या मनुष्यास तास तास तिष्ठत ठेवले पाहिजे, नाहींतर एक दोन हेलपाटे तरी घालायला लावले पाहिजेत. "

" हें असें कां ? "

" कारण एवढेच कीं आपण मनुष्यास भेटण्यापूर्वी कोण कसा आहे याची चौकशी केली पाहिजे. नाहीतर काहीं लबाड लोक येऊन आपल्या मोकळेपणाचा फायदा घेतात. आपल्यापाशीं ज्याची ओळख झाली ते लोक आपल्याशीं त्यांचें असें वजन आहे अशा खोट्या-नाट्या गोष्टी लोकास सागून व आमच्यामार्फत तुम्ही काम करून घ्या असेहि सांगून त्यांच्यापासून पैसे उपटतात. पुष्कळ लोक आपल्याशीं सलगी करण्याचा प्रयत्न सुरू करतात. ते दररोज आपण रस्यांत सहज भेटलों असें अधिकाऱ्यास भासवितात, आणि पुढें हळू हळू ओळख पक्की करीत जातात. यासाठीं अधिकाऱ्यानें वाटेल त्यास ओळखता कामा नये. माहिती पूर्ण असली तरी आपणांस बिलकुल नाहीं असे दाखविलें पाहिजे. असे केलें म्हणजे टाऊटगिरी करणारे लोक वचकून रहातात, व एकदम सलगी करीत नाहींत. शिवाय आपणांस भेटूं इच्छिणारी मंडळी आपण स्वत. दूर ठेवली म्हणजे हाताखालची कारकूनमंडळी देखील संतुष्ट असतात. "

" कां बरें, कारकूनमंडळीच्या मनांत मी कोणास भेटूं नये असें आहे काय ? "

" अहो, ज्याप्रमाणें देवळांतल्या मूर्तीला मान आहे त्याचप्रमाणे थोडाबहुत पायरीलाहि मान आहेच. देवाला नमस्कार करण्यास ज्याना आत जातां येत नव्हते तो मंडळी पायरीवर डोकें ठेऊन संतुष्ट असतात. पायऱ्यावर कित्येक

डोकें ठेऊन जातात तर कित्येक पायऱ्या तुडवीत मूर्तीपर्यंत जाऊन पोंचतात. इतर लोक तुडवून जातात याचा मोबदला कांहीं लोक डोकें ठेवतात या निमित्तानें तरी पायऱ्यानां मिळतो. आम्ही कारकूनमंडळी किती झाली तरी माणसेंच आहोंत. कारकूनमंडळीस देखील आपला मान लोकांनीं ठेवावा असे वाटतें. आमचें असें म्हणणें नाहीं कीं तुम्हीं कोणासहि भेटूं नका. नागपूर-वऱ्हाडकडची मंडळी चांगली आहे. पण ही तैलंगी मंडळी एक नंबरची काफर आहे. नाना तऱ्हा करून ते आपणांशी ओळखी काढतील व पुढे गोत्यांत घालतील."

गोविंदबापूचे हें वाक्य ऐकताच त्यास आपण नागपूरच्या नील सिटी स्कूलमध्ये असतांना मास्तरची पगडी कशी लपविली, आणि माराचा धाक मास्तरने घातला असतां एका अशक्त कोमट्याच्या मुलाने आपलें नांव मास्तरला सांगून आपणांस मार कसा बसविला याची आठवण झाली. तथापि त्यावेळेच्या वर्गातील इतर चार पांच तेलगू विद्यार्थ्यांनीं चोर ठाऊक असून माराच्या धमकीस न भितां चुगली करण्याचे कसे नाकारले हे मात्र तो विसरला. असतील लेकाची तैलंगी मंडळी गोविंदबापू सागतो तशीच हलकट असें त्यासहि वाटलें.

गोविंदबापूचा सिरोंचा येथील तैलंगी मंडळीसच नायबतहशिलदारापासून दूर राखण्यांत मतलब होता. पैसा ज्या लोकांपासून काढावयाचा ते लोक मुख्यत्वें-करून कोमटी, रड्डी, कम्मा, कापेवारु, वेलमा इ. जातीचे तैलंगी लोक होते. तेथील महाराष्ट्रीय मंडळी थोडी होती, आणि जी होती त्यांत सरकारी नोकरच पुष्कळ होते.

गोविंदबापूनीं पुढें आपले चऱ्हाट सुरू केलें. ते म्हणाले, "आपले तहशिलदारसाहेब आहेत. मोठा चांगला मनुष्य. आहेत तैलंगी पण अगदीं लाख मनुष्य आहेत म्हणूनच सरकारनें त्यास या हुद्यावर ठेवलें आहे. तैलंगी लोकांची वर्मे ते चांगले ओळखतात आणि यासाठीं आपणांस कोणी मंडळी भेटावयास आली तर त्यांच्याकडे पाठवून द्या, नाहीं तर कोणास भेट देण्याच्या अगोदर ऑफीसमधल्या मंडळींत चौकशी करा. आपला स्वभाव सरळ आणि निष्कपट आहे म्हणून आपणांस माणूस एकदम उमजणार नाहीं. आपण भेटावयास आलेल्या मनुष्यास तहशिलदारसाहेबांकडे

पाठविलें म्हणजे त्यानाहि आनंद होईल. त्यानां वाटेल कीं, तरुण अधिकारी वृद्ध अधिकाऱ्याचा योग्य मान राखतात. ”

“ मी वृद्ध मंडळीस नेहेमीं मान देत असतों. अहो, वयास आणि अनुभवास मान नाहीं द्यावयाचा तर द्यावयाचा तरी कशास ? ”

“ आपण कशी लाख गोष्ट बोललात. अहो, खरोखर वृद्ध मंडळीस मान देण्यांत मोठा फायदा असतो, स्वतःचा त्रास चुकतो आणि आपण जबाबदारींतून पुन्हां मोकळेच. ”

“ दुसरी आणखी एक गोष्ट आपणांस सांगतों आणि ती म्हटली म्हणजे नजराण्यासंबंधानें. सरकारी अधिकाऱ्यास नजराणा पाठविणें ही चाल पूर्वापार आहे तथापि या चालीचा दुरुपयोग होतो. कोणीं सभ्य मनुष्य नजराणा आपण होऊन शिष्टाचार म्हणून अधिकाऱ्यास पाठवितो आणि कोणी आपलें कांहीं काम व्हावें म्हणून नजराणा पाठवितो ; तर दुसऱ्या प्रकारच्या मंडळीस जपलें पाहिजे. जो नजराणा अधिकाऱ्याकडे खासगी रीतीनें पाठविला जातो तो लबाडीचा समजावा. जो नजराणा उघड उघड कचेरीतल्या कारकुनामार्फत जातो तो खरा समजावा. आम्ही नजराणा आला असता तो मनुष्य कसा आहे, त्याला काहीं हेतु साध्य करून घ्यावयाचा आहे कीं काय ? याची बारकाईनें चौकशी करून आपणांस कळवूं. ”

“ मला वाटतें की मी कोणताहि नजराणा घेण्याच्या भानगडींत पडणार नाहीं कारण जो गृहस्थ नजराणा शिष्टाचार म्हणून पाठविणार, त्यास उलट नजराणा करावा लागेल. आणि आपल्यामागें ती पीडा नको. ”

“ छे छे ! तसें करण्याचें कारण नाहीं. सरकारी अधिकाऱ्यास देणगी देणें म्हणजे काहीं वाईट नाहीं, का कीं तो राजाचा प्रतिनिधि आहे. ”

असो; येणेंप्रमाणें गोविंदबापूंची नव्या अधिकाऱ्यांस शिकवणी चालली होती. त्याचा अनुभविक बंडुनानांच्या मनावर थोडाबहुत परिणाम झाला ; फार झाला नाहीं, कां की, तोहि जरासा व्यवहारज्ञ होता. त्याला दोन चार भाषाहि

येत होत्या. नागपुरास तो गुजराथी, मारवाडी, तैलंगी, इत्यादि महाराष्ट्रीयेतर मंडळीत बराच मिसळे. आणि ज्याशी त्याशीं ज्याच्या त्याच्या भाषेंत बोलण्याचा प्रयत्न करी. त्यास थोडे बहुत तैलंगी येत होते ही गोष्ट त्याच्या पथ्यावर पडली होती आणि त्यामुळेंच सिरोच्याच्या रिकाम्या झालेल्या नायब तहशिलदारीवर त्याची नेमणूक झाली.

त्याने मनातल्या मनात तीन चार गोष्टी ठरविल्या. एक तर स्वतःचे महत्त्व आणि बोज रहावा यासाठीं इतराशीं फारसें बोलावयाचें नाहीं. लोकांना सलगी करूं द्यावयाची नाहीं. कांहीं लोकाचा नजराणा घेण्यास हरकत नाहीं हें खरें काय या संबंधानें बापास पत्र घालून विचारावयाचें आणि तोपर्यंत कोणताच नजराणा घ्यावयाचा नाहीं.

आपण लोकाचा नजराणा घ्यावयाचा तो कारकुनामार्फतच घ्यावा असें सागण्यात गोविंदबापूचें एक दोन हेतु होते : नायब तहशिलदाराकडे दाद लागण्यास लोकांना नजराणा पाठवून पुरेसें नाहीं, तो कारकुनामार्फतच गेला पाहिजे हें लोकांना भासवावयाचें; दुसरा हेतु म्हटला म्हणजे ऑफिसातील वरिष्ठापासून कारकुनापर्यंत लोकापासून जो " मामूल " घ्यावयाचा असतो त्यात निरनिराळ्या लोकाचे हिस्से निरनिराळे असें असतें, ती पद्धति बिघडूं द्यावयाची नाही, तर नायब तहशिलदारास या पद्धतीत बसवावयाचे. तिसरा हेतु म्हटला म्हणजे नायब तहशिलदारास कारकुनामार्फत एक दोनदा नजराणा पोचला, म्हणजे नायब तहशिलदार पूर्णपणें ताब्यात आला. त्याला पुढें त्यानें नजराणा घेतला ही गोष्ट उघडकीस आणण्याचा तहशिलदारामार्फत धाक घालून पुढें आपल्या कह्यांत वागवावयाचें. असें झालें म्हणजे गाडे पुन्हा सरळपणें सुरू झालें आणि वीरण्णा पंतलु म्हणत त्याप्रमाणें ऑफिसातील सर्व मंडळी एका ध्येयाने प्रेरित होऊन त्यांची जूट झाली ; असो.

काहीं दिवस गाडी सुरळीत चाललें. तथापि जोपर्यंत बंडूनानानें स्वतः कांहीं नजराणा घेतला नव्हता, तोपर्यंत वीरण्णा पंतलुस बंडुनानाविषयी विश्वास वाटणें शक्य नव्हतें. शिवाय आपली पद्धति बंडूनानाच्या हळू हळू लक्षांत घेत आहे हेंहि वीरण्णास कळून चुकलें होतें.

मध्यप्रांतात तहशिलदार आणि नायब तहशिलदार याच्याकडे येणारे खटले म्हटले म्हणजे दाखलखारजीचें. कोणी जमिनीचा मालक मेला म्हणजे ती जमीन दुसऱ्या कोण वारसाच्या नावावर लिहिली पाहिजे, आणि ते काम तह-शिलदार आणि नायब तहशिलदार याच्याकडे असते. तहशिलींतलें दुसरें काम म्हटलें म्हणजे लंबरदारावर देखरेख. गावातील जमिनीचा वसूल सरकारला पोचविणें, हें काम "लंबरदारा" कडे असते. लंबरदार गावचा मुकादम देखील असतो; तेव्हा त्याचें काम गांवातील चोरी वगैरेसंबंधी रिपोर्ट करणें इत्यादि असते. एखादा लंबरदार मेला म्हणजे दुसरा लंबरदार सरकार नेमितें, अगर गावातील मनुष्याना एखादा लंबरदार नको असला आणि दुसरा लंबरदार हवा असला तर ते देखील सरकारला अर्ज करून लंबरदार बदलवूं शकतात. दाखलखारजीच्या आणि लंबरदारीच्या अशा दोन्हीं प्रकारच्या खटल्यात तहशिलदारास पैसे खावयास सापडतात. तहशिलदारास आपली तहशिलदारी गाजवावयाची असली म्हणजे अनेक प्रकारानें गाजविता येते. एक तर मालगुजार आणि त्याचें कुळ यांमध्यें तंटे उपस्थित करून देतां येतात. हातीं अधिकार असला म्हणजे दुसऱ्यामध्यें तंटे उपस्थित करून देण्याची शक्ति वाढते. किंवा सरकारचे जे असे अनेक कायदे आहेत जे कोणी कधीं पाळीत नाहींत त्या कायद्याची अंमलबजावणी करिता येते. उदाहरणार्थ, फाटकास कडी असली आणि फाटक उघडून मालकाच्या परवानगीशिवाय आत आलें कीं, झाला ट्रेसपास. जे कायदे केवळ कागदावरच असतात आणि केवळ मूर्ख-पणाचे आहेत ते जुलमी अधिकाऱ्यास प्रजेस छळण्यासाठीं चांगलेच उपयोगी पडतात.

या सर्व महत्त्वाच्या बाबी आहेत, आणि पगारापेक्षा पुष्कळ पटीनें उत्पन्न करूं इच्छिणाऱ्या अधिकाऱ्यास फारच महत्त्वाच्या होत. आणि व्यवस्था एकदां जुळली तरी तिच्यात घोटाळा होऊं नये म्हणून फारच व्यवहारदक्ष रहावें लागतें. तरी पण साहेबांस यामुळें त्रास बराच होई आणि ते आपल्या व्यवस्थेंत बसणाऱ्या नायब तहशिलदारास पदच्युत करण्यास अनेक युक्त्या योजीत. नायब तहशिलदाराने कसें करून तरी बदली करून मागितली म्हणजे झालें.

नायब तहशिलदाराचें आणि तहशिलदाराचें जमत नसलें म्हणजे तहशिलदार नायब तहशिलदारास अनेक तऱ्हेनें छळूं शकतो. एक तर तहशिलदार नायब तहशिलदारास नालायक आणि आज्ञाभंग करणारा ठरवूं पहातो. पुष्कळदां असें होतें कीं खून, मारामाऱ्या इत्यादिकाचा रिपोर्ट डेप्युटी कमिशनरकडे गेला म्हणजे तें प्रकरण चौकशीसाठीं तहशिलदाराकडे येतें. महत्वाचें प्रकरण असले म्हणजे ताबडतोब त्याची चौकशी झालीच पाहिजे, व चौकशींत जाण्यासाठीं तहशिलदार नायब तहशिलदारास सांगणारच. तथापि दोन अधिकाऱ्यामध्यें वाकडे असल्यास प्रत्येक क्षुल्लक प्रसंगीं देखील तहशिलदार नायब तहशिलदाराला पाठवूं शकतो. अशा तऱ्हेनें तहशिलदार नायब तहशिलदारास छळूं शकतो.

वीरण्णा तहशिलदारसाहेब यानीं प्रथमतः ऑफिसामध्यें एकी राखण्यासाठीं आणि होईल तितकें करून लंबरदारांचे आणि दाखलखारजीचे खटले स्वतः घेतां यावेत म्हणून नायब तहशिलदारास कचेरींत फारसें न ठेवतां बाहेरगांवीं पाठविण्यास सुरवात केली. सपाटून प्रवास करावयास लावल्यानें कोणीहि कंटाळावयाचाच, आणि त्यातल्यात्यात सिरोंच्याचा नायब तहशिलदार अधिक कंटाळावयाचा. कारण चांदा जिल्ह्यात जंगल पुष्कळ आहे, आणि चांदा जिल्हा जरी पूर्वी मोठा संपन्न देश असावा असें तेथील ऐतिहासिक अवशेषावरुन दिसतें, तरी आज जवळ जवळ तेथें जंगलीपणाच आहे. पुष्कळ ठिकाणीं पोहे किंवा तांदूळ याखेरीज खायलाहि मिळत नाहीं. पंचवीस तीस मैलपर्यंत ब्राह्मणाचें एखादे घर लागेल तर शपथ. गोंडांची वस्ती; पुष्कळ ठिकाणीं वाघ आणि साप याचा सुळसुळाट फार; इतकें जरी झालें तरी बंडुनाना खंबीर; त्यानां मलेरियाचा आजारहि जंगलांत झाला तथापि त्यानीं त्यास जुमानलें नाहीं. त्यानां एक तऱ्हेची त्या वन्य स्थितीची मौजच वाटूं लागली आणि ते कामे आनंदानें करूं लागले.

पुष्कळ ठिकाणी प्रवास करावा लागल्यामुळें बंडुनानास तालुक्यांतील परिस्थितीची खरीखुरी माहिती होऊं लागली. तहशिलदार पैसे खाऊन दुष्ट लंबरदार कसे नेमीत आहे, ते लंबरदार आपली मुकादमगिरी कशी गाजवीत

हित, याची त्यास कल्पना येऊन चुकली, आणि आता आपण कांहींतरी केलें पाहिजे, वरिष्ठ अधिकाऱ्यास बातमी कशी द्यावी, इत्यादि विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. पुष्कळ ठिकाणाहून लंबरदार बदलावे म्हणून अर्ज आले होते, पण अर्ज करणाराकडून तहशिलदारास दक्षिणा पोचली नव्हती, म्हणून त्याच्या अर्जाची अजून दाद घेतली नव्हती. कोणी डेप्युटी कमिशनरकडे अर्ज दिला, तर तें प्रकरण पुन्हा तहशिलदाराकडे चौकशीस येई. तहशिलदार त्यावर शेरा मारी की अमुक लंबरदार प्रामाणिक मनुष्य आहे. पण वसूल करण्याच्या बाबतींत कडक मनुष्य आहे. म्हणून तो लोकांस अप्रिय आहे. लंबरदार सरकारचे हित पहात आहे, आणि त्यामुळे त्यास कडकपणा करावा लागतो. हा रिपोर्ट डेप्युटी कमिशनरकडे गेला म्हणजे तो त्यास खरा वाटे, कारण सरकारी काम कसोशीनें केल्यामुळे मनुष्य अप्रिय होतो ही गोष्ट त्यास ठाऊक असे, आणि अशा प्रसंगीं सरकारचे हित पहाण्यास सरकारी अधिकाऱ्यांनी पाठिंबा दिला पाहिजे असेंहि त्यास वाटे.

प्रस्तुत परिस्थिति बंडुनानानें पाहिली. ज्या लोकांवर जुलुम होतो त्या लोकांची स्वसंरक्षण करून घेण्याविषयीं तत्परता पाहिली तर त्याला असें दिसून आलें कीं सरकारी अधिकाऱ्याविरुद्ध साक्ष द्यावयास प्रजा भीत आहे आणि जरी त्यांस जुलुम होत आहे तरी तो निवारण करण्यासाठीं अवश्य असलेलें धैर्य त्यांस नाहीं. बंडुनानाचा स्वभाव दिलदार होता. देशाभिमानप्रचुर लेख त्यानें वाचले होते आणि इतर अधिकारी कसेहि असोत आपण मात्र नेकीनें रहावें असा त्यानें निश्चय सरकारी नोकरी पत्करतानांच केला होता. आपण समक्ष पहात आहों, आणि आपणांस गरीबांच्या संरक्षणासाठीं कांहीं करितां येत नाहीं, हें पाहून त्यास काय वाटले असेल याची कल्पना वाचकांनींच करावी.

गोविंदबापू आणि वीरण्णासाहेब यांचे मत नव्या नायब तहशिलदाराविषयीं काय बनत होतें हें पहाण्यासाठीं वाचकहो, आपण त्यांचाच संवाद ऐकूं.

वीरण्णा हे काळेकुळकुळीत, मिशा काढणारे आणि कपाळास भस्म लावणारे, बाहेरच्या देखाव्यावरून मोठे कर्मठ असावे असे दिसत होते. त्यांच्या घरापुढें

सडा उत्तम तऱ्हेनें टाकून रांगोळींचीं मंगलकारक रेषाचित्रें काढलेलीं असत. हे राजमहेंद्रीचे आरवेळळ नियोगी जातीचे होते. उत्तरेकडे ज्याप्रमाणें कायस्थ म्हणजे सरकारी नोकरींत पुढें असतात त्याप्रमाणेंच तेलिंगणात आरवेळळ नियोगी ही राज्यकारभारांत कुशल जात समजली जाते.

“ बालय्या मालगुजाराकडून चांदीच्या पानदानाचा जो नजराणा आला तो कांहीं त्यांनीं घेतला नाहीं,” गोविंद बापू म्हणाले.

“ बालय्याला काम कोणतें करून घ्यावयाचे होतें ? ”

“ त्याला कोणतें काम करून घ्यावयाचे होतें तें सध्याच कळत नाहीं. बालय्या काय ? तो अगोदर पद्धत लावून ठेवणार आणि मग कांहीं दिवसानीं आपलें काम काढणार. ”

“ मग हे काय म्हणाले ? ”

“ मी सरकारी नोकर आहे म्हणून मी नजराणा घेणार नाहीं. आपणांस कचेरींत कांहीं काम असले तरी जें रास्त व्हावयाचें असेल तर होईल ; त्याच्या-साठीं नजराणा नको. ”

“ मग बालय्याला काय वाटलें ? ”

“ मग बालय्याला काय वाटायचें ? पण सध्याचे नायब तहशिलदार मोठे प्रामाणिक म्हणून गांवांत फार बोभाटा झाला आहे. ”

“ अहो, हा अनंतराव घरकुट्टयांचा मुलगा प्रामाणिक किती असणार तो माहितीच आहे, पण हा याचा एक डाव आहे. त्याला वाटतें कीं तो दुसऱ्या कुणास समजणार नाहीं पण माझ्या लक्षात येऊन चुकला आहे. ”

“ याच्या मनांतला काय डाव ? ”

“ याचा हेतु एवढाच कीं डेप्युटी कमिशनरसाहेब तपासणीला आले म्हणजे हे दिवटे मोठे प्रामाणिक असा बोभाटा साहेबांच्या कानावर जावा पण याला हे कुठें ठाऊक आहे कीं गांवांत जरी बोभाटा झाला तरी साहेबांच्या कानां-पर्यंत जायला किती आयास पडतात ? शिरस्तेदार किंवा दुसरे कोणी अधिकारी

जी साहेबाला माहिती देतील तीच साहेबाला माहिती. आणि कोणी कोणाचा चांगुलपणा दुसऱ्यापाशीं सांगण्याची खटपट करीत असतो का ? आणि जरी असला तरी त्याच्या बोलण्यावर कोणी विश्वास ठेवीत नाही. 'हा चांगला' असं जरी साहेबाला कोणी सांगितलं तरी सांगणारा कोणी स्तुति होते त्याचा हस्तक असला पाहिजे हा संशय साहेबाला आलाच."

"बरें याला आतां कबजांत आणण्यासाठीं कांहीं इलाज केला पाहिजे."

"हो, केला पाहिजे." पंतलुगारु म्हणाले.

"पण मला वाटतं आपण जर एक गोष्ट केली तर हा नोकरीत म्हणून टिकणार नाहीं."

"काय म्हणता गोविंदबापू ? तुम्हीं तर या सिरोंचा राज्याचे मुत्सद्दी, आपल्यापाशीं काय युक्ति आहे ?

"युक्ति आहे, पण शंका एवढीच पडते कीं फर्जीला वीरेंत काढावा कीं नाहीं ?"

बुद्धिवळांची रूपकें वापरलीं म्हणजे आपण मुत्सद्दी झालों असें त्यावेळच्या कांहीं लोकास वाटत होतें.

"यांत शंका ती काय पडायची ? अहो पोटचं जरी असलं तरी आडवं आलं असता कापून काढलंच पाहिजे. त्यात हें काहीं पोटचं नाहीं. बरं आपला उपाय तरी काय आहे ?"

"उपाय एवढाच की, साहेब तपासणीला आले म्हणजे आपण दौऱ्यावर जाऊन याला ठेवावं."

"वा ! खाशा, म्हणजे मी दूर असतांना गांवांतली आपल्या विरुद्ध असलेली मंडळी यानें नेऊन आयतीच साहेबांपुढें हजर करावीत, म्हणजे वीरेंत तो निघायच्या ऐवजीं आम्हींच निघणार."

"अहो, ऐकून तर घ्या ; साहेब आले असतां तहशिलीच्या ऑफिसच्या तपासणींतच एक दिवस जाईल. दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं आपण हजर असा

म्हणजे झालं. लोकाच्या कागाळ्या कांहीं साहेब पहिल्याच दिवशीं ऐकत नाहींत. ”

“ मग आपण युक्त्या काय योजणार ? ”

“ अहो साहेब कसा काय तापट गृहस्थ आहे हें आपणास ठाऊक आहे. आणि बंडोपंताला अधिकारी पुरुषांची व्यवहारनीति ठाऊक नाहीं. वरिष्ठाशी नम्र असलं पाहिजे, आणि मग प्रजेपासून हवे तसे पैसे काढावे. हा करणार सगळं उलटं, जी सरकार म्हणून वरिष्ठाला म्हणण्यांत याला लाज वाटते.”

“ हो बरोबर, शिवाय याला साहेबाची खुशामत करणं जीवावर येईल, आणि त्यामुळें काहीं तरी खटका उडेल. ”

साधारणपणें गोविंदबापूंच्या अजमासाप्रमाणेंच बऱ्याच गोष्टी झाल्या. डेप्युटी कमिशनरसाहेब आले, तहशिलदार बाहेरगावीं होते तेव्हां काम नायब तहशिलदाराच्या अंगावर पडलें. साहेबाच्या सरबराईसाठी काय काय गोष्टी पाहिजेत इत्यादि गोष्टी येऊन बटलरानें सांगितल्या. ताबडतोब लागणाऱ्या आणि अत्यंत अवश्य वस्तु नायबसाहेबांनी दिल्या आणि इतर सर्व गोष्टींच्या मागणी-संबंधानें साहेबांची सही घेऊन ये म्हणून सागितली. बटलराला त्याचा मोठा राग आला. कारण पुष्कळशा गोष्टी साहेबाच्या नांवावर घेऊन त्या त्यास गिळंकृत करावयाच्या असत. “ मी डेप्युटी कमिशनर साहेबांचा बटलर, तहशिलदार देखील माझ्या कह्यांत असतात, आणि नायब तहशिलदारासारख्या मनुष्यानें माझें म्हणणें ऐकूं नये ! ” इत्यादि विचार त्याच्या मनात येऊन त्यानें नायब तहशिलदाराचे वाईट होईल असें आपण काहीं तरी करावें असें ठरविलें. संध्याकाळी साहेब “ करी चावल ” खात असतां त्यांत खडे निघाले. तेव्हां तसें का म्हणून साहेबानीं विचारलें. बटलर सांगतो, “ नायब तहशिलदारानें चावलहि वैसा भेजा उसमेसे मैने बहोत खडा निकाला, लेकिन क्या करना ! ” असें उत्तर दिलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहा साहेबाच्या समोर आणला. त्याबरोबर दूध नव्हतें. “ क्या करना साब ये देखो ” म्हणून त्यानें नासलेलें दूध दाखविलें त्या दुधात सिरका आणि मीठ घालून दोन तासांत खराब करून

ठेविलें होतें. शिवाय कांहीं पाहिजे असले म्हणजे नायब तहशिलदार खुद्द साहेबांची चिठ्ठी मागतो म्हणून सांगितलें. बटलरला ठाऊक होतें कीं, मागणीची चिठ्ठी देणें साहेबाला नको असतें. साहेबाची नातीं बटलरला जेवढी ठाऊक होती तितकी वीरण्णासही ठाऊक नव्हती. साहेबास असें वाटे कीं, आपणास माल मिळावयाचा तो फुकटांत मिळावा. आपणास किंमत द्यावी लागूं नये. तहशिलदारानें आपणासाठीं लागणारा माल लोकास धाकदपटशा देऊन त्यापासून उपटावा व आपल्यापुढें हजर करावा. फुकटात दुसऱ्याकडचा माल काढावयाचा झाला आणि तो काढतांना बटलरनें आपलीहि एखादी गरज भागवून घेतली तरी चालेल. पण आपल्या हातची चिठ्ठी जावयास नको. त्याला हेहि ठाऊक होते कीं, डेप्युटी कमिशनर तहशिलदाराकडून माल मिळविणार तर तो त्यांत काहीं गोष्टी स्वतःसाठीं मिळवून ठेऊन घेणार व तहशिलदारानें कांहीं असा प्रकार केला तर आपणांस लाचलुचपत व लुबाडणें यांची चीड आहे असें प्रदर्शन करण्यासाठी डे. कमिशनर त्याच्यावर गुरगुरेल, चोरी करतोस म्हणेल, नोकरीवरून डिसमिस करवीन, असा धाक देईल पण कांहीं एक करणार नाहीं. आणि कधीं साहेब रागावले म्हणजे तहशिलदार, नायब तहशिलदार वगैरे मंडळीस बटलरसाहेब धीर देत असत. आणि बटलर मंडळीचें त्यामुळें तहशिलदारांवर वजनही असे. त्यामुळें बटलरनें कांहीं गोष्ट मागितली म्हणजे ती मागणी म्हणजे प्रत्यक्ष साहेबाचा हुकूम असें मामलेदार तहशिलदार समजत. आणि बटलरपाशीं मित्रासारखे वागत एवढेंच नव्हे तर बटलरहि आपला मालक असें समजत. कधीं कधीं साहेबास असें वाटलें की रात्रीं बारा वाजेपर्यंत तहशिलदारानें आपल्याबरोबर रहावें आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं सहा वाजतां हजर रहावें म्हणजे त्या वेळेचे मामलेदार बटलर किंवा घोडेवाला याच्या खोलींत निजत असत आणि त्यांच्याशीं मोठ्या सलगीनें वागत. साहेबाच्या अंतेवासी मंडळीचा असा सन्मान जुन्या काळची रुबाबदार दिसणारी मंडळी ठेवीत असत. तशी सरकारची एकनिष्ठ नोकरी पुढें ‘ शिकलेल्या ’ मंडळीकडून कमी कमी होत चालली आहे. जुन्या रुबाबदारांनां ही बटलर-जोपासना आवडे अशांतला भाग नाहीं पण “ समर्थाचिया घरचे श्वान त्यास सर्वहि देती मान ”

असें वाक्य म्हणून आपल्या मनाची समजूत करून घेत. आपणाला इंग्रजांची नोकरी करावयाची आहे ना तर त्याचा कुत्राहि आपणांस देवरूप आहे ही सेवा-धर्माची उच्च भावना, शिकलेल्या मंडळीच्या ठायीं वागत नाहीं.

दुसऱ्या दिवशीं नायब तहशिलदाराची आणि डेप्युटी कमिशनरची भेट झाली तेव्हां साहेब गरम, तरी सौम्यपणानें म्हणाले, "मि. घरकुट्टे, तुम्ही तांदूळ चांगले नाहीं पाठविले ?"

"मी चांगले तांदूळ पाहून आणि आमच्या घरच्या मोलकरणीकडून निवडून पाठविलें."

"त्यांत खडे होते."

"हें शक्य नाहीं."

"मी बोलतो खडे होते आणि तूं म्हणतोस कीं शक्य नाहीं म्हणून."

"आपण म्हणता त्यांत खडे होते तर ते असलेच पाहिजे, पण मी पाठविले तेव्हां त्यात खडे नव्हते."

"इस्मायल."

"साब" म्हणून बटलर आंत आला.

"इस्मायल, यानीं आणून दिलेले तांदूळ कसे होते ?"

"त्यांत खडे होते साहेब."

"तर मग मी ते आणून दिल्यानंतर आत गेले असले पाहिजेत."

"तर मग काय मी घातले ! वाहवा महाराज."

"तर मग मला आपल्या मोलकरणीला विचारलें पाहिजे."

"बरें आजचें दूध का नासकें होतें ?" साहेबानीं विचारलें.

"मला त्याचें आश्चर्य वाटतें."

"तुम्हाला कोणत्याहि कामाबद्दल मेहनत स्वतः घ्यायला नको आणि मग कांहीं वाईट गोष्ट उघडकीस आली म्हणजे त्याचें आश्चर्य वाटतें."

" मला स्वतः मेहेनत करावयास हवी की नको यासंबंधानें यां तहशिलींतील लोकमत निराळें असेल. "

" तुम्हीं माझ्या मतापेक्षा लोकाच्या मताला अधिक मान देतां काय ? "

" मी स्वतः कर्तव्यबुद्धीनें काम केल्यामुळें माझ्या मनाला उत्पन्न होणाऱ्या शांतीला सर्वांत अधिक मान देतों. "

" आणि माझ्या मतास मान देत नाहींस, तर मग सरकारी नोकरींत कशाला शिरलास ? "

येणेंप्रमाणें थोडीशी खडाजंगी झाली.

संध्याकाळीं जेवण चागलें झालें होतें. साहेब जेवताना खूष होते. तेव्हा इस्माईल म्हणतो " पहा, नायब तहशिलदारास आपण बोललां तर संध्याकाळच्या स्वैपाकाला चागलें सामान आणून दिलें. नायब तहशिलदार विलक्षण मनुष्य दिसतो. आज मी बाजारातून चाल्लों होतो तेव्हा असें कळलें कीं, काहीं लोकाना साहेबास भेटण्यास यावयाचें होते पण नायब तहशिलदारानें लोकांत धाक घालून ठेवला कीं जर कोणी साहेबापाशीं येऊन त्याच्या विरुद्ध तक्रार केली तर तो त्या लोकांस चागलें शासन करील. "

" काय, तो असें बोलला ? "

" होय साहेब. "

झाले. दुसऱ्या दिवशी सकाळी तहशिलदारसाहेब आले तेव्हां त्यानीं प्रथम साहेबांच्या सेवेला मी नव्हतो, कामामुळें हुजुरच्या सेवेंत अंतर पडलें असावें इत्यादि गोष्टी बोलून साहेबांची क्षमा मागितली. नायब तहशिलदारास कामावर पाठविलें असतें, तथापि बाहेरगांवीं जावयास ते फार कुरकुरतात, असेंहि सांगितलें. त्याच दिवशीं पुढें नायब तहशिलदाराची कित्येक रेकॉर्डस् डेप्युटी कमिशनरसाहेबानीं तपासले आणि केव्हां त्यांत कांहीं चुका आढळून आल्या तेव्हां " तूं मूर्ख गद्धा आहेस " असें साहेब बोलले. " साहेब आपण जरा संभाळून बोला," असें बंडुनाना म्हणाले. तेव्हां,

" सुवरके अवलाद, काम येत नाहीं आणखी उद्धटपणा. "

" सुवरके अवलाद, " हे शब्द ऐकतांच बंडुनानानीं रुळ उगारला.

त्याचा परिणाम एवढाच झाला कीं थोड्याच दिवसांत राजीनामा देण्यास मि. घरकुट्टे यांस सांगावें या अर्थाचा हुकूम चांद्याहून सिरोंच्याच्या तहशिलींत आला. याप्रमाणें नोकरीचा वृत्तात आटपल्यावर आपल्या मुलानें आता पुढें काय करावें म्हणून अनंतरावांस काळजी उत्पन्न झाली.

याच सुमारास आपल्या देशात औद्योगिक उन्नतीसाठीं कांहींतरी करावें म्हणून चळवळ सुरू झाली. नागपुरांत पुण्याच्या लोकांची स्वदेशीची वाच्यता ऐकणारे लोक बरेच होते. शिवाय पुण्याकडच्या लोकांनां इकडे आल्यावर नोकऱ्याहि मोठमोठ्या मिळाल्या. पुष्कळानीं वकिलींत पैसे बरेच मिळविले. आता या पैशाचा विनिमय कसा करावा म्हणून विचार उत्पन्न होऊं लागले. वऱ्हाड-नागपूरकडे आलेल्या पुष्कळ लोकाचा आणि त्यात विशेषेंकरून कोंकणस्थ ब्राम्हणांचा येथें कायमचे होण्याचा इरादा नव्हता.पुष्कळास असें वाटे कीं, पैसे मिळविल्यानंतर आपण परत मुंबईस, कोंकणांत, साताऱ्यास अगर पुण्यास — जेथून आपण आलो तेथें परत जावें. या बुद्धीने त्यांनीं इकडे जमिनी देखील फारशा खरेदी केल्या नाहींत. हिंगणघाट इत्यादि गिरण्यांत त्यांनीं शेअर्स घेतले. गव्हर्नमेंट प्रॉमिसरी नोटा आणि बॅंकातून ठेव इत्यादि मार्गांनीं आपल्या पैशाचा उपयोग केला. त्या लोकांनीं प्रथमतः इकडे घरे देखील बाधली नाहींत तथापि जसजसा वृद्धापकाल येऊं लागला आणि झालेल्या मुलाबाळाची भक्ति येथेंच राहण्याकडे दिसूं लागली आणि आपल्या गांवच्या आप्तेष्टांच्या मृत्यूंची पत्रें येऊं लागली तसतशी त्याची परत जाण्याची उत्कंठा कमी होई. पुष्कळांनीं घरें बांधली ती देखील फारच उशीरानें बाधली. मी जमिनी दहापांच वर्षें अगोदर घेतल्या असल्या तर आज लाख दोन लाखांचा धनी असतों अशा प्रकारचे उद्गार पुष्कळांकडून ऐकूं येतात.

याशिवाय इंग्लंड देशाशीं औद्योगिक बाबतींत टक्कर दिली पाहिजे अशा तऱ्हेची विधानें वारंवार होत असत. कापूस वऱ्हाडांत पिकतो, तो बिलायतेस

जातो आणि तिकडून माल येतो. विलायतेंत मजूराचे दर हिंदुस्थानच्या चौपट आहेत असें असतां आपण येथेंच जर माल बनविला तर किती तरी फायदा पडेल इत्यादि गोष्टी वारंवार ऐकूं येत आणि अशा काळीं कापडाच्या गिरण्या काढण्याची इच्छा वऱ्हाडभर आणि नागपूरमध्ये देखील चांगली जागृत झाली होती.

" भोंसलेविजय मिल्स " च्या स्थापनेची हकीकत देण्यास आणखी आयास नकोत. ही गिरणी वऱ्हाडांत मूर्तिजापूर येथें स्थापन करण्यांत आली. मूर्तिजापूर हें रेल्वेचे ठिकाण असून कारंजाकडून येणारा कापूस मुंबईकडे जावयास मूर्तिजापूरास येतो आणि त्यामुळें हें ठिकाणहि चांगलेंच होते.

रावसाहेब अनंतराव घरकुट्टे हे तहशिलदार आणि एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर या नात्यानें पुष्कळ ठिकाणी हिंडले असल्याकारणानें, त्याच्या ओळखी पुष्कळ होत्या आणि त्यानीं त्या गिरणीचे पुष्कळ शेअर्स सहज खपविले. शिवाय " भोंसलेविजय मिल्स " हें नांव गिरणीस दिलें असल्याकारणानें नागपुरच्या महाराजाच्या कुटुंबातील पुष्कळ मंडळींनीं आणि त्यांच्यावर भक्ति असलेल्या आसपासच्या मालगुजारानीं पुष्कळ हिस्से घेतले. शिवाय बंडुनानाविषयीं सिरोंच्याच्या कांहीं श्रीमान कोमटी मंडळींत चांगलें मत झालें असल्यामुळें त्यांच्यामध्येंच पंचवीस तीस हजाराचें शेअर्स खपले. असें होऊन एकदांची कंपनी चांगली स्थापन झाली. नागपूरासच " होरमसजी पेनांगवाला " नांवाचा एक पारशी कत्रांटी रहात असे त्याचा भाऊ मुंबईत यंत्राचा दलाल होता. आणि त्याच्या दुकानांत त्याचीहि पाती होती. मिल जगो अगर तरो, मिलची मशीनरी आणण्यांतच आपणांस दहापांच हजार रुपये मारतां येतील ह्या हिशोबानें होरमसजीकाकानें २५० रुपयांचा एक असे दहा भाग घेऊन तो डायरेक्टर बनला. या बामण मंडळीस असें वाटलें की पारशी हा व्यावहारिक हुषारी ( बिझिनेस टॅक्ट ) चा मनुष्य आहे, तेव्हां त्याच्या योगानें गिरणी चांगली चालेल. या पारशाची खरी हुषारी गिरणीचा डायरेक्टर बनण्यांतच होती, हें मात्र फार जणांच्या लक्षांत आलें नाहीं. होरमसजीचें खरें आडनांव " मुरगीचोर " असें होतें. पण त्याचा बाप पांच महिने पेनांगला कारकून म्हणून

एका गोऱ्याबरोबर गेला होता तेव्हांपासून याच्या बापानें "पेनागवाला" हें नांव धारण केले होतें. तेंच नांव पुढें मुलानें चालविलें. अनंतराव घरकुट्टे यांनीं पुष्कळच शेअर्स घेतले होते. तेव्हां तें गिरणीच्या डायरेक्टरबोर्डाचे चेअरमन झाले.

तहशिलदारी व इतर शासनविषयक कामें करतांना धडपड करण्याची संवय आमच्या रावसाहेबानां झालीच होती आणि म्हाताऱ्यानें जरी पेन्शन घेतलें तरी दहादहा तास ऑफीस काम करण्याची त्यांची उमेद होती. गिरणीचें काम त्यांच्या नेतृत्वाखालीं चागलें चालले असतें, तथापि रावसाहेबाना दुर्दैवाने दुसऱ्या अनेक भानगडी सुचल्या. ऑनररी मॅजिस्ट्रेटी त्यांनीं मिळविली आणि जे काम ते पूर्वी पैसे घेऊन करीत होते तें फुकट करूं लागले. त्याचे चिरंजीव बंडुनाना हे गिरणीचें मॅनेजर होतेच. बोर्डानें त्यांचा पगार दोनशें रुपये ठरविला. त्याचा कमींत कमी दोनशें रुपये पगार ठरविण्याच्या बाबतींत सिरोंचा येथील कोमटी डायरेक्टरानीं पुढाकार घेतला होता.

---

### प्रकरण ३ रें

## प्रियंवदेचा जीवितक्रम

वाचकहो, मला वाटतें की तुमच्यांतील पुष्कळ मंडळी ऑफिसांत जाऊन कारकुनी करणारी असतील, आणि ऑफिसच्या कटकटींतून सुटण्यासाठीं तुम्हीं गोष्टीचीं पुस्तकें वाचणार, तेव्हां पुन्हा ऑफिसातल्या गोष्टीचीच कटकट तुमच्या कानापांशीं लावली तुम्हाला चीड येणार हें स्वाभाविकच आहे. असो, झाले तें झालें, ऑफिसांतून तुम्हाला आतां घरींच आणतों आणि गृहसौख्य दाखवितों, आतां तरी माझे थोडेसें आभार माना !!!

तुम्हांला अशी एक पंचाईत पडली असेल की, प्रियंवदेसारखी रसिक आणि विनोदी मुलगी नवरा विलायतेंत गेला असतां काय करीत बसली

असेल ? नको, उगीच तर्कवितर्क नको. खरें खरें काय तें तुम्हाला सांगतोच.

प्रथमत एक गोष्ट सागावयाची म्हटली म्हणजे, प्रियंवदा नागपूर सोडून साताऱ्यास आपल्या माहेरीं गेली नाहीं. तिची सासू तिला माहेरी पोंचवावयास तयार होती. ती म्हणाली " बये, तुझा नवरा विलायतेस गेला. तूं जर कांहीं दिवस माहेरी जाशील तर तुला कदाचित् येथल्यापेक्षा बरें वाटेल." प्रियंवदेने उत्तर केले " सासूबाई, माझ्या वडिलानां आणखी दोन मुली व तीन मुलगे आहेत. तेथे दिनकर भावोजी शिवाय आपल्याजवळ कोण आहे ? शिवाय माझ्या दोघी बहिणी आणि भाऊ आनंदात असतील, त्याना माझे मन काय कळणार आहे ? मी विचारात गढून गेले असले तर तीं हंसत खिदळत असतील. त्याच्या वियोगाने मला जें दुःख होतें ते आणखी जर कोणाला तीव्रतेनें होत असेल तर तें तुम्हाला. यासाठीं तुम्ही आणि मी अशाच दोघीजणी बरोबर असलों म्हणजे बरें. शिवाय त्यांना मी दर आठवड्याला पत्र लिहिणार. मी जर माहेरीं असले तर येथची हकीकत त्यास सविस्तर कळविणें कसें शक्य होईल ? दिनकर भावोजीना तुम्हीं पत्रें लिहावयास सांगाल. पण पुरुषांनां कधीं चांगलीं पत्रें लिहिता येतात काय ? आमचा दादा मुंबईतल्या कॉलेजात शिकत होता. बाबानीं सागितल्याप्रमाणें त्याचें पत्रहि दर आठवड्याच्या आठवड्याला येत असे, पण आंतला मजकूर म्हटला म्हणजे छापील नमूना. म्हणे ' मी खुशाल आहे, प्रकृति बरी आहे. अभ्यास बरा चालला आहे. काळजी करूं नये.' एवढ्या मजकुरापेक्षां अधिक एखादा शब्द असेल तर शपथ. आमच्या वडिलानी कितीदा तरी त्याला म्हटले, " बाबारे, जर तुला जर एवढेंच लिहावयाचें असेल तर छापखान्यातून कार्डे छापून तरी घे. दर आठवड्याला तारीख घालावी आणि कार्डे टाकावीं. " तरी आमच्या दादानें कार्डेहि छापून नेली नाहींत आणि ' नवलविशेष कांहीं नाहीं ' हें एक वाक्य मात्र अधिक घालण्याचे सुरू केलें. दिनकर भावोजीनें असेंच होईल. मध्यें मी साताऱ्यास असताना मला नव्हती त्यांचीं पत्रें येत ? पत्रांतला मजकूर सारा तीन ओळी. छे ! त्याना दर आठवड्याला पत्रें पाठविण्याचें काम मलाच केलें पाहिजे.

त्यांना जर पत्रें पाठवावयाची तर त्यांनां अधिक उत्कंठा कोठल्या माहिती-संबंधानें ? सातारच्या की येथच्या ? सातारची बातमी आपणांस पत्रांतून कळतेच. त्या पत्राचा सारांश तिकडे पाठवूं अगर प्रसंगीं पत्र वाचून तेंच तिकडे पाठवून देऊं. मी दिनकर भावोजीना सांगणार आहे कीं तुम्हाला त्यानां लांबलचक पत्र पाठवावयाचे नसेल तर नका पाठवूं. गावांतील जी बातमी समजली असता त्याना बरें वाटेल ती बातमी मात्र तुम्ही पैदा करून आणून मजपुढें हजर करा, म्हणजे मी ती बातमी त्याना यथासांग कळवीत जाईन."

प्रियंवदा पडली अर्वाचीन कालांतील प्रोषित भर्तृका. माझा "प्राणसखा रंगेला कोठें गेला ?" म्हणून ती शुकास अगर सारिकेस प्रश्न विचारीत नव्हती, अथवा "प्रियकराचा घरीं यायचा रस्ता चालायला सोपा व्हावा म्हणून कीं काय नेत्ररूपीं कमले दररोज रस्त्यास अर्पण करावीं" असें करीत नव्हती. कारण तिला नवरा परत केव्हां येणार हें पक्कें ठाऊक होतें. एवढें मात्र खरें कीं,

अपि वीक्षितुमक्षमा सखी त्वदभिन्नेव पुरा विदर्भजा ।
भवता रहिता दमस्वसा नृपलक्ष्मीश्च गताद्य शोच्यताम् ।।

इत्यादि जुने विप्रलंभशृंगारात्माक श्लोक कधीं कधीं मनाशीं पुटपुटे आणि नवीन नवीन शोधून वाची. कारण वियोगामुळें दुखविलेल्या अंतःकरणाविषयीं तिच्या मनांत एक तऱ्हेचें सौहृद उत्पन्न झालें होते. दुखावलेलें अंतःकरण मग अर्वाचीन असो अगर प्राचीन असो त्याविषयी तिला सहानुभूति वाटे.

प्रियंवदा दर आठवड्यास रामभाऊस पत्रें पाठवी. त्या पत्रात घरची माहिती चांगली असे, ती रोज १–२ पाने लिही आणि आठवड्याच्या शेवटी भेंडोळेच्या भेंडोळें रामभाऊस पाठवी. तिची पत्रें म्हणजे वर्तमानपत्रांवरहि ताण असे. फावल्या वेळांत सुशिक्षित बाई काय करते या प्रश्नास उत्तर देण्यासाठीं स्त्रियांचा तोंडपुजेपणा करणाऱ्या मुंबईच्या कित्येक मासिकांतून सुशिक्षित स्त्री फावल्या वेळात शाळा काढते आणि इतर स्त्रियांस शिक्षण देते अशी काल्पनिक चित्रें काढलेली असतात. आमच्या प्रियंवदेचें अशा प्रकारचें कोणतेहि कार्य नव्हतें.

ज्यांनां खऱ्या सुशिक्षित आणि रसिक स्त्रियांची माहितीच नाहीं, आणि ज्यांना सुशिक्षित स्त्रीचें चरित्र मनोहर कसें करावें हेहि समजत नाहीं अशाच कादंबरीकाराकडून वरील प्रकारचीं चित्रे निघावयाचीं. प्रियंवदा लोककल्याणाकरिता निघालेली स्त्री नव्हती. तिचे मन घरात आणि नवऱ्यात गुरफटलेले होतें. नवरा गेल्यानंतर काहीं दिवसांनीं तिनें कित्येक मराठी नकाशे आणविलें आणि नवऱ्याची एडन, सुवेझ पोर्टसय्यद, मसीना, नेपल्स इत्यादि शहरातून पत्रें आलीं म्हणजे नेपल्स कोठें आहे, मसीना कोठें आहे हें आपल्या सासूस दाखवित बसे. शिवाय जीं जीं ठिकाणें नवरा हिंडला त्याची स्थलवर्णनें मराठींत कोठें असलीं आणि आमच्या नागपूरच्या महालांतल्या भिकार लायब्ररींत सांपडलीं तर तीहि वाचून दाखवी. आपल्या नवऱ्याला कोणकोणत्या इमारती इंग्लंडात दिसतील याचा अजमास करून त्यांचीं चित्रें मिळवून ती आपल्या सासूस दाखवी. कधीं कधीं आपण अमुक पाहिले तमुक पाहिले काय इत्यादि प्रश्न आपल्या नवऱ्यास विचारण्यासाठीं त्याच्या टिपा करून घेई. शिवाय इंग्लंडात परिस्थिति कशी असते याची कल्पना सासूस देण्यासाठी यावर पुस्तकें वाचून दाखवी. एकदां तिनें बॅरिस्टर लोक वृद्ध विद्वान दिसण्याकरतां पांढऱ्या अंबाडीचे टोप घालतात त्या टोपासह एका मनुष्याचे चित्र पाहिलें. तेव्हां तिनें आपल्या नवऱ्याच्या फोटोवरून तो बॅरिस्टर झाला असता कसा दिसेल याचें काल्पनिक चित्र तयार केलें, तें आपल्या सासूस दाखविलें आणि पुढील डाकेनें विलायतेस देखील रवाना केलें. शिवाय आपल्या सासूस पाश्चात्य समाजाची चांगली कल्पना व्हावी म्हणून काहीं इंग्रजी कादंबऱ्याच्या गोष्टी विस्तृत तऱ्हेनें सासूस समजावून दिल्या. अर्थात् या सर्वांच्या योगानें सासूस मौज वाटे आणि प्रसंगीं काळजी उत्पन्न होई. तिनें एक गोष्ट अशी वाचून दाखविली कीं तींत एक बॅरिस्टर होण्यासाठीं जेवणें झोडणारा विद्यार्थी एका नटीच्या मागें लागला होता. बिचाऱ्या आईला हें वाचून मोठी काळजी उत्पन्न झाली. आमचा रामू तर नाहींना तसा लागणार! त्याला तर नाटकें पाहण्याचा नाद आहे! थोडीबहुत तीव्र चिंता आमच्या प्रियंवदेच्याहि मनांत उत्पन्न झाली! आणि तिनें यासंबंधानें एखाद्या पत्रांत प्रश्न विचारण्याचें मनांत योजिलें.

प्रोषितभर्तृका या नात्यानें झालेली प्रियंवदेची कारकीर्द बरीच मोहक आहे. तिची कल्पना पुढील एका प्रकरणावरून येईल. येथें एकच गोष्ट नमूद करितों.

प्रियंवदेचा भाऊ डॉ. भुस्कुटे हा मुंबईचें आपलें शिक्षण संपवून कांहीं दिवस बडोद्यास नोकरीला होता. पुढें त्यास असें वाटले कीं, आतां आपण नोकरी न करता स्वतंत्र धंदा करावा, व या हेतूने तो नागपूर येथें आला. त्यानें आपल्या बरोबर एक गवई देखील आणला होता, त्याचें नाव हरिभय्या मोघे. हरिभय्या मोघे हा मूळचा सागर येथील रहाणारा. गोविंदपंत बुंदेले यांच्या बरोबर बुंदेलखंडांत बरीच कऱ्हाडी मंडळी गेली, त्यापैकीं हा एका घराण्यांतला मनुष्य. मराठी राज्याच्या सूर्यास्ताबरोबर जेथें म्हणून मराठी मंडळी आहेत त्यांची दिवसानुदिवस वाताहतच होत आहे. सागरकडील महाराष्ट्रीय कुटुंबाची हीच स्थिति आहे. कोणी कोणच्या निमित्तानें कोठेंतरी जाऊन कांहींतरी करीत असतो. हरिभय्याची स्थिति येणेप्रमाणेंच होती. जुन्या सागरकर मंडळींत जरा थोर पदवीस साजेलशा गायन-वादनादींच्या अभिरुचि बऱ्याच होत्या. त्या गतवैभव सागरात देखील अंशेकरून राहिल्या. हरिभय्याला गायनाचा लहानपणापासून नाद असे. गायनासाठीं म्हणून घर सोडून तो बडोद्याला जाऊन राहिला, पुढे राजमहेंद्रि, काकीनाडा इत्यादि ठिकाणीं जाऊन त्याने तेलगू गाणें अभ्यासिलें आणि पुढें बडोद्यास जाऊन गाणें अधिक शिकण्यासाठीं म्हणून राहिला. थोडेंबहुत गाणें शिकवून तो पोटापुरतें दोन पैसे मिळवीत असे. डॉ. भुस्कुटे हे व हा एकाच मोहोल्यांत रहात असत आणि डॉ. भुस्कुटे हरिभय्यापाशीं थोडेबहुत गाणे शिकत.

डॉ. भुस्कुटे हे जेव्हां नागपुरास यावयास निघाले तेव्हां हरिभय्यानें बरोबर येण्याची इच्छा प्रदर्शित केली. तो म्हणाला, "मी आपणांस शिकवीतच राहीन आणि शक्य झाल्यास नागपुरास एखादी शाळा काढीन म्हणजे माझ्या चरितार्थाची चांगली सोय होईल. तेथें आमची सागरची कांहींतरी मंडळी असतीलच त्यांची मला मदत होईल." डॉ. भुस्कुटे यानां ती कल्पना पसंत

पडली. त्यांनां वाटले आपली बहीण प्रियंवदा हिलाहि गाण्याचा नाद आहे, तेव्हा ती देखील याच्यापाशीं शिकेल. परंतु आपल्या बहिणीचे शिक्षणासंबंधी विचार काय आहेत याची त्यांस कल्पना देखील नव्हती. डॉ. भुस्कुटे आले तेव्हां प्रियंवदेचा आणि त्यांचा संवाद झाला होता तो येणेप्रमाणे :—

" दादा तूं जर त्यानां घेऊन आला आहेस तर त्याना राहूं दे या घरीं काहीं दिवस, सासूबाई काहीं त्याला नाहीं म्हणणार नाहींत. "

"पण तूं त्याच्यापाशीं कांहीं शिकशील काय ? शिकण्यास सासूबाई परवानगी देतील काय ? "

"परवानगीची मला फारशी अडचण नाहीं, मी विचारलेंच तर त्या कांहीं नको म्हणणार नाहींत, पण मला गायन कांहीं अधिक शिकायचेंच नाहीं. "

" ते कां ? "

" त्याचा उपयोग काय ? "

" कां अमूक एक शिकल्यापासून उपयोग काय म्हणून तू देखील कां विचारायला लागलीस अडाणी बायकांप्रमाणें ? "

" अडाणी बायकांप्रमाणें का ? मी अडाणी नाहीं नाहीं म्हणून तुला कोणी सांगितलें ? "

" पुरुष बी. ए. झाला तरी देखील त्याला अडाणी अगर अशिक्षित म्हणण्यास लोक कमी करीत नाहींत. बायकांनां पांढऱ्यावर काळे करतां येऊं लागले म्हणजे त्यास मनोरंजन मासिक आणि सुधारक पत्रें देखील सुशिक्षित म्हणूं लागतात. तुला अडाण्यांत काढायला हरकत नाहीं, परंतु मॅट्रिक झालेल्या मुलीस अडाणी म्हणण्याची फॅशन नाहीं, आणि म्हणून तुला मी अडाणी म्हणत नाहीं. "

" मी जर अडाणी नाहीं तर मग माझा प्रश्न शहाणपणाचा आहे, आणि मग त्याला उत्तर दे. "

"जें संगीत शास्त्र तूं आतांपर्यंत शिकलीस, तेवढ्याचा मात्र तुला उपयोग होता आणि आणखी शिकशील त्याचा नाहीं ?"

"हो अगदीं बरोबर बोललास."

"अगदी बरोबर ?" डॉक्टरसाहेब ओरडले.

"परवां मी बॉयॉलजीवर – त्याला मराठी भाषेचे अभिमानी काय बरं म्हणतील – हो आठवलं, त्याला म्हणतात "जीविशास्त्र", त्या जीविशास्त्रावर एक पुस्तक वाचलं. त्या पुस्तकांत फुलाला रंग कां असतो, याला उत्तर दिलें आहे कीं फुलांमध्ये देखील पौरुषमय आणि स्त्रीस्वरूपाचे पराग असतात, ते दोन्ही प्रकारचे पराग भ्रमरसाहाय्याने एकत्र झाले म्हणजे ते झाड स्वत:शी सदृश अशा प्रजोत्पत्तीस समर्थ होते. फुलांचा वास व रंग पुष्कळ अंशी मदन-सहाय्यक म्हणजे प्रजोत्पत्तीस मदत करणारा जो भ्रमर त्याच्या आकर्षणासाठीं आहे, तसेंच पक्ष्यांमध्यें जे चित्रविचित्र पक्षी आपणास दृष्टीस पडतात, त्यांतील नर जातीचा रंग मादीस आपल्याकडे ओढण्यासाठीं असतो. त्याप्रमाणेंच पक्ष्यांचें सुंदर गायन देखील विरुद्ध जातीस आपल्याकडे ओढून संयोग घडविसाठींच असते. त्या पुस्तकाचा विद्वान ग्रंथकाराचं असे म्हणणे आहे कीं, मानव कोटींत देखील स्त्रियाचं सौंदर्य त्यांचा नट्टापट्टा, त्यांनां शिकविलेलें नर्तन व संगीत याचा दुसरा तिसरा हेतु कांहीं नाहीं. स्त्री लाजाळू असते आणि तिला पुरुषाकडे जाऊन वैवाहिक मागणी करिता येत नाहीं. पुरुषाला कसें तरी करुन आपल्याकडे ओढणं तिला अवश्य आहे आणि एवढ्यासाठींच तिला स्वतःला मोहकता आणणें आणि नखरा करणं अवश्य आहे! तुला जास्त सांगायला नको. तूं तर जीविशास्त्र शिकला आहेस ना ?"

"काय तूं फाजील मुलगी झालीस !"

"गेल्या सालीं वैद्यांस शिव्या देतांनां तूं आपल्या शास्त्रज्ञतेचा केवढा डौल करीत होतास ; मी शास्त्रीय विचारसरणी गायनवादनाच्या बाबतींत लावली तेव्हां मी झालें फाजील."

"तुला फाजील म्हणूं नये तर काय म्हणावें? अग तूं कदाचित म्हणशील की माझें बोलणें खरें आहे, पण तेवढ्यानें कार्यभाग होत नाहीं. कारण बायकांनीं खरे बोलावें असें थोडेंच कांहीं आहे ?"

"मग बायकांनीं कसें बोलावे ?"

"बायकाच्या तोंडीं जी योग्य भाषा म्हणून ठरली आहे ती वापरली पाहिजे. ज्या गोष्टींचें अज्ञान पुरुषासमक्ष दाखविलें पाहिजे म्हणून ठरले आहे त्या गोष्टींत अज्ञान हें बायकांनीं दाखविलेंच पाहिजे. बरे असो; आतांपर्यंतचें संगीतज्ञान तुला अवश्य होतें आणि आतां मात्र अधिक वाढविणें अवश्य नाहीं असें म्हटलेंस तें का ?"

"कां म्हणजे, पुरुषाकर्षणाच्या कामांत मला केव्हांच यश आलें आहे. आणि मला नवराहि माझ्या मनाजोगता मिळाला आहे, तो असा चांगला वेडबंबू आहे की काय सांगूं ? मी किती वेडी असले तरी मला तो गोड समजून घेतो. नवऱ्याचें मन संतुष्ट राखण्यासाठीं मला आहे यापेक्षां अधिक संगीताची गरज नाहीं, आणि मला असें वाटतें कीं बऱ्याच बायकानां संगीतादि गोष्टी शिकण्याची अवश्यकताच नाहीं."

"ह्या गोंडवनांत येऊन आमची प्रियंवदा मात्र अगदीं मागासलेल्या विचाराची बनली. सुधारणादेवीच्या अत्युत्कृष्ट उदाहरणानीं इतका ताळ सोडला हें पाहून सुधारणादेवीनें आतां खुशाल आत्महत्या करावी." डॉ. भुस्कुटे हंसतहंसत म्हणाले.

"बाबारे तुझी वाखाणणी करण्याची तऱ्हा तरी किती विचित्र ! मी एक साधारण शिकलेली बाई आणि ती झाल्ये 'सुधारणा देवीचें उदाहरण.' मी तुझी बहीण, तूं माझा भाऊ, म्हणून ठीक आहे, नाहीं तर तुझी गणना मला, तरुण बायकाशीं बोलतांना वाटेल तशी खुशामत करणाऱ्या वेड्या पोरांत लागली असती."

"बरें, तें राहूं दे, माझे दोष काढायला फार सोपें आहे. मी पडलों डॉक्टरभाई. वादविवाद करण्याची हुशारी मला नाहीं, पण तूं एवढें साग कीं, स्त्रियांनीं काय शिकावें म्हणून सांगणारे विद्वान ते सारे वेडेच ?"

"अरे बाबा, ते सारे पडले ग्रांथिक विद्वान. बायकी शहाणपण त्यांनां कुठें आहे? शिवाय बायकांनीं काय शिकावे यासंबंधीच्या आमच्या लोकांतल्या कल्पना पूर्वापार ग्रंथातून घेतल्या आहेत की 'ग्रजी शाळा पाहून त्यांतून घेतल्या आहेत?"

"अर्थात सुशिक्षित स्त्रिया ज्या राष्ट्रांत आहेत त्या राष्ट्रांचेंच आपणास अनुकरण केलें पाहिजे."

"माझा प्रश्न काय, आणि त्याला तुझ्याकडून उत्तर काय! बाई, बाई, शर्थ झाली मला चुकविण्याची. तुला असें वाटते कां, मी आपला प्रश्न सोडून तूं जो तात्त्विक सिद्धांत पुढें माडतोस तिकडे मी पळेन? मला तर तात्त्विक वादविवाद बिलकूलच करतां येत नाहीं. मला ग्रांथिक विद्वानासारखें उत्तर देऊं नको."

"काय, तुझा प्रश्न काय? आम्हीं स्त्रीशिक्षणाच्या कल्पना कोठून घेतल्या? अर्थात इंग्रजांच्या शिक्षणसंस्थांवरून."

"हं, अस्सं आता आलास ताळयावर. मीहि तुला उत्तर देतें कीं इंग्रज समाजाला ज्या प्रकारचा सुशिक्षित स्त्रीरूपी माल तयार करावा लागतो तसल्या मालाची आमच्याकडे गरज नाहीं."

"तुझें एकेक बोलणे विलक्षणच! 'सुशिक्षित स्त्रीरूपी माल' अगर हीच भाषा कोणी पुरुषानें वापरली असती तर केवढा काहूर केला असतास? असो, बरें गरज का नाहीं?"

"ह[illegible]जी स्त्रियांस नटून थटून आपला नवरा आपल्या कुशलतेनें मिळवावा लागतो, आणि त्यामुळे सतरा पंधरा तऱ्हेचे नखरे त्यास करावे लागतात. कोणत्या पुरुषांनां काय आवडतें ते पाहून त्या पुरुषाच्या स्त्रीविषयक आवडीप्रमाणें आपणहि आहोंत अशी प्रतारणा करावी लागते, शेंकडो तऱ्हेच्या लबाड्या कराव्या लागतात, आणि नवरा मिळवावा लागतो. हिंदुस्थानांत मुलीच्या लग्नासाटीं बाप धडपडतो, पन्नास ठिकाणीं नाके घांसतो, आणि यामुळें

येथील स्त्रियांचा नटीपणा चुकतो. नटीपणा इंग्रज स्त्रियांस अवश्य आहे आणि त्यांची शिक्षणपद्धति तदनुरूपच असली पाहिजे. केवळ त्यांचे उदाहरण आपल्या-पुढें असल्यामुळें त्यांनां अवश्य परंतु आपणांस अनवश्य अशा गोष्टींस आमचे लोक महत्त्व देतात."

"इंग्रजी स्त्रियाच जर तुझ्या मतानें दुर्दैवी, तर मग त्याची शिक्षणपद्धति तुला कोठून पसंत पडणार ?"

"असो; एकंदरींत मला पुन्हां विद्यार्थीवृत्ति नको. तिचा मला कंटाळा आला आहे."

---

## प्रकरण चवथें

# हरिभाऊंचे आश्रयदाते

बंडुनाना घरकुट्टे आणि रामभाऊ गोडबोले हे सध्यां अगदीं गाढ मित्र खरे, पण रामभाऊ गोडबोले यांचे वडील व अनंतराव यांचें मात्र पूर्वी फार सख्य नव्हतें. अलीकडे दोघांनांहि वृद्धापकाळ आल्यामुळें दोघेहि आपआपल्या पूर्वीच्या गोष्टी विसरून गेले होते आणि दोघांचेंहि एकमेकांकडे जाणेंयेणें असे.

पूर्वी दोघांचेंहि सख्य नव्हतें याचें कारण सहज समजण्यासाठीं नागपुरांतील ब्राह्मणांचा आणि त्यातल्या त्यांत कायस्थवृत्तीच्या म्हणजे सरकारी नोकरी कर-णाऱ्या ब्राह्मणांचा इतिहास दिला पाहिजे. आज महाराष्ट्रीय भावनेनें निरनिराळ्या ठिकाणचे महाराष्ट्रीय जरी एकच झाले आहेत तरी ती वृत्ति पन्नास वर्षांपूर्वी येथें नव्हती. नोकरीसाठीं पुण्याहून आलेली ब्राह्मणमंडळी, खरी नागपुरची ब्राह्मण मंडळी व साताऱ्याकडून आलेली कऱ्हाडे ब्राह्मणमंडळी यांच्यांत फार विरोध असे. नोकरींतील स्पर्धा, त्यामुळें परस्परद्वेष पुष्कळ. ज्याप्रमाणें वऱ्हाडांत ब्राह्मण आणि परभू यांच्यामध्यें विरोध फारसा नाहीं; (कारण येथें नोकरींत परभूंची स्पर्धा संख्येच्या अल्पत्वानें भासत नाहीं.) तथापि ठाण्यास अगर

मुंबईस मराठे व तत्सम लोक स्पर्धेसाठीं येण्यापूर्वी या दोहोंतच स्पर्धा विशेष असून त्यामुळें परस्परद्वेषहि पुष्कळ; त्याप्रमाणेंच या तीन पार्श्वांमधून परस्परद्वेष पुष्कळ होता. इंग्रजांच्या हातीं पेशव्यांचें राज्य १८१८ सालीं गेलें आणि नागपूरकर भोंसल्यांचें राज्य १८५६ सालीं डलहौसीनें गिळंकृत केलें. इंग्रजी शिक्षण मुंबईकडे आणि त्याचप्रमाणे सागरकडे अगोदर सुरू झालें. सरकारी हायस्कूल नागपुरास नव्हतें पण ते सागर येथें अगोदर झालें. आणि मध्य-प्रांतातील पहिले इंग्रजी शिकलेले गृहस्थ रा. कृष्णराव रिंगे (जन्म सन १८२७) हे सागरकडील गृहस्थ होते. केवळ त्यावेळीं इंग्रजी शिकलेला गृहस्थ म्हणून त्यांचा सरकारानें मोठा सन्मान केला आणि त्यास रावराव असा किताब दिला. नागपुरास नोकरीसाठीं पुणें व सागर येथून मंडळी येत आणि त्यामुळें खुद्द नागपूरच्या ब्राह्मणांच्या तोंडातील घास निघून दुसऱ्यांच्या तोंडी पडे, त्यामुळे येथें बाहेरच्या मंडळींविषयीं स्वाभाविक वैषम्य उत्पन्न होई. कोंकणस्थ व देशस्थ हा भेद होताच, पण नागपूरकर आणि पुणेंकर हा भेद त्याहूनहि अधिक तीव्र होता. जो तो आपल्याकडील माणसें नोकरींत घुसवून देऊन दुसरीं माणसें बाहेर ठेवावयाचीं असा प्रयत्न करी. आणि त्यामुळें जे पक्ष उत्पन्न झाले ते नागपुरांत जरी बुझत चालले तरी अजून बंगाल–नागपूर रेल्वेचीं जीं ऑफिसें कलकत्त्याजवळ किडरपुरास आणि खडकपुरास आहेत तेथें हे भेद गणपत्युत्सवांत दिसून येत असत आणि या भेदामुळें उत्पन्न झालेले निरनिराळे सार्वजनिक गणपती अजून तेथे पृथक्त्वानें बराच काल होते.

नागपुरास आज ज्यांच्या दहा पिढ्या इकडेच झाल्या आहेत असें ब्राह्मण कमी. येथें भोंसल्यांच्या बरोबर आलेल्या ब्राह्मणांत देशस्थ ब्राह्मणच बहुतेक होते. त्यापूर्वी नागपुरास कुणबी, मराठा आणि महाराष्ट्रीय ब्राह्मण नव्हते असे नाहीं. येथे फारच जुने जे महाराष्ट्रीय ब्राह्मण होते त्यांस 'गोंडे' या नांवानें इतर लोक संबोधीत. कोंकणस्थांस कोंकणस्थ म्हणून घेण्यांत जो अभिमान वाटे तो नागपूरकडील जुन्या ब्राह्मणांस 'गोंडे' ह्मणवून घेण्यांत वाटे. हे गोंडांची उपाध्येगिरी करीत. इकडे दुसरे आणखी ब्राह्मण म्हटले म्हणजे तेलंगी ब्राह्मण

हे होत. त्यांतील कांहीं कुटुंबें हळू हळू तेलंगी भाषा विसरून महाराष्ट्रीय बनली. आणि लग्नव्यवहाराच्या बाबतींत अत्यंत उदार आणि दिलदार असे जे नागपुरकडील देशस्थ ब्राह्मण त्यांत मिसळून गेलीं आहेत. येथें कित्येक फार जुनी कोंकणस्थ ब्राह्मणाचीं घराणीं आहेत. त्यांस प्रथमतः इकडे देशस्थांशीं संबंध करावे लागले कारण भोंसले नागपुरकर आणि भोंसले सातारकर यांच्या दरम्यान निजाम येऊन बसला होता, त्यामुळे आणि दुसऱ्या अडचणीमुळे इकडची मुलगी तिकडे आणि तिकडची इकडे करणे कठिण झालें होतें.

अनंतराव घरकुट्टे यांचें घराणें फार जुन होतें. यांचे वाडवडील भोंसल्यांबरोबरच आले होते, आणि त्यांत अनंतरावांचे वडील वेदमूर्ति साबशिव भटजी हे महाराजांच्या अनेक देवळांपैकीं एका देवळांतील पुजारी होते. पूर्वीच्या काळीं जो मनुष्य महाराजांच्या खास देवालयातील पुजारी होता त्याचा केवढा मान !! महाराजांच्या घरच्या पुजाऱ्याचे उठणें बसणें आणि ओळखी मोठमोठ्या लोकांत होत्या. अर्थात आमचे अनंतराव घरकुट्टे हे खरेखुरे नागपूरी होते. गोडबोले हे इंग्रजी राज्य झाल्यानंतर निव्वळ उपरी म्हणजे केवळ इंग्रजी भाषेच्या ज्ञानावर आलेल्या मंडळीपैकीं म्हणजे घरकुट्टयांपेक्षां घरकुट्टयांच्या दृष्टीनें फारच कमी योग्यतेचे होते.

पुण्याकडून आलेल्या देशस्थांचा देखील कोकणस्थांप्रमाणेंच नागपुरी मंडळीकडून द्वेष होई; हा द्वेष नोकऱ्यांच्या बाबतींत तेवढा असे, इतर बाबतींत फारसा नसे. पुष्कळ वेळां असें होई कीं जो नागपुरी देशस्थ पुणेकरांच्या नांवानें खडे फोडी तो आपल्या मुलीच्या लग्नाचें जमवावयाचें झाल्यास मुलीस जांवई पुणेकरच पाही कारण पुणेकर शिकून संवरून तयार होतो त्याप्रमाणें नागपुरी तयार होत नाहीं असें त्यास वाटे.

त्या वेळचे द्वैत आज गेलें आहे, सरकारी नोकरीच्या बाबतींत आज निराळयाच स्पर्धा उत्पन्न झाल्या आहेत. दिवसानुदिवस महाराष्ट्रीय भावना दृढ होत चालली आहे ही गोष्ट देखील आनंदाची आहे. नागपुरी लोकांची भाषा पुण्यांतल्या मराठीपेक्षां भिन्न होती. आज भाषाभेद नाहींसारखा झाला

आहे व वर जी स्थिति दिली आहे ती आजच्या मध्यम वयाच्या गृहस्थांपैकीं पुष्कळांस कांहीं अंशीं आठवत असली पाहिजे.

नागपूर पूर्वीपासून पूर्वदृष्टि होतें. भोसल्यांच्या काळीं बंगाल, ओरिसा आणि छोटानागपूर या देशाकडे द्रव्योत्पादनार्थ नागपुरच्या मराठ्यांची दृष्टि फिरे. येथें प्रथमच्या दिवसांत शिक्षण मिळविण्यासाठीं पुष्कळ नागपूरी कलकत्यास जात असत आणि नागपुरच्या शिक्षणसंस्था कलकत्ता युनिव्हर्सिटीस जोडल्या जात असत. त्यावेळीं वऱ्हाडांत नागपुरकडचा म्हणजे कलकत्ता युनिव्हर्सिटीचा बी. ए. हा हलका आणि मुंबईचा उच्च अशी लोकबुद्धि होती. पहिल्या प्रकरणांत आपली बायको मुंबईची मॅट्रिक झालेली आणि आपण फक्त कलकत्याचे एंट्रन्स झालेले, तेव्हां अर्थात आपण आपल्या बायकोपेक्षां हलके समजले जाऊं म्हणून जें भय वाटत होतें म्हणून दिलें आहे तें पूर्वकालांतील अवशिष्ट विचारांचें निदर्शक होतें.

त्यावेळेस सागरकडील मंडळीमध्यें चांगली जूट होती आणि सागरचा कोणी नागपूरास आला म्हणजे त्यास ते उत्तेजन देत. मागील प्रकरणांत वाचकांस ठाऊक झालेला हरिभय्या मोघे यास सागरच्या मंडळीने चांगला आसरा दिल्यामुळें हरिभय्यास गायन-वादनाची शाळा काढणें जड गेलें नाहीं. त्यास विद्यार्थी लवकरच मिळाले आणि त्याच्या योगाने त्याचें हळू हळू बस्तान बसूं लागलें. अनंतराव घरकुट्टे यांसहि गायनाचा नाद चांगला होताच आणि त्यामुळें त्यांस हरिभय्याच्या गुणाची पारख चांगली झाली. त्यांतल्या त्यांत हरिभय्याच्या लौकिक विशेष वाढण्याचे कारण कीं गायन प्रावीण्य ज्यास असतें अशीं माणसें विलक्षण वर्तनाची असतात आणि शिवाय नीतिमत्तेच्या बाबतीत त्याचे दारिद्र्यहि सर्वविश्रुत आहेच. हरिभय्या मोघे हा जरि गायनपटु होता तरी तो सभ्याचारयुक्त मनुष्य आहे हें पाहून अनंतरावास आनंद झाला आणि त्याच्याकरतां कांहीं तरी करावें असें त्यांच्या मनानें घेतले. सागरकडची इतर मंडळी कशीहि असोत हा हरिभय्या मात्र फार चांगला मनुष्य आहे असें त्यास वाटे. हिंदुस्थानांतील भक्तिपर आणि उपदेशपर अनेक पद्येंच त्याच्यापाशी विशेष

आहेत. हा फाजील गाण्याचा शोकी नाहीं, मंडळीनां पाहिजे असले तर म्हणतो एखादें लोकांनां आवडेलसें, असेंहि त्यांस दिसून आलें. व हरिभय्यासाठी आपण कांहीं तरी करावें असें त्यास वाटूं लागले. आणि यासाठीं भोंसले-विजय मिल्सच्या कांही कामानिमित्त समारंभ झाला त्यावेळेस हरिभय्याचें गाणें करविण्यात आले. त्या वेळेस जी पत्रिका काढली होती तीमध्यें हरिपंडिताचें गाणें होणार म्हणून जाहिरात दिली होती. तिचा उपयोगहि मोठा झाला. हरिपंत पंडित म्हणून नागपूरला जे प्रसिद्ध शिक्षक व लेखक उदयास आलें त्यांचेच गाणें होणार असाच कांहीं मंडळीचा समज होऊन पुष्कळ मंडळी आली होती. त्या मंडळीना प्रथम आपण नावामुळें फसलों असें जरी वाटलें तरी प्रत्यक्ष गाणें ऐकल्यावर आनंद वाटून अनंतरावांनीं मंडळी ओढण्याकरताच हरि-भय्यास हरिपंडित असे म्हटलें हे बरेंच केले असे वाटावयास लागलं.

आपले गाणें ऐकून मंडळी आनंदित झाली त्यामुळें आणि आपली पुष्कळानां माहिती झाल्यामुळें जरी हरिभय्याला आनंद झाला तरी आपल्याला या मंडळींनीं जें "पंडित" बनविलें त्याचें त्यास मोठे ओझें वाटूं लागलें. कां कीं संस्कृत संगीतविषयक ग्रंथांची माहिती त्यास बेताचीच होती. संगीत रत्नाकरांतील काहीं श्लोक त्यास पाठ होते एवढेच. उलटपक्षीं ज्या मंडळींनीं त्यास पंडित बनविलें त्यास मात्र हरिभय्या पंडित वाटला. कां कीं दोन चार संस्कृत ग्रंथांचीं नांवें घेणारा आणि संगीतविषयक दोन चार संस्कृत श्लोक म्हणणारा जर गायक भेटला तर त्या वेळच्या नागपूरच्या सुशिक्षितांस तो मोठा पंडित आहे असें सहजच वाटे.

---

प्रकरण ५ वें

## होरमसजी पेनांगवाला

नागपूरला सिव्हिल लाईन्समध्यें एका बंगल्याच्या कांपाउंडांत दोघे गृहस्थ बसले होते. त्यापैकीं एक वृद्ध पारशी होता आणि दुसरा तरुण ब्राह्मण होता. तो वृद्ध पारशी ज्या प्रशस्तपणानें बसला होता त्यावरून तें घर त्याचेंच होतें असें

दिसत होतें. कांपाउंडांतील टेबलावर एक व्हिस्कीची बाटली, कांहीं ग्लासें, आणि सोड्याच्या बाटल्या दिसत होत्या.

" काय तमे व्हिस्की अने सोडा नाय पिते ? येथले तर सगळे बारिस्टर आणि एज्युकेटेड लोक आमच्याकडे आले म्हणजे आमाला सोडा आणि व्हिस्की द्यावी लागते. मोठमोठे सगळे चागले लोक व्हिस्की घेते."

" घेत असतील पण मला नको."

" तुमी घ्या. आमी रावसाहेब अनंतराव यासनी नाहीं बोलेल."

" तरी देखील मला नको."

" बरें नको तर आमचा खरचा वांचला. बरें मिल्ची हकीगत काय आहे ?"

" भांडवल सर्व जमलें आणि गिरणीची इमारत देखील आतां बांधावयास सुरवात व्हावयाची आहे."

" सरतेशेवटी तुमीं आमचा नाय ऐकिला. मी तुमाला सांगत होतो कीं ही गिरणी बांधायचे कंत्राट तुमी आणि मी मिळून म्हणजे 'घरकुट्टे पेनांगवाला आणि कंपनी' कडून घेऊं. कोणी डायरेक्टरनें गडबड केली असती तर तेलाबी आपल्या कंपनींत घेतला असता. तुमी तसें केलें असते म्हणजे गिरण आतांपासूनच आपल्या आपल्या लोकांला फायदेशीर झाली असती."

" बरं आतां पुढें आपल्या आणखी काय सूचना आहेत ?"

" तुमच्या गिरणीचा पैसा बॅंकेंत पडला आहे त्यांचा व्याज फार थोडा मिळतो आहे. तुमी तो पैसा तेथून काढून आमच्या दुकानावर ठेऊन द्या. तुम्हाला सात 'परसेंट' (शेंकडा) व्याज चालू होईल."

" बरें आहे, ठेवूं ही सूचना डायरेक्टरांपुढे."

" डायरेक्टरांपुढें कशाला ठेवायला पाहिजे ? तुमचे वडील मॅनेजिंग डिरेक्टर आहेत त्यानां सर्व अखत्यार आहेच. आमी दुसरे डिरेक्टर, त्यांनीं तसें केलें तर उलट काय करूं शकणार ?"

" हा प्रश्न कायद्याचा नाहीं, तर हा गिरणीच्या हिताचा आहे. "

" आमी काय गिरणीचे गैरहित पाहते ? "

" तर मग दुसरे डिरेक्टर काय गैरहित पाहतात ? गैरहित तर कोणीच पहात नाहींत आणि म्हणूनच त्यांची सम्मति घेतली पाहिजे. आपण तरी आम्ही त्यांची सम्मति न घ्यावी असा आग्रह कां धरतां ? "

" आमचा असा काय म्हनना नाय की तुमी बोर्डाला पुसू नाय. आमचा एवढाच म्हनना कीं, बाराभाईची खेती कोणीबी पहात नाय. तसा काम डिरेक्टरांच्या होनार आणि काम होणार नाहीं. "

" तुम्ही बोर्डामध्ये आहांत, तेव्हां तुम्ही सूचना करालच. "

" हां आमी करेल, पण आपले वडील तेला दुजोरा देईल की नाय ? नायतर आमी फायदा करायला जावा गिरणीचा, आणि तूमी म्हणेल की, पारशी आपला फायदा पाहून राहिला. "

" अर्थात आपल्याला शेंकडा सात व्याजांत रकम मिळाल्यास आपला फायदा मुळींच नाहीं. आपण केवळ गिरणीच्या फायद्यासाठीं इतके धडपडत आहांत तर. " पिढीजाद श्रीमान् बंडुनाना थोडेसे हंसून म्हणाले.

" आमी असें म्हणत नाय आमचा कांहीं फायदा नाय, आपण दोघांचाहि आहे. गिरणीला चांगला व्याज मिळेल. आह्मांला रकम मिळेल. तुम्ही बँकेंत पैसे ठेवतां बॅंकेचा कांहीं फायदा नाहीं काय तुमचें डिपाझिट घेण्यांत ? तुम्ही आपले पैसे जे बॅंकत ठेवतां ते तुमचा कांहीं फायदा नाहीं म्हणून ठेवतां ? "

" तुम्हांस गिरणीच्या पैशांतून कर्ज द्यावें कीं नाहीं हा माझ्यापुढें प्रश्न नाहीं, हा डायरेक्टरांपुढें येणार. "

" अरे बाबा, हे डिपाझिट हाय कर्ज नाय. "

" तुमचा धंदा कसला आहे ? बॅंकेचा अगर कंत्राटाचा किंवा दुकानाचा ? तुम्ही पैसे कोणत्या कामास लावाल ? "

" अरे आमच्या दुकानांत देखील पुष्कळ लोक डिपाझिट ठेविते."

" असो. हा सध्यां माझा प्रश्न नाहीं. डायरेक्टरांपुढें प्रश्न आला म्हणजे बाबा पहातीलच."

" तुम्ही दक्षिणी लोकाला बिझिनेस ( व्यवहार ) समजत नाय. गिरणी तुमी काढणार खरी पण बांबे मध्ये शेरबाजारांत काय वेव्हार चालते तुम्हाला समजते ? तुम्हा दक्षिणी लोकांचा शेरबाजारामध्यें एकभी मेंबर नाय."

" आमचे शेअर्स आमच्या मंडळीला जेव्हा विश्वयास बाहेर काढावे लागतील तेव्हा जो तो पूर्णपणे चौकशी करीलच. कोणीतरी दलाल गांठीलच."

" तसे नाय. शेरबाजाराकडे लक्ष ठेऊन गिरणीच्या डायरेक्टर लोकाला काम केला पाहिजे."

" तें कसें काय ?"

" अरे शेरावर जास्त व्याज असला म्हणजे शेराची किंमत चढते आणि कमी डिव्हिडंड दिला म्हणजे कमी होते."

" हें सांगायला कोणी शेरबजारवाला नको. हे तर भाजीवाली सागेल."

" पण याचा प्राक्टिकल आप्लिकेशन ( व्यवहारांत उपयोग ) कसा करावयाचा हें तुम्हाला कुठे ठाऊक हाय ?"

" कसा करावयाचा प्राक्टिकल आप्लिकेशन ?"

" तेचा आप्लिकेशन असा करायचा की जरी गिरणींत फायदा झाला तरी ' डिव्हिडंड ' देऊं नये. काहीं तरी कारण दाखवून तोटा दाखवावा."

" तोटा कसा दाखवावयाचा ?"

" याला बिझिनेस सेन्स ( व्यावहारिक अक्कल ) लागतो. स्टॉक टेकिंग ( मालाची मोजदाद ) मध्ये जुन्या पुराण्या किंमती घेऊन अंडर एस्टिमेट ( कमी आकार ) करावा म्हणजे असेट्स ( मालमत्ता ) कमी दिसेल."

" तोटा दाखवून फायदा काय ?"

" हां येथेंच तर तुमा दक्षिणी लोकाला समजत नाय. तोटा दाखविला म्हणजे लोकांची रक्कम तुमच्याकडे पडून राहते ती पुढे व्रेपारांत घालायला सांपडते. पहिली एक दोन वर्षे डिव्हिडंड् दिला नाहीं तरी हरकत नाही. कारण लोक म्हणतील कीं, काम जरा नवीन हाय. आणि जरी लोकांनीं ओरड केली तरी काय हरकत हाय. "

" तोटा नसला तरी तोटा दाखवावा ? "

" अरे यालाच तर " बिझिनेस टॅक्ट " ( व्यवहारिक हुषारी ) म्हणतात. तोटा झाला नसला तथापि झाला असा लोकामंदी बोभाटा करून दिला म्हंजे लोक आपले शेअर्स विकावयास काढतील. शंभरचा भाव पन्नासावर जाईल, मग आपणच ते शेर एका दलालामार्फत खरेदी करून टाकावे. "

" आणि मग पुढें ? "

" पुढें फायदा बराचसा दाखवून मोठा डिव्हिडंड फायद्याचा ( हिस्सा ) डिक्लेअर करावा ( सागावा ). म्हणजे शंभरच्या शेअरची किंमत २५० होऊन जाईल. आणि मग ते पन्नासाला खरीद केलेले शेर २५०ला विकून टाकून आपण पसार ! "

" पण या प्रकारें काम करणें म्हणजे लोकांनां फसविणें नाहीं काय ? "

" छे ! मुळींच नाहीं ! लोकांना ' बिझिनेस सेन्स ' शिकवणें आहे. तात्या ! लोक शाळेंत शिकविण्याची फी नाहीं घेत, तर लोकांनां बिझिनेस सेन्स शिकविण्यास फी नको घ्यायला ? "

" मला एका इंग्रज अधिकाऱ्यानें एका ज्यूची गोष्ट सांगितली. "

" साहेबानीं गोष्ट सांगितली ?. काय गोष्ट सागितली ? "

" साहेबानी गोष्ट सांगितली कीं, एका इंग्रजानें एका ज्यूला पातीदार म्हणून घेतला. त्या इंग्रजाला व्यवहाराचा अनुभव नव्हता तथापि त्याचा हातीं पैसा पुष्कळ होता. आणि त्या ज्यूपाशीं व्यवहाराचा अनुभव होता. झाले. धंदा

सुरू झाला, सहा महिने झाले, सहा महिन्यानंतर त्या ज्यूच्या हातीं पैसा आला आणि इंग्रजापाशीं व्यवहाराचा अनुभव मात्र उरला."

ही गोष्ट ऐकतांच पेनांगवाला शेटजींस खूप हंसूं कोसळलें. आणि ते म्हणाले "शाबास, ज्यू लोक व्यवहारांत मोठे हुशार, पण आमच्या पारशांसारखी हुशारी ज्यूमंदी देखील नाहीं असें इंग्रज लोक देखील कबूल करतात."

"आणि मी देखील कबूल करतों," बंडुनाना घरकुट्टे म्हणाले.

"ज्यू लोक व्यापारांत हुशार खरा पण मोठा अप्रामाणिक लोक आहे. आमचा पारशी लोक मोठा प्रामाणिक आहे आणि त्याचा इमानदारीमुळेंच त्यांनां सरकार मोठमोठ्या जागा देते आणि मोठ्या पदवीला चढविते. त्यांनां बेपारांत येश यायला त्यांची इमानदारीच कारण."

"खरोखरच पारशी लोकांसारखी इमानदार जात जगांत नाहीं. सरकारी अधिकाऱ्यास कायावाचामनेंकरून खूष करतात. आम्हां ब्राह्मण लोकांना तशी हुशारी साधत नाहीं."

"तुमचा ब्राह्मण लोकभी कांहीं वाईट नाहीं, पण तो वेडा आहे जरासा. मानापमानाच्या भलभलत्या कल्पना तेच्या डोक्यामंदी आहेत. आम्ही पारशी लोक प्रामाणिकपणा आणि व्यवहारबुद्धि ( बिझिनेस सेन्स ) याची सागड घालतो. पण तुम्हाला व्यवहारबुद्धि नाहीं आणि ज्यू लोकांत प्रामाणिकपणा नाहीं."

"बरें मघांच्या गोष्टींतल्या ज्यूनें तरी काय वाईट केलें? आपल्या पातीदाराचें सगळें द्रव्य आपल्यापाशीं घेतलें हीं गोष्ट खरी, पण त्यानें तेवढ्यांत त्याला शहाणपणा नाहीं का शिकविला?"

"तें मी वाईटच म्हणतो, कारण त्यानें त्या साहेबास जें शहाणपण शिकविलें त्याबद्दल त्याला फार खर्चांत टाकलें."

"आणि आपण शेअर खोटेपणानें ५० रुपयांस घेऊन खोटेपणानेंच त्याचा भाव २५० करून तो दुसऱ्याच्या गळयांत बांधवयाचा हा प्रामाणिकच व्यवहार काय?"

"हां ते लेजिटिमेट ( धर्मयुक्त ) आहे. लेजिटिमेट काय आणि काय नाय हें तुम्हां व्यवहारांत नसलेल्या ब्राह्मण लोकांस कळावयाचे नाहीं."

"बरें असो, आता बरीच संध्याकाळ झाली. आतां मला क्लबांत गेलें पाहिजे."

असें म्हणून बंडूनानानीं शेटजीच्या निरोप घेतला. शेटजी गाडीपर्यंत पोचवावयास आले आणि म्हणाले "बरे आम्ही डिपाझिटसंबंधी बोललेल्या गोष्टीचा विचार करा बरं कां."

"हो! याविषयीं विचार मोठ्या आनंदानें करूं."

"बरं, गावामंदी प्लेग जर वाढला तर गांवांत राहूं नका बरं. हें घर आपलंच आहे असं समजा. आमी घरातला पुढला भाग रिकामा करून तुमाला देऊं."

"वा! शेटजींची मोठी मेहरबानगी होईल."

असें म्हणून शेटजींशी हस्तादोलन करून बंडुनानानीं निरोप घेतला आणि गाडी भरधांव निघून गेली.

गाडी भरधांव गेली तेव्हां त्याच रस्त्यानें दुसरी एक गाडी शेटजींच्याच घराकडे येताना दिसली. ती पाहून शेटजी स्वागतयुक्त हास्यमुद्रेनें तिची अपेक्षा करीत राहिले, आणि गाडी जेव्हां उभी राहिली तेव्हां "बानु केम छो" असें वाक्य हास्ययुक्तमुद्रेने उच्चारून त्याने गाडींतून उतरणाऱ्या तरुणीचें स्वागत केलें. ती तरुणी दुसरी कोणी नसून शेटजींची मुलगी पुतळीबाई होती.

"आलीस का आपल्या नव्या मैत्रिणीकडून, कशी काय आहे ? मिसेस रामभाऊ गडबोले, तिचें नांव काय प्रियंवदा आहे नाहीं ?"

"होय तेंच तिचें नांव आहे आणि अगदीं आपल्या नांवाप्रमाणेंच ती मुलगी आहे."

"तिला इंग्रजी येते नाहीं, ती काय मॅट्रिक वगैरे कांहीं झाली आहे नाहीं ?"

“ होय. ”

“ आणि तूं अजून कांहीं मॅट्रिक वगैरे झालीस नाहीस, ती झाल्यानें तिला कसा फायदा मिळाला ! अग आपण मि. टाउनसेंड डेप्युटी कमिशनरकडे जातों, आणि डेप्युटी कमिशनर आणि त्याची बायको आपणांस परतभेट देत नाहींत. मिसेस टाऊनसेंड ही तिला एकदा भेटावयास गेली होती असें ऐकतों. ”

“ आणि एवढेंच नव्हे तर प्रियंवदाबाईनें उलट मिसेस टाउनसेंडला सांगितलें कीं, माझा नवरा येथें नाहीं तेव्हा माझ्या नवऱ्याच्या परोक्ष मी कोठली आमंत्रणे स्वीकारली तर आमच्या समाजांत ते बरें दिसत नाहीं, आणि त्यामुळें मला येतां येणार नाहीं. ”

“ मुलगी मोठी धीट आणि गर्विष्ट दिसते ” असें शेटजी म्हणाले पण त्याच प्रसंगी एक दोन देखावे त्यांच्या दृष्टीसमोर उभे राहिले.

पहिला देखावा उमरावतीचा होता. उमरावतीत यूरोपीयन सोसायटी-मध्यें आपला थोडाबहुत प्रवेश कसा होत होता, आपण सपत्नीक उमरावतीस डिस्ट्रिक्ट बोर्डात कॉनसर्ट पहावयास गेलों होतों तेव्हां मेजर वाइल्डओट यानें आपल्या बायकोस अगदी पुढच्या रांगेंत खुर्ची कशी दिली, आपण अलक्षित कसें राहिलों आणि निरनिराळे ऑफिसर लोक आपल्या बायकोशीं कसें ओळख करून घेत होते, इत्यादि गोष्टी त्याच्या दृष्टीसमोर आल्या.

पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटमध्ये आपणांस कंत्राट पाहिजे होतें, व आपली एक्झिक्यूटिव्ह इंजिनिअरशीं ओळख नव्हती तरी आपल्या बायकोची होती, तेव्हां तिच्या मार्फत आपण कसें त्यास जेवण्यास सहकुटुंब आमंत्रण केलें, आणि तें कंत्राट कसें मिळविलें, पुढें अशी कंत्राटें आपली बायको आपणास मिळवून देत होती हें त्यांस आठवलें. पण त्याबरोबर हेंहि आठविलें कीं, आपणांस कंत्राटें बायको मिळवून देई त्यामुळें तिला स्वतः आपण आश्रयदात्याच्या वर्गातले आहोंत, आणि आपला नवरा आपल्या आश्रितांपैकींच आहे असें कसें वाटे;

आपण कोठें बाहेर गेलों असतां आपल्या बायकोस कोणी साहेब भेटावयास आला तर आपणांस मत्सर कसा होई, तथापि आपण रानवट, मत्सरी आणखी आपल्या बायकोवर विनाकारण संशय घेणारे असे समजले जाऊं नये म्हणून आपणांस आपल्या मनांतील भाव कसा दाबून टाकावा लागे; आपली बायको साहेबाशीं बोलते आणि त्या गप्पात आपल्याला तर फारसें गम्य नाहीं यामुळें साहेबाच्या कोटींतली मी आहे आणि नवरा निराळ्या कोटींतला आहे असे बायकोस कसें वाटे; यूरोपीयन सोसायटीच्या, शिकारीच्या इत्यादि गोष्टी यूरोपीयन लोकांपाशीं बोलायला बायको शिकलेली, आणि त्या प्रकारच्या गोष्टी नेहेमीं अपल्या देखत चालतात आणि यामुळें आपणांस एखाद्या बहिष्कृतासारखें बसून कसें रहावें लागे, इत्यादि गोष्टी त्याच्या एकदम डोळ्यासमोर उभ्या राहिल्या. आपण धंद्यात पैसे मिळविले. पण आपणास गृहसौख्य काही मिळालें काय? इत्यादि प्रश्न देखील त्यांच्यापुढें उभे राहिले. पण हा सर्व खेळ एका दोन मिनिटांतच झाला. डोळ्यापुढून हे देखावे इतक्या जलदीनें निघून दुसरे येत कीं ते विचारास वेळच ठेवीत नव्हते.

आपला बाप काहीं गहन विचारांत गुंतला आहे आणि त्यामुळें तो बोलत नाहीं असें पुतळीस वाटलें. तिनें बापास विचारलें, “आपण विचार कसला करतां?”

शेटजी जागे झाले आणि म्हणाले “विचार कसलाहि नाहीं. तूं म्हणत काय होतीस कीं प्रियंवदाबाईनीं नवऱ्याच्या गैरहजेरींत कोणास भेटावयास वगैरे जायचें नाकारलें.”

“होय.”

“चांगलें केलें.”

“त्यांत चांगलें तें काय?”

शेटजीस विचार पडला कीं आता याला उत्तर काय द्यावें? शेटजींच्या मनांत पुतळीबाईस आपल्या मृत आईची हकीकत सांगावयाची नव्हती. पुतळी-

बाई लहान असतानांच आई नवऱ्यापासून निराळी राहूं लागली होती. नवऱ्यानें कांहीं दिवस एक मुसलमानीण ठेवली होती. आणि बायकोनें रुसून मुंबईस प्रयाण केलें होतें. तेथें एका पारशी सॉलिसिटरचा आणि तिचा विशेष स्नेह जुळला होता आणि तिनें नवऱ्याकडे परत येण्याचें नाकारलें होतें. शेटजींनीं बायकोनें परत यावें म्हणून पुष्कळ विनवणी करून पाहिली; बायको परत कां येत नाहीं, आपल्याला ग्रह आडवे आले आहेत काय म्हणून ज्योतिष्याकडे जाऊन चौकशी केली. भार्यास्थानीं केतु असल्यामुळें हे प्रकार झालें अशी ज्योतिष्यानें दिलेल्या सल्ल्यामुळें खात्री होऊन ग्रहशांति होण्यासाठीं भुलेश्वरांतल्या काहीं ब्राह्मणांस धर्मादायहि केला, पण उपयोग झाला नाहीं. पुढें बायको एकाएकीं प्लेगनें मृत्यु पावली.

त्या वेळेस पुतळी चार वर्षांची होती. या सर्व गोष्टीस १४-१५ वर्षे होऊन गेली. पुतळी आईच्या मृत्यूनंतर बापाकडे परत आली. मरतेवेळीं बायकोनें नवऱ्यास बोलाविलें, सर्व अपराधाची क्षमा मागितली आणि 'मुलीची काळजी घ्या, दुसरी बायको केली तर ती मुलीचा दुस्वास करिल म्हणून मुलीकडे लक्ष दिलें पाहिजे' इत्यादि गोष्टी बायकोनें नवऱ्यास बजाविल्या.

या सर्व गोष्टीची आठवण शेटजीस झाली आणि आतां मुलीस उत्तर काय द्यावें हा विचार करून ते म्हणाले,

"हिंदू लोकामध्यें नवरे फार मत्सरी असतात आणि साहेबाच्या घरीं बायकोनें जावें हें हिंदू लोकांस आवडत नाहीं तर तिनें केलें तें चागलें केलें."

"मिसेस गोडबोल्यांकडे एक उत्तम गाणारा वस्ताद उतरला आहे. तो नुकताच बडोद्याहून आला असें प्रियंवदाबाईनीं सांगितलें. तो हॉलमध्यें कांहीं मंडळीस गाऊन दाखवीत होता, माजघरांतून आम्ही त्याचें गाणें ऐकत होतों. तो चांगला गातो. सतारही चांगली वाजवतो व दिलरुबाहि वाजवितो."

"बरें मग?"

"मला असें वाटतें कीं त्याला मला गायन शिकवण्यासाठीं बोलवावें."

“ मला असें वाटतें कीं तूं या भानगडींत पडूं नकोस. ”

“ कां ?”

“ त्याचा उपयोग काय ? आजकाल हिंदु संगीताची ‘ सोसायटींत ’ चहा नाहीं. आपल्याकडे साहेबलोक आले किंवा साहेबलोकांच्या ‘ ॲट होम ’ ला आपण गेलीं तर तेथें दिलरुबा कोण ऐकेल ? तूं पियानो शीक. ”

“ हिंदु म्यूझिक ( संगीत ) चा उपयोग कांहींच नाहीं ? ”

“ आपल्याकडे हिंदु लोकांनां केव्हां आमंत्रण करावयाचा प्रसंग येतो ? आणि जरी आला तरी त्यांच्यादेखत तूं काय गात बसणार ? त्या दिवशीं दहापांच रुपये टाकून कोणी वस्ताद बोलावून घेऊं. ”

“ पण मला शिकायची इच्छा आहे ना ! ”

“ असेल तुला पाहिजे तर शीक ; पण तुला त्याचा पुढें फारसा उपयोग नाहीं. तुझें पुढें लग्न जुळण्यासाठीं तुला पियानो जर वाजवावयास येत असला तर तोच उपयोगी पडेल. ”

“ कां ? आपल्या पारशी लोकांनां देखील इकडचेंच संगीत आवडतें. ”

“ होय ; तें ऐकण्यासाठीं तें गवई बोलावतील किंवा नाटक पहायला जातील. तेवढ्याकरतांच आपला बायकांनां हिंदु संगीत शिकवणें कांहीं जरूर नाहीं. ”

---

प्रकरण ६ वें

## रायपूरच्या बुढ्या बागेंत

छत्तिसगड हा मागासलेला मुलुख असेल कदाचित्, पण रहावयास मोठा चांगला मुलुख आहे. येथील लोकांची साधी रहाणी आणि दिलदार स्वभाव हीं पाहून कोणालाहि आनंदच होईल. तुम्हांला कांहीं हुन्नर येत असेल तर खुशाल रायपूर बिलासपूर येथें जाऊन रहा. पैसे बरे मिळतील. राहण्यास

खर्च थोडका येईल. येथें पूर्वी तांदूळ व दूध याची जी स्वस्ताई होती ती मात्र आज नाहीं. आगगाडीनें छत्तिसगडांत देखील प्रवेश करून येथील स्वस्ताई पळवून नेली आणि तंबाखू, दारू, विलायती कपडे या गोष्टी मात्र तेथें आणून ठेवल्या असें रायपूरचें तत्त्ववेत्ते सांगतात. रायपुरास देखील तत्त्ववेत्ते आहेतच, ते केवळ पुण्यासच भरले नाहींत. रायपुरचा महाराष्ट्रीय ब्राह्मण शिंपी घ्या अगर चहावाला घ्या, केसरी वाचून स्वदेशाभिमानाच्या गप्पा बोलायला तो कोणत्याही पुणेकरास हार जाणार नाहीं.

रायपुरास आणखी कित्येक चांगल्या गोष्टी म्हटल्या म्हणजे येथील रस्ते होत. रस्ते कसे असावेत हा कोणी प्रश्न केला तर शिल्पशास्त्राच्या इंजिनिअरचीं उत्तरें निराळीं, अर्थशास्त्र्यांची निराळीं आणि कादंबरीकारांचीं त्याहून निराळीं. आरोग्याची जबाबदारी ज्या लोकांवर असते त्यांचींहि उत्तरें निराळीं. आजकालच्या कादंबरीकारांचें उत्तर एवढेंच कीं ज्या रस्त्यावरून बायका आणि पुरुष एकत्र फिरावयास जात आहेत असें वर्णन ज्या रस्त्यासंबंधानें देतां येईल ते रस्ते चांगले. इतर लोकांच्या कसोटीपेक्षां कादंबरीकारांची कसोटी मोठी प्रखर आहे. तरुणांस आणि तरुणींस एकत्र फिरण्यास योग्य असा रस्ता पाहिजे असल्यास अर्थात तेथें धूळ नको. साडेचार पांच वाजतां फिरावयास गेलीं असें वर्णन द्यावयाचें असल्यास तरुणीस ऊन लागून तिचा नाजूकपणा कमी होऊं नये म्हणून आणि संध्याकाळीं काळोखांतून परत येतां यावें अशी इच्छा असतां तो काळोख वाढविण्यासाठीं, आणि तरुणीचें तरुणावर अवलंबित्व वाढविण्यासाठीं, रस्त्यांच्या दोन्हीं बाजूंनीं झाडी आली पाहिजे. रस्याच्या बाजूस एखाद दुसरें तळें असलें तर चांगलेंच. कारण त्याच्या योगानें वर्णनाचें अद्भुतरसत्व वाढतें.

रायपुराच्या परिकरांत रस्ते चांगले आहेत आणि रायपुरास लागूनच सरकारी बगिचा आहे. त्यांत हिरवळी, चित्रविचित्र झाडें, आणि लताकुंज असून बसावयास ठिकाणें अनेक आहेत. शिवाय त्या बगिच्यांतील तलावाच्या कांठच्या बुरुजांवर बसून तळयांतील हत्तीच्या कानासारखीं कमलिनीपत्रें व तांबडीं व पांढरीं कमलें पाहून अर्वाचीन छत्तिसगडी कवींनां काव्यस्फूर्ति होते.

छत्तिसगडी सामान्यजन जरी काव्य करीत नाहींत तरी त्यांस चंदबरदायीच्या पृथ्वीराजरासा, अल्हखंड, आणि तुलसीदासाचें रामायण यांतील सरोवर्णनांची आठवण होते, असो !

रायपूरच्या बागेंत आज दोन स्त्रिया एका मुलास घेऊन गाडींत बसून फिरावयास आल्या होत्या. या दोघीजणी विधवा होत्या असे त्यांच्या कपाळावर कुंकू नसल्यामुळे अनुमान काढतां येण्याजोगें होतें. या दोघींपैकीं एक सोळा वर्षांची होती व दुसरी पंचविशीच्या भरात होती.

ते नेत्र ते कुरळ कुंतल ते कपोल ।
ती नासिका सरळ ते मृदु ओष्ठ लाल ।
सौभाग्यहीन ललना मुख तें कवीस ।
आहे मनोहर तरी गमतें उदास ॥ +

हें वर्णन त्या दोघींसही उत्तम तऱ्हेनें लागू पडण्यासारखें होतें. त्या दोघी स्त्रिया गाडींतून उतरून चालूं लागल्या. थोरलीनें मूल घेतलें होतें.

" बिंबाबाई, तुझ्यावर हा वैधव्यप्रसंग आला हें पाहून मला फार वाईट वाटतें हें तुला सांगावयास नकोच. तुला मी लहानपणापासून पाहिलेलें आणि माझा हाताखालीं तूं शिकलेली, शिवाय माझ्या विद्यार्थिनींमध्यें तूं साधारणपणें सुखांत होतीस. तुझ्यावर काय प्रसंग ओढवेल याची तूं पांच वर्षांपूर्वी नागपुरास माझ्यापाशीं शिकत होतीस तेव्हा मला कोठे कल्पना होती ?" शारदाबाई म्हणाल्या.

" माझ्या बाबानीं माझे ज्या वेळेस लग्न करून दिलें त्यावेळेस त्यानां तरी कोठें कल्पना होती कीं माझ्यावर असं आकाश कोसळेल ? "

" बिंबाबाई आज जें दुःख तुला वाटतें तें उद्यां वाटणार नाहीं. एका वर्षाच्या आंत तूं या स्थितींत रुळशील आणि वैधव्यानें जे सर्वसामान्य दुःख आहे तेंच मात्र कायम राहील. "

---

[ + महाराष्ट्र वाग्विलास मासिकांत 'आहे मनोहर तरी गमतें उदास ' ही ओळ समस्यापूर्तीसाठीं आली असतां एका कवीकडून आलेलें पद्य.]

" त्यांच्या मृत्यूच्या पहिल्या दिवशीं जे दुःख वाटत होतें तें आज बरेंच नाहींसें झालें आहे. तथापि जग मला अगदी उदास वाटत आहे. नाहीं म्हणावयास या प्रभाकराकडे मात्र अधिकाधिक लक्ष वाढत आहे. आतां मला आधार म्हणजे हाच. याचें संगोपन मात्र मला चांगले केलें पाहिजे. "

" भय्यासाहेबांचें तुला विस्मरण पडणें शक्य नाहीं, पण त्यांच्याविषयींचा शोक मात्र तुझा कमी होत जाईल. "

" मला राहून राहून असें वाटतें कीं अगोदर लोभ उत्पन्न व्हावा, आणि नंतर प्रेमाच्या माणसांचा वियोग व्हावा, असें होण्यापेक्षा अगोदर मुळीं लोभाचे पाश उत्पन्न झालें नाहींत तर चांगले नाहीं काय ? माझे लग्नच झाले नसतें तर तें किती तरी चांगले झाले असते. "

" बिंबाबाई, तूं असें म्हणूं नकोस. प्रेमाचा अनुभव मग तो फारच थोडके दिवस कां मिळाला असेना – तो थोडके दिवस तरी मिळणें हें अगदींच न मिळण्यापेक्षां चांगले. "

" ताईसाहेब, तुम्ही कौमार्य आणि वैधव्य यांतील काय पत्कराल ? "

" मी वैधव्यच पत्करीन. कौमार्याची मला फारशी अभिरुचि नाहीं. "

" आपल्याकडे मुलींचीं बाराव्या वर्षी लग्नें होतात ; अशी कल्पना करा कीं, मुलीस सहा महिन्यांनीं वैधव्य आले तर त्यापेक्षां तिचे लग्न झालें नसतें तर बरें झालें नसतें कां ? "

" तुलना करतांना दोन सारख्या गोष्टींची तुलना केली पाहिजे. बाराव्या वर्षी विधवा झालेली मुलगी आणि तेराव्या वर्षी सवाष्ण रहाणारी मुलगी यांची तुलना करणें बरोबर नाहीं; तर बाराव्या वर्षी वैधव्य आलेली मुलगी आणि आजन्म जिला अनूढ रहावें लागले अशा मुलीची तुलना केली पाहिजे. आणि तशीं केली असता बारा वर्षांची विधवा झालेली मुलगी अधिक बरी असें मला वाटतें. कारण लग्न झाल्यामुळें त्या मुलीचे हिताहित पहाणारें घराणें पूर्वी एकच असतें, तीं दोन होतात. "

" लग्नें जर फार लवकर झालीं तर समाजांत पुष्कळ विधवा नाहीं कां होणार ? "

" समाजांतले पुरुष नियमित असतात ते समाजांत असलेल्या बायकांच्या वांट्यास यावयाचे. लग्न उशीरा केलें म्हणजे पुरुष जास्त होतात अशांतला भाग नाहीं; तथापि ज्या कांहीं स्त्रियां अल्पवयांत मृत्यु पावतील तितक्या लग्नास उमेदवार बायकाहि कमी होतील. आणि पुरुष व बायका यांच्या लग्नाच्या वयातलें अंतर जर कमी कमी होत चाललें तर लग्नाच्या मुलींची संख्या कमी होऊन मुलीच्या लग्नाला अडचण कमी पडेल आणि थोडीबहुत सौख्यवृद्धि देखील होईल. आतां नवरा कधी मरणार हें भविष्य कोणास कधीं करतां येत नाहीं; आणि सोळाव्या वर्षीच्या आणि बाराव्या वर्षातल्या मुलीस वैधव्य येण्याचे संभव जवळ जवळ सारखाच आहे. बाराव्या वर्षाच्या मुलीनें सोळाव्या वर्षाच्या मुलाशीं लग्न करणें आणि सोळाव्या वर्षाच्या मुलीनें विसाव्या वर्षाच्या पुरुषाशीं लग्न करणें या गोष्टी जवळ जवळ सारख्याच होत. केवळ चार वर्षे उशीरानें लग्न होण्यानेंच स्त्रियांस लग्नाची संधि जास्त मिळणार नाहीं त्यामुळें आई बापावरचा लग्न खर्च कांहींच्या बाबतीत वांचेल. बारा ते सोळापर्यंत ज्या मुली मरतात त्यांच्या आईबापांच्या लग्न खर्च फुकट गेला आणि त्यांच्या नवऱ्यांनां दुसरें लग्न करावें लागणार. त्यावेळेला नवीन खर्च पडणार म्हणजे उशीरां लग्न झालें म्हणजे नवऱ्यांच्या आईबापांचाहि खर्च वांचेल पण दुसरा फायदा विशेष नाहीं. "

" ताईसाहेब, चुकलां तुम्ही. तुम्ही एक फायदा विसरलां. "

" काय बाई धीटपणानें बोलायला लागली. वर्गांत कधीं असें बोलली असती कां ! मला असें वाटतें कीं तुला हा धीटपणा लग्न झाल्यामुळें आला. माझ्यापेक्षांहि जास्त वयाच्या पुरुषांबरोबर बरोबरीच्या नात्यानें बोलायची आणि भांडायची संवय लग्न झाल्यामुळें आली. "

हें वाक्य शारदाबाई उच्चारतात तोच बिंबाबाईचें लक्ष आपल्या बोलण्याकडे नाहीं तर दुसऱ्याच कांहीं स्मृतिचित्रांनीं तिचे मन व्याप्त झालें आहे असें

शारदाबाईस दिसलें. तिनें एक मिनिटभर वेळ पूर्वीच्या आठवणीसाठीं बिंबाबाईस देऊन पुन्हां विचारलें कीं, " वधूवरांच्या वयांतील अंतरांत बदल न करतां केवळ उशीरानें लग्न करण्यांत होणारा कोणता फायदा मी विसरलें. चार वर्षे लग्न उशीरानें केल्यामुळे जो उशीरानें खर्च करावा लागणार आणि लग्नासाठीं खर्चे करावा लागणाऱ्या रकमेचें चार वर्षांचे व्याज वांचेल हाच फायदा काय ? "

" तो फायदा माझ्या मनांत नव्हता. तुम्ही पडला मास्तरीणबाई, तुमचें सरळ व्याज चक्रवाढ व्याज या गोष्टीकडेसच लक्ष जातें मला चक्रवाढ व्याज अजून काढतां येत नाहीं. "

" तर मग तुमच्या मनांत काय फायदा होता ? " शारदाबाईनीं साशंक पृच्छा केली.

" माझ्या मनांत विचार आला तो असा. फायदा असा कीं, ज्या मुली सुदृढ नाहींत त्या, आणि ज्या आहेत त्या, या दोघी मिळून त्यांतली निवड लग्नासाठीं होते, आणि ती दोन्ही पक्षाच्या पैशाकडे पाहून होते. चार वर्षे उशीरानें लग्न झालें तर, अधिक सुदृढ मुलींचीं लग्ने अधिक सुदृढ पुरुषांशी लागून चांगली प्रजा होणार नाहीं काय ? योग्य नवऱ्याला योग्य बायको मिळावी ही गोष्ट जरा उशीरानें लग्न झाले तर अधिक साध्य नाहीं कां होणार ? "

" हा मुद्दा माझ्या लक्षांत आला नाहीं. मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं, जर स्त्रियांमधील वैधव्य कमी करावयाचें असेल, आणि प्रत्येक स्त्रीची लग्न करण्याची संधि जर अधिक वृद्धिंगत करावयाची असेल तर स्त्रियांचें त्यांच्या समवयस्क पुरुषांशीं लग्न करून द्यावें. अलीकडे आपले होतें काय, कीं मुलगी आठ वर्षांची आणि मुलगा वीस वर्षांचा. या पद्धतीमुळें समाजाचें मोठें नुकसान होत आहे. ही पद्धति कोणी जाणून बुजून आणली नाहीं. कांहीं अंशीं या पद्धतीबद्दल कोणास दोष द्यावयाचा असेल तर तो सरकारला दिला पाहिजे, कारण अलीकडे नोकरींत येण्यासाठीं पूर्ण शिक्षण म्हणून जे सरकारनें योजिलें आहे त्याचा परिणाम असा होतो कीं, मुलगा वीस बावीस वर्षांचा होईंपर्यंत शिकत रहावें लागतें. "

" सरकारचा अपराध काय ? "

" सरकारनें ही भीति कांहीं जाणून बुजून उत्पन्न केली नाहीं, पण सरकारनें उत्पन्न केलेल्या परिस्थितीचा हा परिणाम आहे हें खचित. "

" आपल्या देशामध्यें आज जितक्या विधवा आहेत तितक्या विधवा स्त्रियांची लग्नें जर उशीरानें झालीं असती तर आज विधवा असत्या कां ? "

" विधवा कदाचित नसत्या, पण पुष्कळ कुमारी अविवाहित राहिल्या असत्या, कारण समाजातील पुरुषांची संख्या नियमितच आहे. कोणीहि कांहीं जरी सुधारणा केली तरी तो काय करणार ? फार झालें तर तो पुरुषांची जी वांटणी आज होते ती तो उद्यां निराळया प्रकारें करणार. "

" पुरुषांची वांटणी निराळी करण्यासाठीं म्हणूनच केवळ पुनर्विवाहासारखे उपाय योजावयाचें कीं ते दुसऱ्या कोणत्या कारणासाठीं पुरुष व स्त्रिया यांत समता असावी वगैरेसाठीं योजावयाचें ? "

" कां करावयाचे हे मी सांगत नाहीं. सध्यांचे सुधारक म्हणविणारे लोक हे तर पूर्णपणें नालायक आहेत, कारण समाजाचा शास्त्रीय अभ्यास कोणीच केलेला नाहीं. अगर हे शहाणेसुरते म्हणविणारे लोक किती परस्परविरुद्ध उपदेश करतात म्हणून सांगूं ? हुंडा घेऊं नका म्हणून म्हणणारे लोक हेच. आणि विधवांनीं पुनर्विवाह करावा असे म्हणणारे लोक हेच. पुनर्विवाह जर आपल्या समाजांत वाढूं लागला तर कुमारिकांस लभ्य अशा पुरुषांची संख्या कमी होऊन हुंडा नाहीं कां वाढणार ? तर असल्या बेशिस्त विचाराच्या मंडळींच्या पुनर्विवाहाच्या तरफदारींत असलेल्या हेतूंचें पृथक्करण तरी कशाला करा ? "

" काय बाई तुम्ही पुनर्विवाहाच्या विरुद्ध आहांत ? "

" मी पुनर्विवाहाच्या विरुद्धहि नाहीं आणि कशाच्याच विरुद्ध नाहीं. मी प्रसंग पडल्यास एकदां सोडून दोनदां पुनर्विवाह करीन. परंतु वादविवाद करतांना जें कांहीं खरेंखरें आहे तें सांगितलें पाहिजे. "

"तुमच्या मताने जर विधवानीं पुनर्विवाह केल्याच्या योगाने कुमारिकांचीं लग्नें करण्याची संधि कमी होत असेल तुम्ही एक तरी पुनर्विवाह का करणार ?"

"बाई गे, जगांत जो तो मनुष्य आपल्या फायद्याकरितां खटपट करीत असतो. लक्षाधीश दोन लक्ष रुपये मिळविण्यासाठीं खटपट करीत असतो; किंवा त्यास दुर्दैवानें गरिबी आली असतां पुन्हा श्रीमंत होण्याची खटपट करीत असतो. तो कुठें मनात विचार करतो कीं, मी एकदा श्रीमंती उपभोगिली; आतां मी पुन्हां कशाला श्रीमंत होऊं? जगात दुसरे लोक गरीब आहेत, त्यानीं आतां श्रीमंत व्हावें म्हणजे झालें."

"तुम्ही मघाशीं म्हणाला कीं थोडका वेळ तरी सौभाग्याचा उपभोग घेणें हें अविवाहित स्थितीपेक्षां पुष्कळ चागले. तुमचे असें मत आहे काय, कीं आपल्या देशात विधवा पुष्कळ आहेत आणि मोठ्या वयाच्या कुमारिका नाहींतच. ही स्थिति विलायतेंतल्या स्थितीपेक्षां बरी आहे. मी असें ऐकते की विलायतेमध्यें हजारों उपवर प्रौढ स्त्रिया लग्नाविरहित आहेत."

"मी विलायतेला कधीं गेलें नाहीं, त्यामुळें विलायतेची स्थिति आणि येथची स्थिती याची तुलना मला करतां येणार नाहीं."

"तरी पण तर्कानें आपण काय सांगू शकाल?"

"ज्याप्रमाणे आपल्या विधवाचे कनवाळू सुधारक येथील विधवाच्या अश्रूंबद्दल आक्रोश करीत आहेत त्याप्रमाणेच तिकडचीं विचारी माणसे अविवाहित स्त्रियांचा प्रश्न घेऊन त्यावर भाराभर पुस्तकें लिहीत आहेत. तिकडे असेंहि कांहीं तत्त्ववेत्ते म्हणत आहेत कीं, तरुण पुरुषानीं व बायकांनीं लग्न करण्याच्या भानगडींत पडण्याचे कांहीं कारण नाहीं त्या दोघांनीं दिल जमल्यास एकत्र रहावें आणि पुढें न जुळल्यास वेगळें व्हावें. आतां तिकडच्या नीति-कल्पना जर आपल्या कल्पनांपेक्षां निराळ्या असल्या तर जी विवाहहीन स्थिति आपणास तर्कानें दुःखमय वटेल ती कदाचित तशी नसेल."

"आपल्या इकडची स्थिति घेऊन तर्क कसा काय चालतो?"

" आपल्या समाजांत विधवा पुष्कळ असणें हें कुमारिका पुष्कळ असण्यापेक्षां वाईट असें मी म्हणावयास तयार नाहीं. आणि शिवाय पुनर्विवाहाच्या प्रश्नाविषयीं आजच्या सुधारकांचीं मतें मला मान्य नाहीत. सर्व स्त्रियांचे कैवारी सुधारक स्त्रियांच्याच मनाची तपासणी करून पुस्तकें लिहीत नाहींत. बरेचसे सुधारक स्त्रियांचें हित कशांत आहे याची स्वतःच कल्पना करून तर्कटें रचतात, आणि ज्या स्त्रियांनां आजकाल शिक्षण थोडेबहुत मिळतें त्यांनां सुधारकांच्याच ग्रंथांची संथा दिली जाते. माझें मत असें आहे कीं, त्या बाबतींत बायकांनीं स्वतः विचार करून मतें बनविलीं पाहिजेत, आणि सुधारक मतें घेण्याची जीं आज कांहीं अशीं बळजबरी बायकांवर होत आहे तिच्यांतून त्यानीं बाहेर पडावें."

" स्त्रियांवर सुधारक नवऱ्याकडून जुलुम होतो तो कसा ? "

" पुष्कळ सुधारक आपल्या बायकांस आपलीं धर्मविषयक मतें पाळूं देत नाहींत. देवीच्या देवळांत जावयास चोरी ज्या सुधारकांच्या बायकांनां आहे असें सुधारक मी पुष्कळ पाहिले आहेत."

" नवऱ्यास आपल्या मताप्रमाणें बायकोस वागावयास लावण्याचा अधिकार नाहीं काय ? "

" मी अगदींच नाहीं असें म्हणत नाहीं, पण स्त्रीस्वातंत्र्याचे चहाते सुधारणेच्या नांवाखालीं बायकांवर कसा जुलूम करतात हें मी पाहिलें आहे. परंपरागत गोष्टी कोणी बायकांस करावयास लावल्या म्हणजे तो झाला जुलूम, आणि नवीन गोष्टी बायकांस दडपेशाहीनें करावयास लावल्या म्हणजे ती झाली सुधारणा !! "

" म्हणजे आपलें म्हणणें असें आहे कीं काय कीं, पूर्वीच्या जुन्या लोकांइतके अर्वाचीन सुधारक स्त्रियांस आपल्या हुकमतींत ठेवण्याचा प्रयत्न करतात. "

" पूर्वीच्या इतकाच नव्हे तर पूर्वीपेक्षाहि अधिक. "

" तें कसें काय ? "

" माझे वडील दामोदरशास्त्री हे पक्के वेदांती होते. त्यांचा व्रतें, उद्यापनें आग्रणें इत्यादिकावर विश्वास नव्हता; आईला ह्या गोष्टी हव्या होत्या, तथापि त्यानीं त्या टाकून देण्यासाठीं आईस कधींच छळलें नाहीं. ते नुसते एवढेच म्हणत की, 'व्रतें, उद्यापनें इत्यादि कर्मे हीं अज्ञानमूलक आहेत. 'ज्ञानादेव तु कैवल्यं' याची प्रतीति तुला झाली नाहीं म्हणून तुझी अशी वृत्ति आहे. तूं सध्या खरी भक्ति मनांत ठेव म्हणजे कालांतरानें तुला ज्ञानप्राप्ति होईल' असें म्हणून ते आईच्या नेहमीच्या वाचनाच्या शिवलीलामृतांतील दोन तीन ओळी-कडे तिचे लक्ष ओढीत."

"त्या कोणत्या दोन तीन ओळी?"

" त्या ह्या —

वेदभ्यास नको व्रते मख नको तीव्र तपें तीं नको
काळाचें भय मानसीं धरूं नको, दुष्टांसि शंकूं नको
ज्याचीया स्मरणें पतीत करती तो शंभु सोडूं नको |

ही आमच्या वडिलांची उदारता!! पण आजकालच्या सुधारकांची स्थिति तशी नाहीं."

" त्यांची कशी काय आहे?"

हा प्रश्न विचारतांच आमच्या शारदाबाई मास्तरीण यानीं डाकिणीची मुद्रा धारण केली. त्यांच्या अंगांत भयंकर आवेश चढला आणि त्या म्हणाल्या,

"आमची आजची नामर्द सुधारक मंडळी आपली तत्त्वें बायकांवर लादून त्यांचा खून करण्यास कमी करीत नाहीं."

" खून!"

" होय खून, मी त्यास दुसरा कोणताहि शब्द योजूं इच्छीत नाहीं. माझी बिचारी ताई कशी वारली हें आठवतांच माझ्या अंगाचा तिळपापड होतो आणि मी आपल्या मेहुण्यास कोणते भयंकर शासन करूं असें मला वाटतें."

" बाई झालं काय ? आपली बहीण तर आजारी पडून वारली. तिचा खून झाल्याचें मी कोठे ऐकलें नाहीं. "

" आपण ऐकलं नाहीं; कारण कायद्याच्या दृष्टीनें हा खून नव्हता. परंतु असलेच खून जास्त भयंकर होत. "

" पण बाई झालं काय ? "

" झालं एवढेंच कीं आमचे मेहुणे फ्रान्समधून शिकून आले. त्यानां भलते सलते पदार्थ खाण्याची संवय लागली आणि जातिभेद मोडण्याच्या मिषानें त्यानीं स्वयंपाकाकरितां एक मुसुलमान बबर्जी ठेवला. "

" अलीकडे मुसुलमानी नोकर ठेवणें आणि प्रसंगीं स्वयंपाकीहि ठेवणें ही एक पद्धतच पडूं लागली आहे खरी; परवां मी नागपूरला गेलें होतें तेव्हां तेथें पाहिलें कीं बहुतेक बंगाली मंडळींच्याकडे नोकर मुसुलमान! त्या बंगाली मुली देखील मुसुलमानणीप्रमाणें दोन नाकपुड्यांच्या मधल्या पाळीला टोंचून लोलकांच्या नथा घालतात. "

" आमचे शहाणे मेहुणे कलकत्यास होते, तेथें त्यानीं असा आग्रह धरला कीं, बायकोनें मुसुलमानांच्या हाततेंच खाल्लें पाहिजे. अर्थात त्याला आमची ताई कबूल होईना. तेव्हां त्यानीं तिला दुसरें कांहीं खाण्याची बंदी केली. तेव्हां ती नुसत्या दुधावर दिवस काढूं लागली. कलकत्यांतलें तें दूध, स्वच्छ म्हणून कधींहि नसावयाचें, आणि स्वदेशीची चळवळ करणारे कलकत्यांतले लोक विलायती डब्यांतील गोठविलेल्या दुधाचा चहा करणारे. आमच्या ताईला कलकत्यांतल्या त्या घाणेरड्या दुधावर राहण्यानें क्षय झाला; आणि ती पुढें मेली. आतां याला खून म्हणूं नये तर दुसरें काय म्हणावें ? "

थोडका वेळ आमच्या शारदाबाई स्तब्ध झाल्या. समोरून कोणी पुरुष येत आहेत असें दिसलें, तेव्हां ते गेल्यानंतर त्यानीं पुन्हा बोलण्यास सुरवात केली.

" मी थोडक्यांत म्हणतें या पुरुषांनां बायकांनीं पुनर्विवाह करावा कीं करूं नये यासंबंधानें बोलावयाचा बिलकूल हक्क नाहीं. सध्यां या संबंधानें तेच वादविवाद

करीत आणि आहेत. यावरून असें दिसतें कीं त्यांनां असें वाटतें कीं, बायकांची विल्हेवाट कशी लावावी हें ठरविणें हें काम त्यांचें आहे. वृत्ति तर अशा प्रकारची अणि पुन्हां स्त्रीस्वातंत्र्यावर लेख लिहिण्यास देखील हे गुलाम तयारच! पर्वा स्त्रीस्वातंत्र्याबद्दल खटपट करणारे आम्ही असें दंभ करणाऱ्या मुंबईला प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांतला एक लेख पाहिला तेव्हा मला असें वाटलें कीं, एक चागला नऊ वाद्यांचा कोरडा घ्यावा आणि त्या सुधारणावादी पत्रकाराची चांबडी लोंबवावी."

"अग, त्यानीं केलें काय?"

"अग! तो मेला पत्रकार एका प्रसिद्ध सुधारकाच्या दुटप्पी वर्तनावर टीका करीत होता. तो म्हणतो कीं, नवरा सुधारणेवर व्याख्यानें देतो आणि यानें घरांत सुधारणा किती आणली हें पाहिलें तर बायको व्रतें-उद्यापनें करते असें दिसेल. म्हणजे याचा अर्थ असा कीं, नवऱ्याने बायकोला आपल्या धर्ममतां-प्रमाणें वागूं देतां कामा नये. बाहेर कोठें कर्तृत्व दाखवितां येत नाहीं म्हणून बायकोचीं व्रतें उद्यापनें मोडण्यासाठीं उपदेश करणारे असले हे सर्व सुधारक पत्रकार घ्यावेत आणि एका दोरीनें अगदीं जवळच्या झाडाच्या फांदीस टांगून फांशी द्यावेत."

"बरं पुरुष-सुधारकाचीं मतें राहोत, कांहीं सुधारणावादी आपल्या बायका तर आहेत ना?"

"आहेत; पण त्यांपैकीं बहुतेक अडाणी सुधारकांचीं गचाळ पुस्तकें वाचून पोपटपंची करण्यास शिकलेल्या अणि सुधारक पत्रकारांकडून स्तुति मिळवून प्रसिद्धीस येऊं पहाणाऱ्या. अलीकडेहि अशा कांहीं विदुषी दिसतात कीं ज्यांनां लग्न म्हणजे काय हें ठाऊकच नाहीं; आणि चालल्या पुनर्विवाहावर व्याख्यान द्यायबाला! त्यांनां असें वाटत असेल कीं, हे मेले दुष्ट पुरुष 'प्रपोज'च करीत नाहींत."

"बरं बाई! तुम्ही कौमार्यापेक्षां वैधव्य अधिक पसंत करतां अणि विधवाची स्थिति कुमारीपेक्षां चांगली म्हणतां याचा अर्थ काय?"

"हें पहा बिंबाबाई, आज तुझें वय सोळा वर्षांचे आहे आणि तुला आज वैधव्य प्राप्त झालें आहे; तुझी ही स्थिति आजन्म कौमार्यापेक्षां अधिक सुखकर आहे असें मी समजतें, कारण कीं प्रत्येक मनुष्यास अगर बायकोस जगांत कांहींतरी दिवस काढण्यास हेतु लागतो. या मुलाचें संगोपन करणें आणि या मुलाचीच काळजी वाहून त्याला मोठें करणें यातच तुझें आयुष्य जाईल, आणि तुला जीवितक्रम इतका कंटाळवाणा वाटणार नाहीं. पुरुषाला जगात रहाण्यास खटाटोप करण्यास उत्साहानें इकडले डोंगर तिकडे करण्यास एक ध्येय लागतें. अविवाहित पुरुष बहुतेक सर्व गोष्टींविषयीं बेफिकीर असतात; आणि त्यांच्या पुढें जर कोणतेंहि प्रापंचिक किंवा सामाजिक ध्येय नसलें तर ते पूर्णपणें दुर्वृत्त बनतात. आपल्या बायकापोराचें पोट भरणें हें कर्तव्य पुरुषापुढें नसतें तर बहुतेक सर्व पुरुष जगाला उपद्रव बनले असते. बायकाची गोष्ट तशीच. प्रथमतः नवऱ्याची काळजी करावी, नवऱ्यास सुखी ठेवावे या हेतूमुळें त्यांच्या आयुष्याला एक दिशा लागते. वैधव्यानंतर जर मुले असलीं तर त्या मुलांचें संगोपन करण्यात आणि आपलें प्रेमसर्वस्व त्यानां देण्यात त्यांस मोठी धन्यता वाटते. या निरस आणि कंटाळवाण्या जगात कालक्रमणा करण्यास आयुष्याला हेतु लागतो. तर बिंबाबाई, तुझ्या आयुष्याला हेतु आहेच आहे. यूरोपातील सोळा वर्षांची एखादी मुलगी तुझ्या जागीं असती तर तिचें आतापर्यंत लग्नहि झालें नसतें ; आणि सोळा वर्षांचा पुढील सर्व काळ जर तिला कौमार्यावस्थेंतच कंठावयाचा असता तर तिची स्थिति तुझ्यापेक्षाहि अधिकच शोचनीय असती. मी खरोखरच सागतें कीं तूं माझ्यापेक्षा अधिक सुखी आहेस. मी पुस्तकें वाचतें, प्रसंगीं वर्तमानपत्रातून लिहिते ; कधींकधीं व्याख्यानेंहि देते, तथापि या सर्वांच्यामुळें माझ्या आयुष्याला स्पष्ट हेतु उत्पन्न होत नाहीं. आम्ही आयुष्यांत करावयाचें काय ? आम्ही स्त्री-शिक्षण देणार ; पण आम्ही स्त्री शिक्षण देणार म्हणजे तरी काय करणार ? स्त्रियांचे जीवित माझ्यासारखीच्या प्रयत्नानें खरोखरच अधिक सुखकरच होत आहे की काय असा संदेह वारंवार उत्पन्न होतो. मी दिलेल्या शिक्षणामुळें स्त्रियांचें कुटुंबसौख्य अधिक वाढलें

आहे अशी माझी खात्री होत नाही आणि मी जरी कल्याण होतें अशी आपल्या मनाची कशीबशी समजूत करून घेतली तरी त्यानें समाधान होत नाहीं. आजकाल कोणतीहि योजना मनात आणली तरी तिनें होणारें देशकल्याण हें हवेंत पसरणाऱ्या धुराप्रमाणें अस्पष्ट आहे. व तें तरी झालें आहे कीं हेंहि अजमावतां येत नाहीं. ज्याप्रमाणें निराकार आणि विश्वव्यापी आणि निर्गुण परमेश्वर खोटें बोलणाऱ्या प्रार्थनासमाजिस्टांखेरीज कोणाला कल्पिता येत नाही आणि ज्याप्रमाणें त्या ईश्वराचें अस्तित्व मनास पटण्याकरितां त्याची मूर्ति करून आपण त्याचें पूजन करतों, त्याप्रमाणें माझी स्थिति झाली आहे. मी कांहीं ख्रिस्ती लोकांत तें निराकार परमेश्वराची कशी कल्पना करतात म्हणून प्रश्न केला; तेव्हां मला असें कळून आलें कीं त्यांच्या कल्पनेंत परमेश्वर साकार येतो. आणि तो देखील मनुष्याकार आणि त्यातल्या त्यात पुल्लिंगी येतो. मला माझ्या आयुष्याला देशकल्याणापेक्षा अगर समाजकल्याणापेक्षां अधिक स्पष्ट हेतु पाहिजे."

"तर मग तुम्ही असें करा कीं समाजकल्याणेच्छु पुरुष कोणी शोधून काढून त्यांच्याशीं लग्न करा, म्हणजे त्यास सुखी करून त्याच्याकडून देशकार्य करविण्यांतच तुमच्याकडूनहि देशकार्य होईल."

"या प्रकाराचा विचार माझ्या मनास अपरिचित नाहीं; पण देश-कार्यासाठीं उत्सुक असलेले पुरुष काय वाटेवर आहेत ?"

---

प्रकरण ७ वें

# अनंतराव घरकुटे

अनंतराव हे थोड्या पगाराच्या नोकरीपासून पुढें ई. ए. सी. झाले. ही गोष्ट पाठीमागें सांगितलीच आहे. अनंतरावांस आजकाल ज्यूईट म्हणणारे,

लोक पुष्कळ आहेत. कारण साहेब आणि त्याचा कारकून यांचा परस्पर संबंध कसा असावा याविषयींची आजची आणि पन्नास वर्षांची समजूत यांमध्यें महदंतर आहे. भोंसलेशाही आणि पेशवाई या दोन्हीं ठिकाणीं असें होतें कीं सरकारी नोकर आणि खासगी नोकर यांमध्यें तीक्ष्ण अंतर नसे. तालुकदार म्हणजे जवळ जवळ त्या प्रदेशाचा राजा, तो कांहीं विवक्षित रकम सरकारांत पाठवावयाचा; बाकी त्या प्रदेशाचा तो पूर्णपणे सत्ताधीश. असें असतां जो मनुष्य सरकारी नोकर होई, तो खरोखर त्या तालुकदारांचा स्वतःच नोकर होई. धन्याच्या हिताविषयीं दक्ष असणें, धनी सांगेल ते काम बिनबोभाट दुसऱ्या कांहीं एक गोष्टी मनांत न आणतां बजावणें या सर्व गोष्टी तेव्हां सेवकधर्म होत्या. पूर्वीचे धनी जाऊन तेथें इंग्रज आल्यामुळें सर्वच मनु पालटला. मनःपूर्वक सेवा परक्या जातीची होणें शक्य नाहीं. मनाची पूर्वीची प्रवृत्ति तर अशी कीं धन्याला देवाप्रमाणें मानावें. पूर्वीची दुसरी प्रवृत्ति म्हणजे बाह्य लोक सर्व हलके आहेत, आणि त्यांचा विटाळ झाल्याबरोबर स्नान केलें पाहिजे हेहि परंपरागत तत्त्वज्ञान. दोहोचें मिश्रण झाल्यानंतर मनुष्याचें आचरण कसें असावें याबद्दल वारंवार संदेह उत्पन्न होतो. सरकारचा नोकर साहेब व देशी संस्थानिक यांत फरक होई तो असा. कोणी तालुक्याएवढ्या संस्थानच्या राजाचें स्तवन केल्यानें वाईट होत नाहीं, पण जर कोणी डेप्युटी कमिशनरावर काव्य लिहिलें तर "फोर्ब्स विलास" "क्राफर्ड महाकाव्य" करणाऱ्या "अवाच्य नांवाच्या" कवीच्या कोटींत जाऊन बसतो. आज कचेरींतला कारकून साहेबाच्या घरची भाजी आणि अंडी विकत आणण्यासाठीं बाजारांत गेल्यास त्यास लोक नांवेंच ठेवतील, परंतु स्वजातीय राजा अगर गुरु यांच्या सेवेस कोणी अहोरात्र राहिल्यास त्याला कोणी नांवें ठेवील काय!

अनंतराव घरकुट्टे यास लोक नांवेंच ठेवीत होते. त्याचें वर्तनहि "महाराज काय आज्ञा आहे!" असें म्हणून डेप्युटी कमिशनरच्या सेवेंत दंग राहणाऱ्याचें होतें. यावर त्याचा कटाक्ष होता. अनंतराव कारकुनाचे ई. ए. सी. झाले आणि याचें कारण त्याच्या आश्रयदाता साहेब हाहि मोठ्या

पदवीस चढला होता हें होय. साहेब जसे मोठे झाले तसे त्यांचे प्रिय नोकरहि मोठे झाले.

अनंतराव हे जुन्या काळचे मुत्सद्दी म्हणून समजले जात. जुन्या काळच्या मुत्सद्दीपणाची मुख्य लक्षणें दोन तीन होती ; एक तर कोणा अधिकाऱ्याचें सरकारांत मोठें वजन आहे हें ओळखून त्याचा आपणावर लोभ जडवून घेणें आणि आपणहि त्याच्या सुखासाठीं आणि बडेजावासाठीं खटपटी करणें. मुत्सद्दीपणाचें दुसरें उपांग म्हटलें म्हणजे आपलें साहेबांपाशीं वजन आहे असें लोकांस भासवून लोकांस आपल्या भोंवतालीं घिरट्या घालावयास लावणें, आणि प्रसंगविषयीं लोकांची कामें करून देऊन त्यांच्याकडून बक्षिसी मिळविणें. शिवाय सरकारी अधिकाऱ्यांच्या मनांत कांहीं खुळें अगर आवडीनिवडी असल्या तर आपल्या आवडीनिवडी तशाच बनवून लोकांस सरकारी अधिकाऱ्यांच्या इच्छा सफल करण्यासाठीं बनविणें. उदाहरणार्थ, गांवांत अमूक युरोपीयन वस्तीच्या शेजारीं एखादा पार्क पाहिजे असें कांहीं अधिकाऱ्यास वाटलें तर तो पार्क घडवून आणण्यासाठीं फंड तयार करावयाचा, त्या फंडांत गांवांतील शेट सावकारांनाच पैसे घालावयास सांगावयाचें. इकडे तुम्हीं असें केल्यानें सरकारची आपणावर मेहेरनजर होईल हें लोकांस भासवयाचें आणि त्या मनुष्याची शिफारस अधिकाऱ्यापाशीं वेळ काढून करावयाची. मराठेशाहींत हलक्या हुजऱ्याचें महत्त्व असें, तें महत्त्व आणि दिवाणाचे महत्त्व हीं दोन्हीं महत्त्वें साहेबांकडे एकसारखें जाऊन त्याच्यापाशीं नेहमीं हजर असणाऱ्या शिरस्तेदारास अव्वल इंग्रजींत होतीं. त्याला जर कोणाचा मत्सर झाला तर साहेबाच्या बटरलचा होई. अनंतराव घरकुट्टे यांस जरी इंग्रजी वगैरे कांहीं एक येत नव्हतें तरी एकनिष्ठ साहेबसेवेमुळेंच त्यांनां महत्पदावर चढतां आलें. ज्याप्रमाणें एका नवऱ्याला दोन बायका असल्या म्हणजे त्यांतल्या त्यांत जी लाडकी असेल ती दुसरीनें नवऱ्याच्या आसपास फिरकूं देखील नये म्हणून प्रयत्न करते त्याप्रमाणें साहेबाची संनिधि दुसऱ्या कोणास प्राप्त होऊं नये म्हणून व साहेबाची मर्जी स्वतःवरच रहावी म्हणून धडपडणाऱ्या कारकुनास करावें

लागतें, आणि या प्रकारची मत्सरयुक्त खबरदारी अनंतरावानीं चांगली ठेविली होती आणि या खबरदारीच्या साहाय्यानेंच तें पुढें डेप्युटी कमिशनरचे शिरस्तेदार झाले; पुढें कालान्तरानें तहशिलदार झाले. ते तहशिलदार असतांना अनंतरावानीं आपल्या अधिकाराचा उपयोग करून काहीं मालगुजारी गांवें आणि बराच जमीनजुमला खरेदी केला होता. जमीन लिलांवानें विकावयास काढली आणि तहशिलदारसाहेब ती स्वत: घेणार आहेत हे गावात खासगी रीतिनें जाहीर असलें म्हणजे तहशिलदाराच्या भावावर कोणी भाव चढवूं इच्छित नाहीं, कारण अधिकाऱ्याशीं वांकडे लोकांस नको असते. तहशिलदार स्वतःच्या नांवावर जमीन घेतच नसत. पण बहुधा बायकोच्या नांवावर घेत. तसें केलें म्हणजे कायद्याच्या फटींतून त्यास सुटतां येई.

अनंतराव हा लहान पदापासून मोठा झाला. पुष्कळ लोकांस मोठ्या पदावर चढत असता जी द्रव्यलोभाची हाव सुटते तिचा अनंतरावांच्या मनावर पगडा इतका काहीं भयंकर होता कीं त्याच्या योगानें त्यांची सदसद्विवेक बुद्धी देखील बरीच हीणकस झाली होती. त्यांनी आपली व्यवहार दृष्टी लग्न-संबंधातहि ठेविली.

त्यांची मुलगी बिबाबाई जसजशी मोठी होऊं लागली तेव्हां त्यांच्या मनांत तिच्या लग्नाविषयीं विचारांचें काहूर माजलें. लग्नसंबंध हा जो जोडावयाचा असतो तो बराच विचारपूर्वक जोडावयाचा असतो, आणि अनेक दृष्टीनें व मुत्सद्दीपणानें आम्ही विचार करतों या प्रकारचा बाणा बाळगणाऱ्या अनंतरावास मुलीचें लग्न म्हणजे देखील मुत्सद्दीपणाचाच एक डाव अशी त्यांची समजूत झाली, आणि आपल्या मुलीचा त्या दृष्टीनें ते विचार करूं लागले.

" लग्न म्हणजे काय ? " तर गरीब लोकांनां अगर सामान्य लोकानां मोठ्या लोकांशीं संबंध जोडण्याची संधि होय. आपली मुलगी मोठ्यांच्या घरीं पडली पाहिजे पण त्याच्यासाठीं आपल्याला खर्च येतां कामा नये. मुलगी मोठ्या श्रीमंत मनुष्यास विकावयाची असें करण्यांत अर्थ नाहीं. त्याच्या योगानें आपल्याविषयीं जांवयाचें मत खराब होतें, आणि शिवाय मनुष्य बराच म्हातारा

असल्याशिवाय पैसे भरून मुलगी विकत घेणार नाहीं. पैसे भरून विकत घेणारा म्हातारा म्हणजे देणार किती ? हजार बाराशें रुपये. त्याच्या योगानें आपलें काय होतें ? शिवाय आपण पडलों तहशिलदार. मुलगी विकणें गरीब भिक्षुकास शक्य होतें पण आपणांस लोक काय म्हणतील ! शिवाय पैसे भरून ज्याला मुलगी विकत घ्यावयाची असेल असा म्हातारा आमच्याकडे कशाला येतो ? तो कोणातरी गरीब भिक्षुकाकडे जाणार आणि जिकडे मुलगी अत्यंत स्वस्त दरात मिळेल तिकडे तिकडे तो वळणार ! तर आता तहशिलदाराच्या पदवीच्या मनुष्यानें आपल्या मुलीचें लग्न तरी कसें करावें, कीं ज्याच्या योगानें मुलगी मोठ्यांच्या घरीं पडेल, म्हाताऱ्याला द्यावी लागणार नाहीं, लग्नाला आपल्याला खर्च येणार नाहीं आणि पुढें मागें झाला तर फायदाच होईल.

या कठिण प्रश्नास पोक्त मुत्सद्दी अनंतराव घरकुट्टे यानीं जें उत्तर शोधून काढिलें आणि अमलात आणिलें तें येणेंप्रमाणें.

साधारणपणें तीस पसतिशीच्या सुमाराचा बिजवर नवरा पहावा आणि तो देखील जुन्या सरदार अगर मालगुजार याच्या घराण्यांतला पहावा. बिजवराशीं लग्न लवकर जुळविता यावें यासाठीं मुलगी १४ वर्षांपर्यंत वाढूं द्यावी. नवरा त्या वयाचा असला म्हणजे मुलीचेंहि फारसें अकल्याण नाहीं. संबंध थोरामोठ्याशीं जुळेल आणि हुंडाहि द्यावा लागणार नाहीं. मालगुजार इत्यादि मंडळीमध्यें शिकलेले लोक थोडकेच असतात आणि त्यामुळें जांवयाच्या घरचा कारभार हळूहळू आपल्याच हातात येईल. हा कारभार आपल्या हातीं आला म्हणजे आपलें पेन्शन घेतल्यामुळें होणारें नुकसान होणार नाहीं.

याप्रमाणें पोक्त विचार करून अनंतरावानीं आपल्या मुलीचें लग्न १४ व्या करावयाचे ठरविलें.

मुलीचें लग्न झालें तोपर्यंत अनंतराव एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर होऊन त्यानीं पेन्शनहि घेतलें होतें.

मुलीचें लग्न रायपूरच्या हरिहरराव तांबडे या मालगुजाराशीं झालें. या मालगुजाराचा रायपुरास तात्यापाऱ्यांत एक मोठा वाडा होता. तेथेंच आमच्या

अनंतरावांचे जावई रहात असत. हरिहरराव तांबडे यांची प्रकृति चागल्यापैकीं नव्हती पण आजकाल किती आईबाप नवऱ्यामुलांच्या प्रकृतिकडे पहातात ? त्यांतल्यात्यांत श्रीमंताचें पांघरूण वर असलें म्हणजे दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींकडे लक्ष जात नाही. हरिहरराव तांबडे मालगुजार हे लग्न झाल्यानंतर चार वर्षां-तच मृत्यू पावले आणि अनंतराव घरकुट्टे यांची कन्या बिंबाबाई हिला वैधव्य-दशा प्राप्त झाली. हरिहरराव गेले पण आपल्या इस्टेटीला प्रभाकर हा वारस ठेवून गेले आणि त्यामुळें बिंबाबाईस भावी आयुष्य अगदींच दुःखमय झाले असतें तें काहीं दिवस तरी झालें नाहीं. गेल्या प्रकरणात शारदाबाईची विद्यार्थिनी बिंबाबाई हीच अनंतरावांची चिरंजीविनी हें वाचकांच्या लक्षात आलें असेल

---

प्रकरण ८ वें

## बिंबाबाईचें वैधव्य

बिंबाबाईची ओळख वाचकास झालीच आहे. वाचकांची ओळख ज्या वेळेस झाली त्या वेळेस तिचा नवरा नुकताच वारल्यानें ती दुःखीकष्टी होती. अशा प्रसंगीं झालेली ओळख मनुष्यस्वभाव कळण्यास मुळींच उपयोगाची नाहीं. कारण अशा वेळेस शोकाचे, शोकमय आठवणींचे आणि या दोहोंपासून उत्पन्न होणाऱ्या गंभीरतेचें आवरण मनुष्याच्या मनावर असतें.

बिंबाबाईचा नवरा हरिहरराव तांबडे हा एक प्रसिद्ध मालगुजार होता आणि त्यामुळें त्याच्या मृत्यूनें पुष्कळांस वाईट वाटलें. बिंबाबाईच्या सांत्वना-साठीं पुष्कळ बायका येत. एके दिवशीं रायपूरचा कमिशनर मि. कर्कवूड यांच्या पत्नीनें ' मी आज दुपारीं समाचारासाठी येईन ' म्हणून कळविलें. ज्या दिवशीं मिसेस कर्कवूडचें पत्र आलें त्या दिवशीं अनंतराव घरकुट्टे हे आपल्या मुलीच्याकडे आलेच होते. अनंतरावांस आतां या मालगुजारीचा मॅनेजरीचा

मुखत्यारनामा मिळवावयाचा होता, कारण आतां मुलीचें आणि तिचें अल्पवयस्क अर्भक जो प्रभाकर त्याचें पालक दुसरें कोण होणार? आमच्या अनंतरावांवरच तो प्रसंग येऊन पडला.

" बिंबाबाईस मिसेस कर्कवूडबाई भेटावयास येणार तर त्याच्या स्वागताकरितां कांहीं विशेष तयारी नको करायला? ब्राह्मण बायकांचे काय? त्या आल्या आणि गेल्या. घरोघर मातीच्याच चुली या नात्यानें जी रोजची स्थिति आपल्याकडे असते तीच दुसरीकडे. त्याच्याकरितां काळजी घेऊन करावयाचे काय! मिसेस कर्कवूडसारखी मोठ्या अधिकाऱ्याची बायको आपल्याकडे येणार तर तिच्या मनावर 'इंप्रेशन' (ठसा) चागले झाले पाहिजे." या प्रकारचे विचार आमच्या अनंतरावांच्या डोक्यांत घोळत होते आणि यासाठीं त्यांनीं विचार करून त्या दिवसाची तालीम घरांत कशी काय ठेवावी हें ठरविलें.

प्रथमतः म्हटलें म्हणजे साहेब लोकांचे दाराशी जोड्यांची रांग नसते. आपल्या घरांच्या दारातच फाटक्या जोड्यांची माळ दिसेल, म्हणून ती दूर करण्याचें अनंतरावानीं ठरविलें. शिवाय त्या घरात साधारण अशी पद्धत होती की पुढें ओटी, मग आंत पडवीवजा खोली, त्याच्या आंत माजघर आणि त्याच्या पुढें स्वैपाकघर. ओटीवरच्या खोलींत दुपारच्या वेळेस मंडळी जेऊन जाऊन वामकुक्षी करीत. मडमसाहेब जर भलत्याच वेळेवर आल्या तर त्यांनां मंडळी पाय पसरून कोणी सदऱ्याने तर कोणी सदऱ्याशिवाय त्या ओटीवर असलेल्या चौरंगावरच्या गादीवर लोळत पडली असली म्हणजे तें पाहून हे हिंदु लोक कसें गचाळ आहेत असे म्हणतील असें अनंतरावास वाटलें.

मडमसाहेबांनीं येण्याची नक्की वेळी दिली नव्हती. "थिस आफ्टरनून" (आज दोन प्रहर टळल्यावर) एवढेच लिहिलें होतें. कमिशनरीण बाई गाडींतून येणार. त्या दुपारींच कोणाच्या घरीं पांच तर कोणाच्या घरीं दहा मिनिटें बसून सात आठ घरें एका "आफ्टरनून" मध्यें खलास करणार. त्याच्यासाठीं केवढी तयारी! 'प्रथमतः बिंबाबाईस उंच टाचांचे, पाय चिमटणारे बूट आणून दिले पाहिजेत, नाहींतर आपल्या घराण्यास त्या असंस्कृत

म्हणतील ' असें वाटून त्यांनीं मुद्दाम त्या दिवशीं बाजारांतून आपल्या मुलीच्या पायाचे बूट आणविले. ते प्रथमतः घालून बिबाबाईस चालणें जड जाऊं लागलें. कारण पाय मुरगळतोसा वाटे, झोंक पुढें जातोसें वाटे आणि चालायला लागले म्हणजे पायास कळा लागत. तथापि आज कमिशनरीण बाई येणार म्हणून सर्व सायास केलेच पाहिजेत.

कमिशनरीणबाई आल्या आणि फक्त पाचच मिनिटें बसल्या. तेव्हां त्या वेळचा संवाद देण्यास हरकत नाहीं. अनंतराव घरकुट्टे हे मधून मधून येत, आणि काहीं मोडक्या तोडक्या भाषेत सागावयाचा प्रयत्न करीत.

मिसेस कर्कवूड यानीं प्रथमत बिबाबाईच्या दुःस्थितीबद्दल आपणास फार फार दुःख होतें आहे, हें कळविलें. "तुमची तबीयत तर ठीक आहे ना? मुलाची प्रकृति कशी काय आहे?" असा बिबाबाईस प्रश्न केला, मुलाला पाहिले, त्याच्या गालाला हात लावून हंसविले. आपण आपला वेळ कसा घालविता, आपल्याला गाता येते काय इत्यादि प्रश्न केलें. पूर्वीच्या प्रश्नास काय उत्तर येतें याची वाट मुळीच न पाहता मिसेस कर्कवूडबाई दुसरा प्रश्न विचारीत. यापेक्षां जास्त प्रश्न त्यानीं न विचारता 'आजची हवा बरीच गरम आहे नाहीं?' हा प्रश्न केला.

या प्रश्नास उत्तरें देणेंील ठराविकच यावयाची. 'बिबाबाईची प्रकृती बरी आहे', 'तिला गातां येत नाहीं' आणि 'होय, हवा आज गरम आहे'.

पुढें मिसेस कर्कवूडला देणगी म्हणून एका चांदीच्या तबकांत संत्री आणली, तेव्हां प्रारंभी नको नको म्हणत, व पुढे फार आग्रह झाला म्हणून देणगीबद्दल आभार प्रदर्शित करुन मिसेस कर्कवूडनीं संत्री चांदीच्या तबकासह आपल्या शिपायामार्फत गाडींत पोचविली. हें पाहून बिबाबाई आपल्या बापाकडे पाहूं लागल्या. बिबाबाईस वाटले होतें कीं ही बाई या तबकातला एखाद दुसरा संत्रा खाईल. तबकच्या तबक घेऊन जाईल असें तिला वाटलें नव्हतें तथापि तिकडे दुर्लक्ष करून मिसेस कर्कवूडनीं आणखी एक दोन औपचारिक प्रश्न

केले. अनंतरावाची ओळख करून घेतली. आणि थोडक्या वेळात सर्वांचा निरोप घेतला.

मिसेस कर्कवूड गेल्यानंतर बाप आणि मुलगी यात बोलणें सुरूं झाले.

" ही बया आतां तबक आणून देईल की नाहीं ? "

" देईल आणून. न द्यायला काय झालें ? "

" मला शंका येते. "

" तिनें जरी आणून दिले नाही तरी आपलें कल्याण दुसऱ्या काहीं उपायानें ती करील. "

" ती केव्हा कल्याण करणार आणि काय करणार ! पण आज घरातल्या चांदीच्या तबकाला चट्टा बसला. "

अनंतरावाची त्यासबंधानें खात्रीच होती. पण आताच फारशी गडबड करूं नये. उलट आपल्या मुलीस आश्वासन द्यावें असें त्यांनां वाटले.

मिसेस कर्कवूड म्हणजे फार चागली बाई म्हणून नेटिवात तिची वाखाणणी होत असे. तिला आपल्याकडची नेसणी फार आवडतात असं म्हणून तिनें काहीं लोकाच्या कडून पैठण्या उपटल्या असा बभ्रा, मर्व मुलुखाचा चव्हाटा जो वकीलांची खोली तेथे झाला होता. तथापि पुष्कळ लोकाना साहेब अगर मडम आवडूं लागावयाला आणि लोकप्रिय मानायला फार थोडी कारणें पुरतात. साहेबानें आपल्याकडचे काहीं खाणें खायला मागितले आणि खाल्लें म्हणजे लोक झाले खूप. साहेबानें आपण एक पगडी घेतली पाहिजे, असें म्हटलें कीं कोणाकडून तरी देणगी म्हणून आलीच. साहेबानीं आभार मानून पुढें फॅन्सी ड्रेस बॉलला उपयोगी पडेल अशा भावनेनें ती ठेवून घेतली म्हणजे पगडी देणारास कृतकृत्यता वाटे, आणि साहेबाना आपल्या कडील रिवाज आवडतो म्हणून साहेबांची स्तुतियुक्त जाहीरात करावयास तो तयारच. साहेबानी ' नल आणि दमयंती " याची गोष्ट काय आहे असा प्रश्न केला म्हणजे ' साहेबास

आपल्याडील गोष्टीची किती तरी माहिती ' म्हणून आपल्या लोकांस मोठा आनंद होतो. ज्या लोकांना कोणी विचारीत नाहीं त्यांच्या कोणत्याहि वस्तूला त्या लोकांवर मालकी गाजविणाऱ्या लोकांनीं महत्त्व दिलें तर हलक्या स्थितींतील लोकांना आनंदच होणार यांत काय नवल आहे !!

अनंतरावानां कमिशनरची बायको आपल्याकडे येऊन गेली एवढ्याबद्दल जो आनंद झाला त्यात आपलें चादीचें तबक गेले हें दुःख ते विसरले. रायपूरच्या कमिशनरशी ओळख झाल्यानें पोलिटिकल एजंटशीं संधान होईल आणि पोलिटिकल एजंटशीं संधान झाल्यानें संस्थानांत आपले वजन वाढेल, आणि तेणेंकरून पुढें मागे आपला फायदाच होईल. तबक गेले खरें पण तें घरकुट्टयांचें गेलें नाहीं तर तें श्रीमंत हरिहरराव तांबडे मालगुजार यांचें गेलें होतें. एकढ्या मोठ्या श्रीमंत घराण्यास तबक म्हणजे काय शें दीडशें रुपये, अगदीं कःपदार्थ. एवंच आता आपल्या मुलीची आणि कमिशनरीण बाईची जी ओळख झाली ती अधिकाधिक वाढविली पाहिजे आणि त्याचा पुढें फायदा करून घेतला पाहिजे असा अनंतरावांनीं विचार केला.

कांही वेळ गेल्यानंतर अनंतराव आपल्या मुलीस म्हणाले, " काय ग मडम साहेबांनीं तुला काय विचारलें ? तुला गायला येतं कां म्हणून विचारले नाहीं ? "

" हो. "

" पहा, हेंच जर तुला गातां येत असतें तर मला गातां येत नाहीं असें म्हणावें लागलें असते का ? "

" मला गातां येत नाहीं हा जर दोष असला तर तो कोणाचा, माझा कीं मला गाणं शिकविलें नाहीं त्या आईबापाचा ? "

" बरं, त्याचा सध्यां वादविवाद नको. आम्हांला काय ठाऊक कीं ' तूं श्रीमंत पतीची राणी ' होणार म्हणून ? "

" बरें मग आतां काय त्याचें ? "

" आतां तूं गाणं शीक. "

" लोक त्याला म्हणतील तरी काय ? कपडालत्ता, गाणें इत्यादि गोष्टी करायचे होते तेव्हां नाहीं केल्या, आणि आतां करीत आहे."

" अग लोकाना काय समजतं, आणि लोकनिंदेची पर्वा करून चालेल तरी कसें ?"

" मग इतर बायकानीं तसं का करूं नये ?"

" याचें कारण एवढेंच कीं तूं मालगुजारीण आहेस आणि जें काम पूर्वी नवऱ्याला करावें लागत होतें तें तुला करावें लागणार. नवऱ्याला गांवांतल्या अधिकाऱ्याशीं स्नेह जुळवावा लागला होता; आतां तुला त्याच्या बायकांशीं जुळवावा लागणार आणि यासाठीं या सर्व खटपटी तुला केल्या पाहिजेत."

" आजपर्यंत मी बूट कधीं वापरला नाहीं. आज बूट वापरला तर पाय कसे चिमटून गेलें आहेत. मला वाटतं कीं, बुटाचा हा खर्च उगाच झाला. तें तवक गेलं आहे तें परत आलं म्हणजे मिळविली. मला या भानगडी आवडत नाहींत."

" अग या सर्व गोष्टी कर्त्या पुरुषाला आणि स्त्रीला कराव्या लागतात."

" शारदाबाई मास्तरीण या कां बूट नाहीं घालीत ? त्या तर बी. ए. झाल्या आहेत."

" अग या पदव्यांनां आणि परीक्षांनां विचारतो कोण ? शारदाबाईला 'लोकांतला' मोठेपणा आहे काय ? बी. ए. ची परीक्षा एवढेंच तिचें भांडवल."

" आणि माझं काय आहे ?"

" तूं एथची स्थाईक, येथच्या मालगुजाराची बायको. शारदाबाई-प्रमाणें वाऱ्यावर वरात थोडीच आहे ?"

" तर मग मी मी काय गाणं शिकायचं ? आणखी काय करायचं ?"

“ आणखी थोडेसें इंग्रजी शिकायला सुरुवात करावयाची, निदान कोणी इंग्रज बाईशीं बोलणें झालें तर ‘ व्हेरि प्लीझ्ड् टु मीट यू ’ म्हणजे तुमच्या भेटीनें फार आनंद होतो, असें बोलतां यावें. ”

“ तर मग तो शब्द हिंदुस्थानींत नाहीं तर मराठीत बोललं तर नाहीं कां चालणार ? ”

“ इंग्रजींत बोललें म्हणजे साहेब लोकांच्या लेडीजना वाटेल कीं ही कोणी तरी थोरामोठ्या घराण्यांतली आहे. ”

“ ज्यांनां आपलं घराणं ठाऊक नसेल अशानां भेटावयाचं कशाला, त्या तरी आपल्याकडे कशाला येतील भेटायला, आणि येऊन आणखी एखादं तबक घेऊनच जाणार कीं नाहीं ? त्यापेक्षां त्यांच्याशीं संबंध नाहीं ठेवला तर बरं नाहीं ? ”

“ आमचा ‘ वाईल्ड ओटस् ’ साहेब की नाहीं आपल्या बायकोसह एका ई. ए. सी. कडे उतरत असे. त्या ई. ए. सी. च्या बायकोला इंग्रजी येत होतें. त्या ई. ए. सीची बढती किती लवकर झाली. तो पुढें रावबहादुर देखील झाला. ”

“ मला थोडंच व्हायचें आहे रावबहादुर ? ”

“ पण तुला ‘ कैसरे हिंद ’ पदक मिळेल ना ! ”

“ तें पदक तें काय ? ”

“ तें मोठमोठ्या सुशिक्षित आणि लोकोपकारी बायकांनां मिळत असतें. त्या बायकांचीं नांवें मुंबई कलकत्याच्या इंग्रजी वर्तमानपत्रांतून येतात. ”

“ त्यांत काय फायदा ? ”

“ हिंदुस्थानांतल्या मोठमोठया बायकांत तुझी गणना होईल. ”

“ मला नको ती व्हायला. ”

" बरें तें असो, तुला आतां एक महिन्या दीड महिन्यानें तरी मिसेस कर्कवूडला परतभेट दिली पाहिजे. "

" गेलंच पाहिजे कां ? "

" हो नाहीं तर ? "

" बरं जाईन, गेलें तर येतांना तें तबकहि परत घेऊन येईन. "

" तबकाचें राहूं दे, तबकाचें मी पाहीन. तूं जाणार ना ? "

" तुम्ही जाच म्हणत असाल तर जाईन बापडी, मला काय ? "

अनंतराव घरकुट्टे, मुलगी कमिशनरकडे जाणार आपली तेव्हां तिनें कशा पोषाखांत जावें याचा विचार करीत बसले.

" ती खैरागड संस्थानची अगर दुसऱ्या कोणत्यातरी संस्थानची दिवाणगिरी मिळवली पाहिजे. आपल्या काहीं ओळखी साहेबापाशी आहेतच. माझ्या बिंबाच्या मार्फत काहीं युरोपीयन लेडिजशी ओळख जमली तर कार्यभाग सोपा होईल " इत्यादि विचारहि अनंतरावांच्या मनांत येत होते.

---

प्रकरण ९ वें.

# हरिभय्या मोघे

रायपूरच्या हरिहरराव तांबडे यांच्या वाड्यांत एक तरुण बिंबाबाईच्या समोर बसला होता. अलीकडील बिंबाबाईच्या स्वरूपात पुष्कळच फरक पडला. कमिशनरीणबाईच्या घरीं बिंबाबाई जाऊं येऊं लागली. आणि त्यामुळें अनंतरावांना तिच्या मालमत्तेच्या वहिवाटीचा अधिकार सहजच मिळाला. आतां साधल्यास रायपूरासच राहून कोर्ट ऑफ वार्डस् मार्फत आणखी एखाद्या इस्टेटीची वहिवाट पहाण्याची नोकरी मिळेल तर फार बरें होईल असें अनंतरावास वाटलें. साहेब लोकांत संधान बांधावयास आतां सोपें जाईल, मुलीच्या मार्फत मडमाशीं

वशिला लागेल, इत्यादि गोष्टी मनांत आणून ‘ हिंदु युरोपीयन लेडीज क्लब ’ आपण स्थापन करवावा अशी त्यानी कमिशनरिणीस सूचना केली आणि क्लब जर स्थापन झाला तर त्या बाईचें नाव क्लबला देण्यासाठी तिची परवानगी देखील मागून घेतली. क्लब स्थापन करावयाचा झाला म्हणजे आता निरनिराळ्या मालगुजारांकडे वर्गणी मागावयास जावें लागेल म्हणजे मालगुजारांनां हा मनुष्य साहेबांस आवडता आहे असें कळेल. जन्मभर तहशिलदारीसारख्या नोकरी-मध्यें असतांना लोकानीं आपल्याकडे यावें अशीं संवय पडून गेली होती आणि हातीं अधिकार असता जे लोकावर वजन होतें तें आता नाहींसे झालें असें पाहून त्यास चुकल्याचुकल्यासारखें वाटत होतें आणि यासाठी ऑनररी मॅजिस्ट्रेटी मिळाल्यास पहावी असेंही त्यास वाटून त्यानीं ती मिळविली. सरकारी नोकरीचें दिवस संपले तरी अधिकारलालसा आणि महत्त्वलालसा संपत नाहीं, आणि घरचें खाऊन लष्करच्या भाकऱ्या भाजावयास लोक याचमुळें तयार होतात अशी त्याच्या “ स्वार्थत्यागाची मीमांसा ” एका विद्वानानें केली आहे.

युरोपीयन स्त्रियाशी मिसळताना आपल्या मुलीचें कांही तरी वजन पडावें आणि क्लबांतील बायकांना साजतील असें गुण तिच्यांत यावेत या हेतूनें बिंबा-बाईनें गाणें शिकावें म्हणून अनंतरावानी आग्रह धरिला, आणि तिला गाणें शिकविण्यासाठीं हरिभय्याची नेमणूक झाली.

प्रथमतः हरिभय्याच्या समोर येऊन बसण्यास बिंबाबाई स्वाभाविकपणानें लाजत असे. बैठकींत येऊन सतार मांडीवर घेऊन परक्या पुरुषासमोर बसणें तिला कसेसेंच वाटे. तथापि अनंतरावहि तेथें बसत असत त्यामुळें तिला धैर्य येई. बिंबाबाईचा आवाज गोड होता आणि तिला गाण्याची आवडहि होती. नागपुरास ती मधून मधून जेव्हां येत असे तेव्हां नाटकें पहाण्यासहि जात असे. हरिभय्याला रायपुरास जेव्हां अनंतरावानीं आणिलें तेव्हां त्याची रहाण्याची सोय वाड्यांतच करावी असा अनंतरावांचा विचार होता. तथापि हरिभय्यानें गांवांत खोली घेतली होती आणि दुपारच्या दोनपासून चार वाजेपर्यंत तो

शिकविण्यासाठीं वाड्यांत जाई. तेथे आल्यानें हरिभय्याची द्रव्यदृष्टीनें चांगलीच सोय झाली.

कैलासवासी हरिहरराव तावडे याच्या इस्टेटीतून खर्च व्हावयाचा. त्या इस्टेटीच्या एकंदर उत्पन्नाच्या मानानें हरिभय्या मोघे यास मिळणारा चाळीस रुपये पगार म्हणजे कांहींच नव्हता. शिवाय त्यास गांवात दुसऱ्या शिकवण्या पत्करावयाला कोणत्याच प्रकारची अडचण नव्हती. रायपुरास दुसरें कांहीं उत्पन्न व्हावयास क्षेत्र पुष्कळ चांगलें होतें अशांतला माग नाहीं. छत्तिसगडी मुलुख तो ; चमार वगैरे लोकांची वस्ती जास्त. मारवाडी आणि परदेशी यांसारखी मंडळी, एकतर ईश्वर भजन करणारे लोक उदल अल्लह यांची गीतें गाणारे फिरस्ते मृदंगे याच्या गायनावर संतुष्ट. महाराष्ट्रीय मंडळीमध्यें एक दोन मालगुजार जर सोडून दिलें तर बाकीचा सर्व वर्ग म्हटला म्हणजे कारकुनी आणि कारकुनीवजा दुसरे धंदे म्हणजे वकिली वगैरे करणारा. त्याच्याजवळ काय असावयाचें आहे ? रायपुरच्या विठोबा मंदिरामध्यें हरिभय्याचें भजनरूपी गाणें वगैरे होऊन त्याच्या गानमाधुर्यामुळें तेथील महाराष्ट्रीय श्रोतृवृंद तल्लीन होऊन गेला. तेथील मंडळीपैकीं एका जुन्या गृहस्थानें त्यास एक मराठी अंगरखा आणि नागपुरी पागोटें देऊन कीर्तनकार देखील बनविलें आणि तुम्हीं कीर्तन करीत जा म्हणून उपदेश केला. त्याच्याकडून कीर्तन होऊं लागलें. हरिभय्याचे दुसरे इतर गुण प्रकाशित होऊं लागले. हरिभय्या पन्नास ठिकाणें हिंडला असल्याकारणानें त्याला माहिती पुष्कळ होती. त्यानें अनेक गावांतल्या अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. त्याच्या ह्या विनोदपर गोष्टी पुढें येत आणि श्रोतृवृंदास प्रिय होत. कीर्तन करविणें आणि निव्वळ गाणें करविणें यांत पुष्कळ फरक आहे. ज्या लोकांच्या अंगीं स्त्रियांविषयीं दाक्षिण्य आहे ते घरांत कीर्तन करवितील. कारण बायका कीर्तनाला गेल्या तर तें चांगलें अशी लोकांची बुद्धि आहे. तथापि बायकांनीं गाण्याला जावें ही गोष्ट शिष्टसंमत नाहीं. मधुर गाण्याचा आस्वाद पुरुषानां मिळतो तसा स्त्रियांनांहि मिळावा अशी ज्या गहस्थाची इच्छा असेल त्यानें कीर्तन

आणि भजन यांस उत्तेजन द्यावें असें नागपुरच्या बर्डीवरील एक विद्वान परंतु चेष्टेखोर, तसेंच स्वतः सुधारक असून सुधारकाची चेष्टा करणारे एक भले गृहस्थ सांगत असत. रायपूरच्या मंडळींनी हरिभय्यास कीर्तनकार बनविलें तेव्हां त्यास अशा प्रकारचे मौजेचे तथापि स्त्रियांच्या हक्काचें कारण पुढें करून उपदेश केला नाहीं. ज्या वृद्ध गृहस्थानीं त्यास पागोटें दिलें त्यांनीं म्हटलें बाबा रे मधुर आवाज ही ईश्वरी देणगी आहे. त्या मधुर आवाजानें ईश्वराची स्तुती करावी की नाटकांतली पदे म्हणावीं? तूं हा आपला आवाज ईश्वर सेवेला लावलास म्हणजे तूं खरोखरच आपलें अक्षय्य कल्याण करून दुसऱ्याचेंहि कल्याण करशील.

हरिभय्या मोघे हे कीर्तनकार बनले आणि त्याचा उदय या गुणामुळेंच विशेष होऊं लागला. कीर्तन पुढे मराठीत करावयाचे तसेंच हिंदीतहि करूं लागले. त्यामुळे त्याचे गावात बस्तान अधिकाधिक जुळूं लागले. गावातील परदेशी, छत्तीसगडी आणि मारवाडी इत्यादी पैसेवाल्या लोकावर याची छाप बसूं लागली आणि त्या लोकाचा "पंडतजी" वर जसजसा भाव वाढूं लागला तसतशी याची पैदासही वाढली. दोन पैसे जसजसे जुळूं लागले आणि कीर्तनकार आपण आहोत ही भावना वाढूं लागली तेव्हा त्यास अधिक अभिमानाने रहाता येऊं लागलें. हरिभय्यास प्रथमत आपण मालगुजारीणबाईचें केवळ एक नोकर अगर आश्रित आहोत ही भावना होती, पण अलीकडे ती बदलूं लागली. आता आपण गावांतील एक प्रसिद्ध आणि ज्याविषयीं इतरांस आदर आहे असे एक हरिदास आहोंत आणि आपण बिन्नाबाईस केवळ शिकविण्यासाठीं तिच्या घरीं जात आहोंत अशी भावना उत्पन्न झाली आणि त्याचे बिन्नाबाईशीं वर्तन बरोबरीच्या, प्रसंगी गुरुत्वाच्या नात्याने होऊं लागले. पैशाचे अस्तित्व आणि अभाव याच्या योगाने समाजांतील पदवी बदलते एवढेंच नव्हे तर मनुष्याच्या मनावरच त्याचा परिणाम पडतो. प्रथमतः भय्या जे दूर बसत व साधारणपणे भीत भीत बोलत तें आतां अधिक धैर्यानें प्रसंगी विनोदानें असेंहि बिन्नाबाईपाशीं बोलत. बोलताना पूर्वी त्यास प्रत्यक्ष गायन

शिकवण्याच्या गोष्टी संबंधानें खेरीज करून इतर गोष्टी बोलण्याचें धैर्य होत नसें. आतां, मधून मधून त्यागराजन्च्या, तानसेनाच्या, तेन्नाली रामन्च्या गोष्टी सांगत. स्वतः गाऊन दाखविण्याच्या प्रसंगी रागास अनुरूप अशा रसानें युक्त अशी आपली मुद्रा बनवीत. कधीं हिंदुस्थानातील काही गवयांची माहिती सागत. कधीं कधीं कांहीं नायकिणींची माहिती सागत. दिल्ली, लखनौ आणि आग्रा येथील नायकिणी कोट्या करण्यांत कशा हुशार असतात हें सागत. संदल नायकीण कशी कोट्या करी, कल्लुण नायकीण खुद्द हरीभय्यावर कशी एकदां आषक्त झाली होती हेंहि सांगत. कधीं कधीं स्त्रियाविषयीं भाषण सुरू झाले म्हणजे मद्रास, बंगाल, पंजाब, येथील स्त्रियाच्या सौंदर्याविषयीं अगर कुरुपतेविषयीं ज्या कांहीं आमच्या हरिभय्याच्या कल्पना होत्या त्या मुखोद्गीर्ण होत.

बिबाबाई ही देखील स्वभावतः चौकस, विनोदी आणि रसिक होती. ती देखील भय्या अथवा पंडतजी यांस अनेक प्रश्न विचारण्यात कुशल होती, आणि प्रसंगीं विनोदाची भाषणें देखील तिला करावीशीं वाटत. एखादी स्त्री वैधव्यदशेस पावली म्चणजे तिच्या मनोवृत्ती वृद्ध स्त्रीस साजतील अशा प्रकारें गंभीर होतात असें नाहीं कारण मनुष्याच्या मनोवृत्तीस शारीरिक कारणें असतात. मनोविकाराबरोबर मनुष्याच्या मेंदूवर परिणाम होतो आणि शरीरांतील क्रियांबरोबर मनुष्याच्या मनावर परिणाम होतो. तरुणपणींच्या रक्ताशीं कांहीं प्रकारच्या भावनांचा निकट संबंध असतो, आणि त्या रक्ताच्या अभावी भावनाचाहि विलय होतो. बाहेरच्या हवेनें जर मनुष्याच्या मनावर परिणाम होतो तर शरीरांतील रक्तमासांच्या स्थितीनें कां होऊं नयेत? असो.

हरिहररावांच्या मृत्यूनंतर आमच्या बिंबाबाईची स्थिति फार विलक्षण झाली. एवढ्या मोठ्या इस्टेटीची मालकीण मी आहे ही भावना तिच्या गेल्या दोन तीन वर्षांत चांगल्या तऱ्हेनें मनावर ठसली होती. कारकून, नोकर इत्यादिकांबरोबर ती मालकिणीसारखी वागे. हरीहररावांच्या मरणानंतर तिला मोकळेपणानें बोलावयास कोणी उरलें नाहीं यासारखें झालें होतें. हरिहररावांची

आई ही केव्हांच मृत झाली होती. हरिहररावाच्या पहिल्या कुटुंबाची कांहीं आप्तमंडळीं हरिहररावाच्या आश्रयास होती. पण त्यांस देखील घरच्या माणसासारखें न वागवितां बिंबाबाई आश्रितासारखें वागवी, आणि त्यांस तुच्छ समजे. यामुळें हरिहररावांच्या मृत्यूनंतर जवळचें कोणी उरलें नव्हतें. अनंतराव मधून मधून रायपुरास येत, आणि कधीं कधीं बंडूनानाहि येई. बंडूनाना आले म्हणजे मात्र बिंबाबाईस मोकळेपणाने बोलतां येई. तथापि अनंतरावांशीं मात्र तिला मोकळेपणानें बोलता येत नसे. बिंबाबाईचें अंतःकरण स्नेही शोधीत होतें, आणि त्यामुळें हरिभय्या जेव्हा तिला गायन शिकविण्यास येऊं लागले तेव्हा ज्या मनुष्याबरोबर साधारणपणें बरोबरीच्या नात्यानें बोलतां येईल असा एक तरी मनुष्य सापडला हे पाहून तिला आनंद झाला.

हरिभय्याच्या आणि नवऱ्याच्या नांवात सादृश्य असल्याकारणानें बिंबाबाई ही आपल्या संगीताचार्यास हरिभय्या असें न म्हणता भय्यासाहेब अगर भय्याजी असें म्हणे. पुढे पुढें जेव्हा गावांतील लोक हरिभय्यास पंडतजी म्हणूं लागले तेव्हां ही देखील पंडतजी म्हणूं लागली.

प्रथमतः 'पंडतजी' तिला ईश्वरभजनपर, आध्यात्मिक गाणीं शिकवूं लागले. पुढें या गाण्यापेक्षा काहीं 'दुसऱ्या प्रकारची' किंवा 'नेहमींचीं' गाणीं आपण शिकवावींत अशी इच्छा बिंबाबाईनें व्यक्त केल्यावरून तो 'दुसऱ्या प्रकारचीं' गाणीं शिकवूं लागला. रामजोशाची छेकापन्हुति, कांहीं नाटकांतील पदें या प्रकारची गाणीं कशीं म्हणावीं हें तिला हरिभय्या शिकवूं लागला.

सज्जकरुनि चाप मदन येत मागुनि।
मार्ग दावी इंदु मला तम निवारुनी ॥

हें पद जेव्हां बिंबाबाई गाऊन दाखवी तेव्हां पंडतजी वाहवा, वाहवा म्हणत आणि बिंबाबाईस पंडतजीना आपण गाणीं म्हणून खूष करावें असेंहि वाटूं

लागलें. कधीं कधीं त्याचे गाणें बाजूला राहून गप्पाच होत. एके दिवशीं एक गाणें पंडतजीनीं स्वतः म्हणून दाखविलें.

अरसिक विधि हा दिसतो मजला विचित्र कृति हा करी ।
स्तवुनिया शिणवूं कां वैखरी ॥
काव्यरसाचा स्वाद घेति जे कविदर दारिद्र्यानें ।
पीडिले कितीक या दुष्टानें ॥
कुंदरदांचे रसिक जे खरे पत्निविण हिंडती ।
चोरिल्या सुमुखि धनवंती ॥
स्त्री जरि लाधे कुणा सुंदरा, वस्त्रभूषणें तिला ।
द्यावया समर्थ पति नच केला ॥
दैवें लाधे सुंदर बाळे द्रव्ये जें अनुकूळ ।
तिजला रसज्ञ दुर्मीळ ॥
सुंदर बाला मधुतरशीला पीनपयोधर जीची ।
चंद्रबिंबसम काति दिसे वदनाची ॥
वैधव्यानल दाह करितसे तिच्या सौंदर्याचा ।
दुष्ट हा ब्रह्मदेव ननु साचा ।
एका वदनें वचनें देई सुखकाक्षा या जीवा ।
दुसरे योजी पुरुषा कार्या ॥
ठेवि असंगति विश्वीं कार्यी जीवा त्रासायला ।
चतुर्मुख यास्तव तो जाहला ॥

हें गाणें हरिभय्यानें म्हणून दाखविले त्या वेळेस त्यानें आपलें सर्व कौशल्यच ओतलें कीं काय कोण जाणे. आत्मसाक्षात्कारी अर्थामुळें, आणि गाणारा स्वतः तन्मय झाल्यामुळें जो रस उत्पन्न होतो तो श्रोत्यास अगदीं हालवून सोडतो. हरिभय्या मोघे हे स्वतः ज्याप्रमाणें रंगून गेलें त्या प्रमाणें त्यांची शिष्या बिंबाबाई देखील रंगून गेली. विधीच्या दुष्टत्वाला आपण आणि त्याचप्रमाणे गायनाचार्य हरिभय्या हीं दोघेहि बळी पडत आहेत असें वाटलें, आणि या

भावनेमुळें आपण एकाच होडींत बसून जाणारीं माणसें आहोंत आणि गायनाचार्य आणि आपण यांच्यामध्यें बरेंच सादृश्य आहे अशी कल्पना होऊन एकभाव उत्पन्न झाला आणि गायनाचार्यांचे हृद्गत काढून घेण्यासाठीं ती तयार झाली. तिनें हरिभय्याचे गाणें संपल्यानंतर विचारलें:

" हें गाणें कोठून घेतलें आहे ? "

" तें आमच्या एका स्नेही कवीनें लिहिलें आहे. "

" आपले ते स्नेही रायपुरांतच असतील ? "

" होय – नाहीं, ते कधीं कधीं रायपुरांत येतात. "

" मनुष्यानें आपले गुण लपवावेत कां ? खरं कां बोलूं नये, सांगा पाहूं तें गाणं आपलंच कीं नाहीं ? "

" होय, तसेंहि म्हटल्यास हरकत नाहीं. "

" बुवासाहेब, आपण आपल्या गाण्यावरून तर रसिक दिसतां. आपण लग्न कां केलें नाहीं ? "

" माझ्यासारख्याचें लग्न व्हावयाला दोन गोष्टी लागतात. एक तर कोणीतरी मनुष्य आपल्या मुलीचें लग्न कसें होईल म्हणून अडचणींत सांपडावा लागतो, किंवा— "

" किंवा काय ? "

" पुरुषाचे कान दिसूं लागायच्या पूर्वी बापानेंच मुलाचें लग्न बापाच्या जिनगीवर करून द्यावे लागतें. नाहीं तर गाणारे, नाटकी, हरिदास, शास्त्री, पंडित इत्यादि लोकांचीं लग्नें होणें शक्य नाहीं. "

" कां बरें ? "

" लग्न करतेवेळेस आपल्या जांवयाची कायमची सोय काय झाली आहे हें सासरा पहाणार. आमच्यासारख्याची कायमची सोय कोठें झाली आहे ? "

" तर मग आतां आपण काय करणार ? लग्न कधीं करणारच नाहीं काय ? "

" असं मुळींच नाहीं. माझ्यापाशीं पैसे जरा सांचले म्हणजे मग लोक आपली मुलगी द्यायला तयार होतील. मग त्यावेळेस मी चाळीस वर्षांचा असलो तरी हरकत नाहीं. शिवाय कांहीं एकडोळया, कांहीं मुक्या अगर बहिऱ्या मुली असतीलच, त्याच्यापैकीं एखादी आमच्या वांटणीस येईल. "

" छे ! छे ! आपण असली मुलगी मुळींच करतां कामा नये. "

" तर मग काय करावें ? "

" काय म्हणजे ? पुनर्विवाह करावा. आपलें वय पंचवीसाच्या वर आहे. आपणांस बायको १०–१२ वर्षांची योग्य नाहीं. "

" पुनर्विवाह ? तो तर बिलकुल शक्य नाहीं. "

" कां बरें, तुम्ही काय त्याच्या विरुद्ध आहांत ? "

" छे मुळींच नाहीं, पुनर्विवाह शक्य नाहीं एवढेच मी म्हणतों. "

" शक्य कसा नाहीं ? "

" पुनर्विवाह जुळवावयाचा कसा ? विलायतेंत पुरुष व बायका यांचा संबंध वारंवार येतो. आपल्या लोकांत तसें कोठें होतें ? आमचा अगोदर संबंध बायकांशी येतच नाहीं. बरें आपल्याकडे कोणी विधवांची ओळख करून द्या असें म्हटलें म्हणजे लोक म्हणतील कशाला ओळख पाहिजे ? आज पुनर्विवाह करायचा झाला म्हणजे तात्पुरती ओळख व्हावयाची. आज पुनर्विवाहाचे प्रचलित मार्ग म्हटलें म्हणजे एखाद्या सुधारक पक्षाच्या पत्रांत जाहिरात द्यावयाची अगर पुनर्विवाहोत्तेजक मंडळीच्या सेक्रेटरीमार्फत त्यांच्या सर्टिफिकिटावर लग्न जुळवावयाचें. अशा तऱ्हेनें बायको मिळवून संसार काय चालणार तें दिसतेंच आहे. "

" तथापि आपण वर्तमानपत्रात जाहिरात देऊन पुनर्विवाह जरी केला नाहीं तरी अविवाहित प्रौढ मुलगी का पहात नाहीं ? अलीकडे मुंबई पुण्यास तर अशा मुली पुष्कळ अहेत असें ऐकतें. "

" लग्न न होण्यास जीं कारणें सागितलीं तींच प्रौढ वधूबरोबर लग्न न होण्यास कारण आहेत."

इतक्यांत संध्याकाळची डाक घेऊन एक नोकर आला; त्यानें बिंबाबाईस काहीं पत्रे आणून दिलीं. त्यांतील एक पत्र उघडून बिंबाबाईनें पाहिलें. तें पत्र शारदाबाईचें होतें.

चिरंजीव बिंबाबाई यांस :—

आ. वि. आपले वडिलानीं ते रायपुरास असतांनाच मला विचारलें कीं मीं आपणांस शिकवावयास तयार आहे काय ? मी त्यांस उत्तर दिलें कीं, आपणांस विचार करून उत्तर देईन. त्यांच्या मतानें आपण इंग्रजी शिकावें अशी इच्छा आहे. आपली यासंबंधीची खरीखुरी इच्छा काय आहे तें कळवावें. केवळ आपल्या वडिलाच्या इच्छेमुळें आपल्याकडील शिकवणी पत्करावयास मी तयार नाहीं. कारण आता आपण काहीं लहान नाहीं. तुम्हांला इंग्रजीचा उपयोग कितपत होईल याचा विचार करावा. साधारण इंग्रजी येण्यास पांच वर्षे तरी अभ्यास करावा लागेल हेंहि लक्षांत ठेवावें, आणि मग उत्तर द्यावें. पांच-सहा महिने शिकून सोडून द्यावयाचें असें करण्यांत अर्थ नाहीं, यासाठीं आपण विचार करून जे काय ठरवावयाचें तें ठरवावें. हे आशीर्वाद.

आपली,
शारदाबाई

हें पत्र वाचून पाहिल्यानंतर बिंबाबाईनीं पंडितजींस ऐकूं जावें या बुद्धीनें तें मोठ्यानें वाचलें आणि पत्र वाचल्यानंतर " आपणांस या संबंधाने काय वाटतें ? " म्हणून पंडितजीनां विचारलें.

" इंग्रजी शिकून तुम्हांस काय करावयाचें आहे ? "

" आमच्या वडिलांची तशी इच्छा आहे. "

" आपल्या वडिलानीं आपल्यापाशीं यासंबंधानें गोष्ट काढली होती काय ! "

" होय. "

" त्यावेळीं आपण काय उत्तर दिलें ? "

" मी स्पष्ट उत्तर दिलें नाहीं. मी केवळ 'पाहीन' एवढेंच उत्तर दिलें. "

" यावरून आपली शिकण्याची इच्छा दिसत नाहीं. "

" मला शिकण्याचा कंटाळा आहे. तथापि शारदाबाईनी दररोज आपल्याकडे यावें, बोलत जावें, त्यांच्या सहवासांत वेळ जावा असें वाटतें. मला एकटीला करमत नाहीं म्हणून शिकविण्याच्या निमित्तानें जरी शारदाबाई येत गेल्या तरी करमणूक होईल असे वाटतें. "

" तुम्हांस शिकण्याची आवड नाहीं तर मग आपण गायन तरी कशा शिकायला लागलां ? "

" एक तर गायन मला थोडेंबहुत आवडतें. हा करमणुकीचा विषय आहे, आणि खरेंच सांगायचें म्हटलें म्हणजे आपण गायन शिकविता त्यापेक्षां ज्या इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगतां त्याच मला अधिक आवडतात. "

---

प्रकरण १० वें

## रामभाऊंचा उपदेश

वाचकहो, इंग्रजींतल्या पुष्कळ कादंबऱ्या वाचतांना आपल्याला असें नाहीं कां वाटत, कीं आपला देश आणि शाळा अगदीं मिळमिळीत. इंग्लंडांत गेलेलीं आणि बॅरिस्टरी मिळविणें यासारखें कोणतें तरी शतकृत्य केलेलीं माणसें तुम्हांला असेंच नाहीं कां येऊन भासवीत ? तिथची जनता काय सुशिक्षित,

तिथच्या स्त्रिया सुंदर, आणि मनोरंजक कादंबऱ्यांस साजेलशा गोष्टी तेथें दररोज घडतात, अशीच तुमची समजूत असेल नाहीं ? असेल आणि त्यांत तथ्यहि आहे. जेथें संपत्ति, शौर्य आणि स्वराज्य आहे तेथील स्थिति येथच्यापेक्षां निराळीच असावयाची. इंग्लंड देशांतील वर्णनें वाचून तेथील जनतेंत मात्र गर्क होऊन जाऊं नका. निरनिराळ्या प्रकारच्या आयुष्यक्रमातील चित्तवेधक भागाची माहिती झाली म्हणजे भोगाव्या लागणाऱ्या आयुष्यक्रमांविषयीं जुगुप्सा उत्पन्न होते, म्हणजे आयुष्यक्रम सुखावह न होतां नीरस होतो. वाचकहो यासाठीं अन्यदेशीय परिस्थितीच्या मनोराज्यात राहूं नका. तेथील संपत्तीचा मनोहर परिस्थितीचा आणि तेथील सुंदर स्त्रियांचा आमच्या लोकांस काय उपयोग ? आपल्या घरीं जी मीठभाकर असेल ती गोड करून घेतली पाहिजे. कादंबरीकारानें इंग्लंडची स्थिति वर्णन करून आपल्या लोकांचीं मनें रिझवून फायदा नाहीं. आपल्या देशांत मोहकता पुष्कळ आहे, कादंबऱ्या लिहिण्यास साहित्यहि पुष्कळ आहे. तेंच चांगलें धुडाळून कादंबरीकारानों, उपयोगांत आणा. लोकरंजनाच्या बाबतींत देखील सुशिक्षित स्वदेशी व्रत पाहिजे. परक्या देशांतील कादंबऱ्या आणून त्यांवर स्वदेशी पेहेराव तुम्ही किती चढविणार ? येथेंच जें सांपडेल त्याची मनोवेधकता ओळखा आणि आपल्या लोकांच्या नजरेस आणा.

परक्या देशात मधून मधून जाण्यास हरकत नाहीं आणि परकीय समाजाच्या वर्णनात्मक अद्भुत रसात एखाद्या वेळेस अवगाहन करण्यास हरकत नाहीं. आपले लोक परक्या देशात जातात, त्या अर्थी स्वजनांचें ज्ञान मिळवूं इच्छिणाऱ्या कादंबरीकारानें त्याच्याबरोबरहि विदेशांत गेले पाहिजे. वाचकहो, तुम्हांस येथून आतां मी एकदम नेतों आणि शेपर्डबुशच्या प्रदर्शनांत नेऊन सोडतों. तुम्हांला आमच्या विदेशीं गेलेल्या प्रियंवदेच्या प्रिय रामभाऊची काळजीच पडली असेल.

रामभाऊंची स्थिति त्याच्या आईस काळजी बाळगण्यासारखीच होती. एकोणीस वर्षांचा तरुण आणि तो अनेक मोहांनीं भरलेल्या इंग्लंडांत गेला

आणि त्यांतल्या त्यांत लंडन येथें ! या प्रकारें स्थिति असता कोणत्या आईच्या मनांत काळजी उत्पन्न होणार नाहीं ?

रामभाऊ लंडन येथें मिडल टेंपल नावाच्या एका इन्‌मध्यें बॅरिस्टरीचे दिवस भरण्यासाठीं जेवणें खात होता. जेवणें खात होता याचा अर्थ काय हें बऱ्याच वाचकांस ठाऊक असेलच. ज्याप्रमाणें इकडे विद्यार्थी कॉलेजांत किती दिवस हजर होता हें पाहतात त्याप्रमाणें तिकडे कायदेपंडिताच्या खाणावळींत हा किती दिवस जेवायला होता हें पाहतात.

रामभाऊला इंग्लंडास जाऊन आज दीड-दोन वर्षें होउन गेली होतीं. आज संध्याकाळीं तो शशिपाद लाहा नावाच्या एका बंगाली विद्यार्थ्याबरोबर आणि त्याच्या एका " गर्ल " बरोबर शेफर्डबुशचें प्रदर्शन पाहण्यासाठीं गेला होता. शशिपाद आणि आयडा हीं हातांत हात घालून काहीं प्रेमोन्मादित वाक्यें आपापसात बोलत चाललीं होतीं. रामभाऊ साधारणतः मुग्ध होता आणि मधून मधून त्याला उद्देशून काहीं बोललें तर त्याची उत्तरें तो देत असें.

" मि. गॉडबॉल, आज आपण अगदींच मुग्ध ? "

" दोहोंमध्यें सहवाससौख्य मिळतें, दोहोंचीं तीन झालीं म्हणजे ती गर्दी वाटावयाला लागते. मी म्हटलें तुम्हा दोघांच्या सुखसहवासात आपण गर्दी कां करां ? "

" मि. गॉडबॉल, तुम्हीं आपल्याबरोबर आणखी एक तरुणी कां घेतली नाहीं ? तुम्हीं आपल्याबरोबर एक घेतली असती म्हणजे तुम्हांला एकटें नसतें चालावें लागलें. तुम्हाला आमची मात्र गर्दी झाली असती. "

" मीं तसें केले असतें पण माझी बायको मारील ना मला, तिला असं कळलं तर ! "

" काय तुमचें लग्न झालें आहे ? '

" होय. "

"आणि तुमची बायको हिंदुस्थानांत दुसऱ्या कोणाबरोबर फिरावयास गेली तर!"

"गेली तर गेली, तिला ठाऊक आहे कीं मी तिला बिलकूल हरकत करणार नाहीं."

"किती भाग्यवान बायको! नवरा इतका मत्सरविरहित मिळाला!" आयडाच्या बोलण्यात खोंच होती तरी 'गॉडबॉल' नें ती आपणास समजलीच नाहीं असें दाखविलें. काहीं पावलें पुढें गेल्यावर आयडा पुन्हा म्हणाली—

"तुमची बायको कितपत गोरी आहे? त्या समोर तंबाखूचें आणि खेळण्याचे दुकान आहे त्यात बसलेल्या हिंदुस्थानी बाईइतकी आहे काय?" असें म्हणून आयडा फिदी फिदी हसूं लागली.

शेफर्डबुशच्या प्रदर्शनात कांहीं हिंदुस्थानी स्त्रीपुरुष दुकानदार म्हणून आणली होती. एका दुकानांत हुक्के, बाहुल्या गुडाखू इत्यादि पदार्थ ठेविलें होते. त्या दुकानात काहीं मद्रासी आया देखील आल्या होत्या; त्याच्याकडे या तरुण मंडळीनें बोट दाखविलें. काहीं मद्रासी आयास इंग्लंडमध्येंच नोकरीवर घेऊन ठेवले होतें कारण इंग्लंडमध्यें मद्रासी आया, मुसलमान खलाशी आणि मुसलमान स्वयंपाकी रस्त्यातून हिंडताना आढळतात. पुष्कळदां कित्येक विश्वासघातकी इंग्रज हिंदुस्थानी आयांनां बरोबर नेतात आणि पुढें त्यांचें जुळलें नाहीं म्हणजे त्यास बेधडक रस्त्यात ढकलून देतात. त्या आयांनां आणि रिकाम्या खलाशाना अडचणीच्या वेळेस रहाण्यासाठीं 'आंग्लोइंडियन' लोकांनीं एक गृह काढलें आहे आणि त्या गृहासाठीं म्हणून हिंदु राजेरजवाडे, काहीं आंग्ल देशस्थ सुखवस्तु हिंदु इत्यादिकांपासून वर्गणी काढली जाते आणि ती वर्गणी गोळा करणाऱ्या इंग्रज कमिटीचे हिंदुस्थानवर उपकार लागूं होतात.

पॅरिस शहरांत १९११ साली १०–१२ हिंदुस्थानी बायका वेश्यावृत्तीनें रहात होत्या. पॅरिस येथील हिंदुस्थानी वेश्यासंबंधीं उल्लेख इंग्रज आणि फ्रेंच

वैद्यकीय वाङ्मयांतून कधीं कधी येतो. या बायका हा धंदा करण्याकरिता इतक्या दूर कशा आल्या अशी चौकशी केली असतां त्या मूळच्या मालकानें त्याग केलेल्या ' आया ' आहेत असा पत्ता लागतो. अशाच कोणत्या तरी बायकांपैकीं एखादीस पापमार्गापासून सोडवून तिला ईश्वरभजनी लावण्याचे श्रेय कोणी मुक्तिफौजेचा लेफ्टनंट खिस्तास देतो आणि तिच्या हातीं डफ अगर टाळ देऊन तिला न्यूयॉर्क आणि न्यूजर्सीच्या रस्त्यांतून फिरवितो आणि आपल्या फौजेसाठीं पैसा मिळवितो.

आयडाच्या प्रश्नास रामभाऊनें उत्तर दिलें कीं—

" माझी बायको मजपेक्षा गोरी आहे, तिचा गोरेपणा इटालियन बायकां-इतपत येईल. "

" एका क्वार्टरभर फ्रेंच काफींत किती दूध मिसळलें म्हणजे त्या कॉफींत तुझ्या बायकोचा रंग येईल ? "

रामभाऊनें प्रश्नास उत्तरादाखल म्हणून स्मितमुख केलें. नतर काही वेळानें एक जवळच फराळाचें दुकान दिसले, त्यांत तिन्हीं माणसें फराळास बसलीं. फराळ आटोपल्यानंतर शशिपाद लाहा यानें सिगारेट् काढल्या, त्यापैकीं एक आपल्या प्रियकर आयडास दिली आणि एक आपण घेऊन, सिगारेटांचें घर रामभाऊपुढें केलें, आणि ' माफ करा, तुम्ही ओढीत नाहीं म्हणून विसरलों होतों ' असे म्हणून तीं परत घेतली.

आयडास " गॉडबॉल " वर टीका करण्यास तेवढेच पुरें झालें; तिनें सिगारेट पेटवून तिचे झुरके घेत घेत " तूं काय आतां धर्मोपदेशक होणार आहेस ? " असा प्रश्न केला. हा एवढा हुशारीचा प्रश्न ऐकून शशिपाद मोठ-मोठ्यानें हंसू लागला.

ही त्रयी तेथे बराच वेळ बसली होती. त्यांच्या गप्पा देखील बऱ्याच झाल्या, पण त्या गप्पांची विविधता फारशी नव्हती किंवा त्या गप्पांचें स्वरूप सुशिक्षित वर्गास मोठें रुचकर वाटेल अशांतलें नव्हतें. सामान्य हायस्कुली

असाल म्हणून बेधडक बोलावें आणि तिची सोळापासून वीस वर्षांची मुलगी बरोबर असली तर ती ' आपली धाकटी बहीण वाटते ' असें म्हणावें. असो, मला आणखी कांहीं सांगावयाचें नाहीं. हें सांगतां सांगता मला थोडीबहुत धास्तीच वाटते आहे की हें वय लपविण्याचे ढंग आपल्याकडील आतांच्या सुशिक्षित बायका तर नाहीं ना उचलणार ?

" शाबास ! मि. रामचंद्रराव, बायकांचीं गुह्यें काढून घेण्याची तुझी कला अवर्णनीय आहे. "

" बरें तर मग, तिचा तूं जन्मकाल कशासाठीं आणला आहेस ? "

" पत्रिका पाहून तिचें आणि माझें जमेल कीं नाहीं हें पहाण्यासाठीं. "

" तुझ्या म्हणण्याचा अर्थ काय ? "

" माझ्या मनात तिला मागणी करावयाची आहे. "

" आणि यासाठीं तूं फलज्योतिष पाहून विचार करणार ? "

" होय. "

" तूं अगदींच वेडा आहेस. "

" तो रे कसा ? तुझा फलज्योतिषावर विश्वास नाहीं काय ? "

" अरे बाबा, ' उद्यां सूर्योदय होणार कीं नाहीं ? ' या प्रश्नावर किंवा ' दोन आणि दोन मिळवून चार होतात कीं पांच होतात ? ' या प्रश्नावर उत्तर मिळविण्यास तूं फलज्योतिषाकडे का धाव घेत नाहींस ? "

" कारण खरा निर्णय जर सहज साधारण अकलेच्या माणसास करतां येतो तर मी फलज्योतिषाकडे कां धांव घ्यावी ? "

" स्पष्ट ज्ञान जर इतर गोष्टींच्या सहाय्यानें होत आहे तर फलज्योतिषांकडे जाणें योग्य नाहीं. आणि शिवाय फलज्योतिषानें केवळ अदमासच काढतां येणार ही गोष्ट तुला ठाऊक आहे एकूण ? "

" ठाऊक नसायला काय झालें ? "

" समजत असून उमजलें नाहीं असें दिसते. "

" तें कसें ? "

" तुला सहज तर्कानें समजणार आहे कीं आयडाबरोबर लग्न केल्यानें तुला सुख होणार नाहीं. "

" हें तूं खात्रीपूर्वक सांगतोस ? "

" अगदीं खात्रीपूर्वक. "

" आणि केवळ साधारण तर्काने ? "

" अगदीं साधारण तर्कानें. "

" अरे लोकमत माझ्याविरुद्ध होईल एवढें सांगितल्यानेच माझें समाधान होणार नाहीं. लोकमतास फांशीं देऊन टाक. "

" लोकमत तुझ्या तर्फेनें होणार नाहीं, कारण त्याच्यायोगाने समाजाचें अकल्याण होणार आहे. तथापि लोकमत विरुद्ध होऊन तुझें नुकसान होण्यासारखी देखील स्थिति नाहीं. "

" कां ? "

" लोकमत आज पूर्णपणें नपुंसक बनले आहे. कसेंतरी करून पोटाची खळी भरावी. शक्य झाल्यास इंग्रजांकडून मान मिळवावा याखेरीज ज्या लोकांपुढें ध्येय नाहीं, असा हिंदुस्थानांतील सुशिक्षितांचा मध्यम वर्ग बनला आहे. असल्या नपुंसक हिंदु लोकमतास न भितां, आम्ही अमुक अमुक करतों अशा तऱ्हेची बढाई कित्येक नपुंसकांस मारण्यास ' लोकमन ' हा शब्द उपयोगी पडतो एवढेच. "

" लोकमत विरुद्ध होईल तरी तेणेंकरून आयुष्य सुखानें जाण्यास अडचण होणार नाहीं, अशी जर तुझी विचारपद्धति असेल, तर तूं कोणत्या दृष्टीनें हें लग्न सुपरिणामी होणार नाहीं असें म्हणतोस ? "

" केवळ तुझ्या हिताच्या दृष्टीनें आणि- "

" 'आणि' काय ? "

" आयडाच्या हिताच्या दृष्टीनें. "

तुझे मत असें अहे काय, कीं माझ्यासारख्या हलक्या जातीच्या ( इन्फिरियर रेस ) मनुष्याशीं लग्न केल्यामुळें आयडा फशी पडेल ? तिला आपलें कल्याण अगर अकल्याण कळत नाहीं काय ? "

" तुझ्यासारख्या हिंदुस्थानांत जन्म झालेल्या मनुष्यास जर हिंदुस्थानांतील सामाजिक स्थिति लक्षांत घेऊन विचार करतां येत नाहीं तर आयडासारख्या मुलीला काय विचार येणार ? "

" पण आयडाला जर स्वार्थत्याग करून मजबरोबर लग्न लावावयाचे असेल, आणि जी स्थिति माझी तीच तिची असें समजून घ्यावयाचे असेल तर काय हरकत आहे ? "

" आयडा तुझ्याबरोबर लग्न करण्यांत मोठासा स्वार्थत्याग करीत नाहीं."

" कां बरें ? "

" तूं जित राष्ट्राचा खरा ! तथापि जित राष्ट्रातले ते सर्व लोक हलके असें ज्याप्रमाणें हिंदुस्थानातील इंग्रजास वाटतें तसें येथील इग्रजास वाटत नाहीं. "

" तर मग आयडाला माझ्याशीं लग्न लावण्यात काहीं फायदा आहे कीं काय ! "

" चाभाराच्या मुलीस भावी ब्यारिस्टरशीं लग्न लावण्यात कांहीं फायदा काहींच नाहीं काय ! "

" तिचा माझ्याशीं लग्न लावण्यात जर फायदा आहे तर तिच्या हिताच्या दृष्टीनें तूं या लग्नाचा निषेध कसा करतोस ? "

" कारण आयडास दुसरी बाजू अजून दिसली नाहीं. "

" तर मग आयडाची माझ्याबरोबर लग्न करण्याची जी इच्छा आहे ती केवळ स्वार्थमूलक आहे ? रामचंद्रराव, तूं आयडाविषयीं निष्कारण वाईट मत बनविलें आहेस, तुला आयडाचा स्वभाव कळला नाहीं. "

" बरें आहे ; शशिपाद, आयडा आहे फाकडु आणि गोड मुलगी, मोठी निष्कपटी पण तरी देखील सांगतों कीं तूं तिच्याबरोबर लग्न करणें हितावह नाही. "

" कां बरें ? तिचा स्वभाव मला आवडतो, ती सुंदर आहे, मी तिला आवडतों असें जें ती दाखविते तें देखील सरळ दिसतें. "

" माझें असें म्हणणें मुळींच नाहीं कीं ती जें प्रेम दाखविते तें वरवरचें आहे. तें तिचे प्रेम आज अगदीं मनापासून आहे. "

" तिचें प्रेम मजवर आहे तें खरें नव्हे काय ? "

" बाबारे, खरे प्रेम आणि खोटें प्रेम असें वर्गीकरण एखाद्या विशेष कालाच्या परिस्थितीसंबंधानें मात्र म्हणतां येईल. आज एखाद्या स्त्रीचें तुझ्यावर आणि तुझें तिच्यावर खरें प्रेम असलें म्हणजे तें चिरकाल टिकेल असे थोडेंच आहे ? "

" बाबारे, प्रेम जर चिरकाल टिकणारें नसेल तर ते खरें प्रेमच नव्हें. "

" चिरकाल जें प्रेम टिकेंल तेंच खरें अशी जर व्याख्या केली तर खरें प्रेम असें जगांत कोठेंच आढळून येणार नाहीं. "

" तुझें मनच मला हलकें दिसतें, नाहीं तर सर्वच प्रेम खोटें असें तूं म्हणाला नसतास. "

" असेल माझे मन हलके, मी त्या टीकेस आक्षेप घेत नाहीं. मला एवढे ठाऊक आहे कीं, स्त्रीपुरुषांमध्यें जें प्रेम असतें त्यास भरती ओहोटीचे नियम लागू पडतात. स्त्रीपुरुषांमध्यें होणारे प्रेमकलह सोडून दिले तरी,

ज्यांच्या योगानें स्त्रीपुरुषांमध्यें परकेपणा येतो अगर अंतर उत्पन्न होते असले प्रसंग अनेक आहेत.

तूं मनात योजितोस त्याप्रमाणे मिश्रलग्न सोडून सामान्य प्रतीचे लग्न जरी घेतलें तरी देखील, स्त्रीपुरुषांत अंतर पाडणारे अनेक प्रसंग उत्पन्न होतात."

"उदाहरणार्थ ?"

"नवरा आणि बायको याच्या स्वभावातील आणि विचारातील अंतर हा एक, घरातील दुसऱ्या मंडळीशीं म्हणजे भाऊ, आई इत्यादि मंडळीशीं बायकोचे न जुळल्यास आणि पुरुष बायकोच्या तंत्रानें न चालल्यास बायकोच्या मनांत नवऱ्यावर होणारी इतराजी, या दोन गोष्टी इंग्रजी आणि आपल्या अशा दोन्ही समाजांत आढळतात, शिवाय अनेक गोष्टींमुळें इंग्रज बायकांस आपले नवरे आवडेनासे होतात."

"त्या गोष्टी कोणत्या ?"

"पाश्चात्य समाजांत पुरुषांमध्यें एखादी स्त्री प्राप्त करून घेण्यासाठीं आणि त्याचप्रमाणें स्त्रियामध्ये एखादा विशेष पुरुष प्राप्त करून घेण्यासाठीं जी धडपड लग्नापूर्वी असते, ती बऱ्याच अंशीं लग्नानंतरहि कायम रहाते. समाजामध्यें निरनिराळे पुरुष आणि निरनिराळया स्त्रिया याचा संपर्क झाल्यामुळें त्या प्रसंगीं आपल्या नवऱ्याचे प्रेम कायम रहावें म्हणून बायकाना अशी धडपड करावी लागते तशीच पुरुषांसही करावी लागते. आपल्याकडे देखील थोडाबहुत हाच प्रकार आढळून येतो. बिजवर नवऱ्याला तरुण नवरीचे प्रेम कायम ठेवण्यासाठीं काय सायास पडतात !

वैवाहिक संबंध कायम रहावा म्हणून स्त्रीपुरुषांना अनेक प्रकारचे शिक्षण दिले जातें. पातिव्रत्य धर्म, एकपत्नी व्रत इत्यादि धर्मतत्त्वें शिकविली जातात. तुझी परंपरागत उपदेशावर श्रद्धा नाहीं, तुझ्या आयडास तूं आपल्याकडील धर्माची आणि संस्कृतीची गोडी उत्पन्न करून दिली नाहीस त्यामुळें ज्या कल्पना तुला आदरणीय होऊन, त्याचें तुम्हां दोघावर वजन पडून तुम्हां दोघांस

नीतिमार्गात ठेवतील अशा कल्पना देखील तुमच्यापाशीं नाहींत. आज आपण बहुतेक नास्तिक मंडळी झालों आहोंत. वेदव्यासाचें अमुक वाक्य म्हणून तें आपण पाळलें पाहिजे असें आपणांस वाटत नाहीं. व केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीनें विचार करून जे नीति नियम काढतो त्या प्रमाणे आपण वागूंच असें नाहीं. त्यांत आपण कायदा शिकलेली मंडळी, पुढें वकिलीच्या धंद्यांत पडणार, त्याच्या योगानें आपणास आज अशी संवय लागूं लागली आहे कीं आपण वाटेल तें करावें, आणि आपण जें करूं तें सिद्ध करण्याकरितां कायद्याचें, नीतीचें अगर धर्मशास्त्राचें समर्थन पुढें करावें आणि जे आपणास ज्या काळीं फायदेशीर पडेल त्याचे आपण समर्थन करून मनाची समजूत करून घेऊं लागलों आहों."

"पंडितजी, आपण मला लग्नाविषयीं मत सांगणार कीं धर्मशास्त्रावर मजपुढें व्याख्यान देणार?"

"व्याख्यानाला घाबरूं नकोस, माझ्या बोलण्यांतील मुख्य सारांश असा कीं लग्न झालें तरी नवराबायकोस एकत्र जोडून ठेवण्यास त्याच्यामधलें प्रेम पुरेसें होत नाहीं. त्यास जोडून ठेवण्यास प्रेमाशिवाय अनेक गोष्टी लागतात. एकतर त्यांस होणारी मुलें, दुसरें नीतिकल्पना व तिसरें लोकमत. नीतिकल्पनाच्या बाबतीत तुझें लग्न अपुरें जोडलें जाईल. आणि लोकमतहि तुम्हांस संयामक होईल असें वाटत नाहीं. तुम्ही नवराबायको, इंग्रजी समाजांतून त्या प्रमाणेंच हिंदु समाजांतून वगळली जाणार. अर्थात् हिंदु समाजांतील लोकमताचा पगडा तुझ्या मनावर रहाणार नाहीं आणि इंग्रजी समाजातील लोकमताचा पगडा तुझ्या बायकोवर बसणार नाहीं."

"जळो तें लोकमत!" लाहा उद्गारला.

"या तुझ्या उद्गारांनीं माझ्या मनाची अधिकच खात्री झाली."

"बरें तें असो, आपण सर्व लोक इंग्रजांची बरोबरी करूं इच्छितों ना? तर मग इंग्रज जातीशीं आपला संबंध जुळल्यानें आपली पदवी उच्च नाहीं कां होणार?"

" मला जें पाहिजे होतें तें आपोआपच तुझ्या तोंडांतून आलें. तुला इंग्रजांशीं समता पाहिजे काय ? तर मग तूं इंग्रज पोरीशीं लग्न करूं नकोस; कां कीं तूं ज्या अर्थी इंग्रज पोरीशीं लग्न करण्यासाठीं हपापलेला आहेस असें दाखवितोस त्या अर्थी इंग्रजापेक्षां मी हलका आहे असें कबूल करतोस असें झालें. ज्या जुन्या लोकांवर तुम्ही वेडगळ ब्रह्मो तोंडसुख घेतां ते हिंदु इंग्रजांस तुच्छच मानितात आणि त्यांच्याबरोबर लग्न करण्यासाठीं तुझ्यासारखे ते हपापणार नाहींत. "

" बरें तें राहूं दे. आह्मां दोघांचें आयुष्य सुखानें जाईल कीं नाहीं ? "

" मी तुला एवढेंच विचारतों कीं, सध्यां तुम्ही प्रेममय वाक्यें बोलत आहां तीं संपून गेलीं अगर तुम्हांस तीं बोलण्याचा कंटाळा आला तर तुम्ही परस्परांपाशीं बोलत तरी काय बसाल ? "

" मि. रामचंद्रराव, तुम्ही अगदीं पेसिमिस्ट आहां. प्रत्येक गोष्ट तुम्ही दुःखसूचकच समजतां. "

" माझा नाइलाज आहे. मला जें खरें वाटलें तें सांगितलें पाहिजे. "

---

प्रकरण ११ वें

# रामभाऊंस उपदेश

शशिपाद निघून गेल्यानंतर रामभाऊ स्वतःच्या मनाशीं विचार करीत पडले. " बरें झालें आपलें लग्न झालें आहे, नाहीं तर या इंग्रज तरुणींच्या मोहपाशांत आपणहि नसतो कां सांपडलों ? " इत्यादि विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले. " अहाहा ! माझ्या प्रियंवदेसारखी एक तरी मुलगी येथें माझ्या दृष्टीला पडत आहे काय ? काय येथच्या पोरींचा थिल्लरपणा ! पण प्रियंवदेसारख्या रत्नाचा आणि माझा जो दृढ परिचय झाला, तो माझें लग्न झालें नसतें तर कोठून

झाला असता ? स्त्रियांशीं प्रत्यक्ष सहवास जर मला झाला नसता तर येथील स्त्रियांच्या स्पर्शानें, कटाक्षानें, व स्मितानें मी किती हुरळून गेलों असतों ?" इत्यादि गोष्टी रामभाऊंच्या मनांत आल्या. हिंदुस्थान सोडल्यापासून असा एकहि दिवस गेला नाहीं कीं, ज्या दिवशीं रामभाऊंस प्रियंवदेची आठवण झाली नाहीं. आज रात्रीं मात्र त्यांस प्रियंवदेची फारच आठवण होत होती. "काय तिचें आनंदी वर्तन ! गोड बोलून दुसऱ्यास आनंदांत ठेवण्यांत ती किती तत्पर ! तिचा विनोद तरी किती उच्च तऱ्हेचा ! रसिकता तिच्यापाशीं किती तरी ! तिच्या तोंडांतून योग्य प्रसंगी सुभाषितमय संस्कृत श्लोक ऐकला म्हणजे त्यानें जो आनंद होई आणि त्यानें जें तादात्म्य वाटे तें कोणत्या तरी इंग्रज मुलीच्या सहवासानें वाटेल काय ?" इत्यादि विचारांत गर्क झाल्यामुळें रामभाऊंस झोंप येईना. त्यांतल्यात्यांत ते जूनमधले दिवस, संध्याकाळ नऊ वाजतां होई, रात्रीं घरांत थोडासा ऊष्माच वाटे आणि क्वचितच दिसणारें बाहेर स्वच्छ चांदणें, अशा वेळेस रामभाऊंस अगदींच झोंप येईना. तो उठून उभा राहिला आणि बटन दाबून त्यानें खोली विद्युद्दीपप्रकाशमय केली. आणि टेबलावर स्मितमुख जो प्रियंवदेच्या फोटो ठेविला होता, तो उचलून त्याचें अनेकवार चुंबन घेतलें. "प्रियंवदे, तूं आतां काय करीत असशील ? निजली असशील ? छे, यावेळेस तर नागपुरास दिवस आहे, यावेळीं तूं कांहींतरी कामांत गर्क झाली असशील. प्रियंवदे, तूं माझी संरक्षणकर्ती आहेस ! पुरुषास स्त्रीचा संरक्षणकर्ता म्हणतात पण हें किती तरी खोटें ! आजकाल या जगांत जे अनेक मोह आहेत त्यांपासून पुरुषाचें संरक्षण करणारी खरोखर सद्गुणी भार्याच होय. पुरुषाचें जीवनवृत्त एक-कल्लीपणाचें होणार असल्यास, अगर वाजवीपेक्षां बेफिकीर होणार असल्यास, मनांत येणाऱ्या अनेक कल्पनांनीं उत्पन्न केलेल्या मृगजळाप्रमाणें विनाश पावणारें असल्यास, त्यास नाजुकपणानें आणि मोहकतेनें स्त्रीपासून अवरोध होतो आणि त्यामुळें जें संरक्षण मिळतें तें दुसऱ्या कशानें मिळणार आहे?"

याप्रमाणें विचार करीत रामभाऊनें टेबलांतून एक कागदी पेटी काढली; त्या पेटींत अनेक पत्रें होतीं. तीं रामभाऊ वाचून पाहूं लागला. वाचकहो, त्या

पत्रांकडे आपण नजर फेंकूं नका. त्यांतलीं जीं तुम्हांस दाखवण्यासारखीं कांहीं पत्रें आहेत तीं मी तुम्हास दाखवितोंच.

पत्र १.

मुक्काम नागपूर, ता. १३ डिसेंबर.

माझ्या लाडक्या नवऱ्या,

कसें काय पतिराज! या तऱ्हेची सलामी आपणांस कशी काय आवडते? आतां आपण इंग्लंडमध्यें गेला, आणि आपल्या चवी देखील आजकाल इंग्रजीच बनल्या असतील, म्हणून नेहमींचा आपला मराठी मायना टाकून आज मी इंग्रजी पद्धत स्वीकारीत आहे. तुम्हांला ही पद्धत आवडत असेल तर कळवा; नाहीं तर मला माझ्या जुन्या पद्धतीचा अवलंब केला पाहिजे.

माझ्या दोन महिन्यापूर्वीच्या पत्रावरची आपली टीका वाचली. मी सासूबाईना जी इंग्रजी कादंबरी वाचून दाखविली व जिच्यात रॉबर्ट म्याकफील्ड हा बॅरिस्टरीचा अभ्यास करणारा विद्यार्थी एका तरुण नटीच्या नादीं लागून यानें आपल्या आयुष्याची नासाडी करून घेतली हें दाखविलें होतें, तिचें संविधानक लिहून आपणाकडे पाठविलें, आणि सासूबाईना कशी काळजी लागली हें त्या सोबत लिहिलें होतें. आपण त्याच्यावर जे मार्मिक उत्तर लिहिलें तें मी वाचलें. आपल्याला असं वाटतं का कीं सासूबाईनां काळजी लागली म्हणून जें मीं लिहिलें तें सर्व खोटें? आपण उत्तरीं लिहितां कीं काळजी मलाच लागली आहे, आणि सासूबाईनां काळजी लागली म्हणून जें मी लिहिलें तें केवळ, स्वतःची भीति लपविण्यासाठीं केलेलें मिष आहे. आपण थोडक्यांत घसरला. बायकांनां, आणि आजकालच्या बायकांनां, खोटें बोलावयाचें असलें (आणि खोटें सर्वच बायकांनां बोलावें लागतें) म्हणजे त्या सगळेंच खोटें बोलत अगर लिहीत नाहींत. त्यांच खोटें बोलणेंहि अधिक सुशिक्षित झालें आहे, ही गोष्ट स्त्रीशिक्षणाचे वैरीदेखील कबूल करतात. मी कोणत्याशा इंग्रजी पुस्तकाच्या मराठी भाषातरांत परवां असं वाचलं कीं, हुशार इंग्रजी बाईस जर नवऱ्यास

अप्रिय अशा एखाद्या घरीं जायचें झालें तर नवऱ्यास प्रिय अशा एखाद्या घरीं ती मुद्दाम जाते आणखी त्याबरोबरच ती नवऱ्यास अप्रिय अशा घरीं देखील जाते आणि बाहेर कोठें गेलीस असा नवऱ्यानें प्रश्न केला म्हणजे त्या नवऱ्याच्या आवडत्या कुटुंबाचें नाव सांगते. आणि असं झालं म्हणजे—

न चारिहिंसा विजयश्च हस्ते ।

असं होतं. खोटं बोलण्याचेंहि पाप लागत नाहीं. आणि स्वतःचा कार्यभाग होतो. तें पुस्तक वाचल्यानंतर मला वाटूं लागलें कीं, एवढेंच शिकण्यासाठीं इंग्लंडांत कशाला जावयास पाहिजे ? एवढी हुशारी आपल्याकडच्या बायकांतहि आहे. सर्व बायकांत अवगत असलेली ही कला मला अवगत नाहीं असा आरोप मजवर कां करतां ? इंग्लंडमधल्या नटीसंबंधानें मला काय धास्ती पडली हें मी कोठें लिहिलं ? मीं फक्त सासूबाईनां काय धास्ती पडली हेंच लिंहिलं. मी स्वतःच्या मनोवृत्तींविषयीं मुग्धता ठेवली.

नवऱ्यावर अविश्वास ! काय ही प्रियंवदा फाजील पोर झाली हो ! असं कां आपण म्हणतां ? हा विचार जर आपल्या मनात आला असेल तर तो आपल्या त्या सुंदर कुरळया केसाच्या खालीं लपलेल्या मेंदूतून एकदम काढून टाका. मी जर तुमच्या त्या लंडनला असतें तर ब्रशानें आपले केंस विंचरावयाचें निमित्त करून आणि आपली त्या प्रसंगीं चुंबनावर चुंबनें घेऊन तो विचार केव्हांच काढून टाकला असता.

बायकांविषयीं पुरुषांस संशय का येतो, याचें मुख्य कारण एक बायकांनां आपल्या जातीच्या सामर्थ्यावर विश्वास असतो, आणि त्यामुळें इतर बायकांची त्यांस भीति वाटत असते. त्यास वाटतें कीं, माझ्या भोळया नवऱ्याला दुसऱ्या कोणी तरी लाघवी स्त्रिया फसवून तर नाहींना नेणार ? शिवाय इंग्लंडमध्यें मेनका घृताची वगैरे अप्सरा पुष्कळ आहेत, म्हणून आम्हीं येथें ऐकतो. शिवाय आपल्याकडील स्त्रियांपेक्षा विलायतेंतील स्त्रियांच्या अंगीं सौंदर्याभिज्ञता देखील अधिक आहे असें देखील आमच्या कानावर येतें. आणि तसें ऐकूं आलें म्हणजे ज्याचा नवरा देखणा असतो त्यांच्या पोटांत धस्स होतें. आपला

नवरा या परिस्थितींत सांपडला आहे असें ऐकून जर भोळ्या हिंदुस्थानच्या बायका घाबरल्या तर नवऱ्यानें आपल्यावर बायको विश्वास ठेवीत नाहीं म्हणून रागावण्याचें कारण नाहीं. उलट आपली बायको आपणांस किती 'आपलासा' समजते हें पाहून आनंदित व्हावें. मत्सर हा प्रेमाशिवाय येत नाहीं. "आप कूछ चाहेसो करो, मै भी कुछ चाहेसे करूंगी" असें म्हणून नवऱ्याला निर्मत्सरपणानें वागविणाऱ्या बायका कोणत्या नवऱ्याला आवडतील ?

तुम्ही लिहितां कीं तुमच्या घरवालीच्या 'लिझी' नांवाच्या मुलीस, आपलें खरोखरच लग्न झालें आहे काय म्हणून फारच जिज्ञासा झाली आहे. थांब म्हणावें इंग्रजाच्या कारटे, तुझे तेथें येऊन केंस उपटीन तेव्हां तुला कळेल कीं, 'मि. गॉडवॉल' हा विवाहित की अविवाहित आहे! तिला म्हणावं की तिचें ते पियानो वाजवून दाखविणं निरुपयोगी आहे. तिनें आपलें जाळें पाहिजे तर दुसऱ्यावर टाकावें, पण माझ्या मार्गांत आणि माझ्या हक्काच्या नवऱ्याच्या प्रेमांत आडवे येऊं नये.

आपली दररोज आठवण करणारी,
प्रियंवदा.

२

सा. न. वि. वि.—

आपलें इंग्रज लोकांच्या नाचासंबंधींचें वर्णन पोचलें. त्याची कल्पना आपण पूर्वी एकदां दिली होतीच. पण आजचें प्रत्यक्षावलोकन केल्यानंतरचें वर्णन अधिक चित्रमय भासतें. आपल्या एका इंग्रज परिचितेस हिंदुस्तानांतील स्त्रियांस पुरुषाबरोबर नाचतां येत नाही म्हणून दुःख वाटतें काय ? त्या टवळीला म्हणावं बाईसाहेब आपण किती सुखी आहांत. पुरुषांच्या स्पर्शानें तुम्हांला मधून मधून आनंदहि होत असेल, पण त्याबरोबरच आपल्या नवऱ्याचें आपणावरील प्रेम दुसरी कोणी हिरावून नेईल अशी भीती तुमच्या हृदयकपाटाच्या चोरखणांत लपून आहे तिची तुम्हाला आठवण नाहीं काय ? चुकलें ! असेल कशाला, तिचें लग्नच कुठें झालें आहे ? तिला अर्थात जें थोडका

वेळ पुरुषापासून स्पर्शसुख मिळतें तेंच पुरेसें झालें. कारण लिहितां कीं, जे पुरुष दुसऱ्याच्या बायकोच्या कमरेस विळखा घालून नाचतात त्यांत त्यांचा वाईट हेतु नसतो, व बायकांचाहि वाईट हेतु नसतो, केवळ पुरुष हा दुसऱ्या बाईशीं नाचून आपला तिच्याविषयींचा आदर व्यक्त करितो ! मी आपणांस एवढीच पायां पडून प्रार्थना करितें कीं आपण असा आदर दाखवूं नका. मला माझा रामचंद्र सबंध पाहिजे आणि मला तो एकटीला पाहिजे. माझ्या रामचंद्राशीं सलगी जोडण्यास दुसरी कोणतीहि स्त्री आलेली मला आवडणार नाहीं. मी फार मत्सरी बायको आहें. " शुश्रूषस्व गुरून् " हें माझ्या हातून होईल पण " कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने " हें या कलियुगांत वाढलेल्या मज बापडीच्या हातून होणार नाहीं. जेवून दुपारची मी जरा पडलें होतें तेव्हां मला स्वप्न पडले कीं आपण विलायतेहून आणखी एक बायको करून आलात आणि सासूबाईनीं आपले मुखावलोकन केलें नाहीं. पण मला बाई राहवेना, मी जखीणीसारखी त्या बाईवर घरांतली कोयती घेऊन धांवत गेले, तेव्हां तिनें किंकाळी फोडली तेव्हां मी जागी झालें, आणि जरी शेजारच्या बबीनें बिछान्यावरून पडल्यामुळें ती किंकाळीं खरोखर फोडली होती तरी तिकडे माझें दुर्लक्ष झालें कारण, एक दोन मिनिटें मी देहभानावर येत होते. आणि तें केवळ स्वप्न आहे अशी जरी मला खात्री पटली तरी त्या स्वप्नाच्या योगानें उत्पन्न झालेली व्यग्रता माझ्या मनांत दिवसभर होती. कशी मी विचित्र आहे हें मलाच कळत नाहीं !

दिनकर भावोजींचा अभ्यास चांगला चालला आहे. सासूबाई खुशाल आहेत. त्यानां आपल्या पत्रांतील कांहीं भाग वाचून दाखविला आणि विलायतेस स्त्री–पुरुषांच्या नाचाचीं चित्रेंहि दाखविलीं, त्यानां त्यापासून बरीच मौज वाटली. दादाची प्राक्टिस आतां सुरू झाली आहे आणि पहिल्या दोन तीन महिन्यांतच आलेल्या कामावरून पुढें चांगली चालेल असा अंदाज दिसतो.

आपली
वेडी व मत्सरी
प्रियंवदा

३

साष्टांग नमस्कार, विज्ञापना विशेष—

मी आज तुम्हांला पत्र लिहीत नाहीं. मला तुमचा फार राग आला आहे. तो मी आज कवितारूपानें व्यक्त करीत आहे. कालच नवनीतांत सीतागीत वाचलें. आणि मला काव्यस्फूर्ति झाली. आणि मी एक काव्य तयार केलें, त्या काव्यास नास्तिकनिषेध म्हणून नाव देत आहें.

थांबा घाबरूं नका; प्रियंवदा ही रागावली म्हणजे तुम्हांस नास्तिक बनवून तुमचा निषेध करण्यास उद्युक्त होत नाहीं. कारण मी खरी प्रियंवदा आहे.

नास्तिकनिषेध.

( १ )

रामचंद्र नामा । होता एक वीर ।
बुद्धीनें जो धीर । पूर्वी गेला ।
स्वपत्नी शोधार्थ । राक्षसाच्या लोकी ।
वानरसैनीकीं । साह्य त्याते ।
अंतर ते थोडे । गेला ओलाडून ।
सेतुतें बांधूनी । पाषाणाहीं ।
आज रामचंद्र । सोडोनी पत्नीते ।
सातां समुद्रातें । ओलाडीतो ।
कोणत्या लोकांतें । जातो भक्तप्राण ।
जाणायातें कोण । शक्तीमान ।

( २ )

बोलती जी लोक । वार्ता त्या देशाची ।
असे काय साची । देव जाणे ।
सीताप्रसादानें । वानर झाले जे ।

देशाचे या राजे । राष्ट्र यांचें ।
आहे दूरवर । भारतापासोन ।
त्याचें नसे ज्ञान । आम्हा लोकां ।
माझे प्रिय मित्र । सुखें वागताती ।
अथवा भांडती । जाणायातें ।
पत्नीतें सोडोन गेला रामचंद्र ।
व्रत हे कठोर । प्राणेशाचें ।

( ३ )

भक्तांची काळजी असे ईश्वरातें ।
ठावें हें सर्वांतें । पूर्णपणे ।
रुक्मिणी सोडोन । भक्तीसाठीं धांवे ।
कृष्ण त्याचे गावे । गाणें नित्य ।
लोकहितासाठों । सागे महिपती ।
संतलीलामृतीं स्पष्ट वाक्यीं ।
त्याचाहि प्रत्यक्ष । आजच्या नास्तिकां ।
येई न, ये शंका । दुष्टां लोकां ।
आज रामचंद्र । वानरभक्तांच्या ।
देशी गेला साचा । पत्नी त्यागी ।

( ४ )

नास्तिकांच्या जिव्हा । थाबोत त्या नित्य ।
पाहोनी ह्रुदय । सर्वेशाचें ।
वानर ह्रुद्गर्भी । राहे रामचंद्र ।
मूर्ती ती सुंदर । श्यामलांग ।
कांतेतें मत्सर । होतसे भक्तांचा ।
तरी देवा त्याचा । खेद नाहीं ।

पत्नीच्या भक्तीची । सत्यता पाहाया ।
राही रामराया दूरदेशीं
येथें ना अशोक । शोक वारायातें ।
यास्तव खंतते । प्रियंवदा ।

कां ? कसें आहे हें काव्य ! मला आतां असें वाटूं लागलें आहे कीं, मी मोठी कवयित्री झालें आहे. आता माझी तुलना जनाबाईशीं करावयाची कीं गोणाईशीं करावयाची, हाच तेवढा प्रश्न आहे आणि या प्रश्नाचें उत्तर सोडविण्यांत आज मी गर्क झालें आहे, त्यामुळें आज जास्त लिहितां येत नाहीं.

आपणांस मधून मधून नकोशी वाटणारी
तरी देखील आपलीच,
प्रियंवदा.

ता. क. अहो लबाड गृहस्थ, मला त्या लिझीकडून तुम्हाला ती नाताळची आलेली भेट केवळ पाहायास पाठवून माझा मत्सर जागृत करू पाहातां नाहीं ? तुम्हांला काय वाटतें की मी मत्सरानें पूर्णपणें ग्रस्त होऊन जाईन ? आपण लिझीनें दिलेली देणगी मला देऊन त्या लिझीबाईला भर्तृहरीच्या "यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता" या श्लोकाची प्रतीति दिलीत ('यां' च्या जागीं 'यं' पाहिजे आणि 'सा' च्या ठिकाणीं 'स' पाहिजे). लिझीबाईला म्हणावं कीं "तूं आतां भतृहरीप्रमाणें अरण्यांत निघून जा."

प्रियंवदा.

३

सा. न. वि. वि.

मला असे वाटलें कीं मी जर गांवढळ मुलगी असतें आपल्याला बायकोचा मत्सर जागृत करून तिला रडकुंडीस आणावयाचे आहे नाहीं ? काय हा तेवढ्यासाठीं आटोकाट प्रयत्न ! मी इकडे त्या लिझीला शिव्या हांसडीतच आहें आणि आपण तिच्यासंबंधानें अधिकाधिक लिहितां. आणि म्हणतां की तिचा आकार ग्रीक मूर्तीप्रमाणें अगदी बांधेसूद

आहे, तिचा वर्ण जरी फारच गौर आहे तरी म्हणे तिच्या गालावर गुलाबी छटा दिसते आणि सकाळीं बिछान्यांतच पडलों असतां ती ज्यावेळेस ट्रेमध्यें चहा आणि टोस्ट घेऊन येते तेव्हां तिचें मुख बालार्काप्रमाणें दिसतें. वाहवा! आतां तर आपण कवीच झालांत! छे! कवीपणा होईल तितका लौकर सोडून द्या. कारण कायदेबाज वकीलाला तो बिलकूल शोभत नाहीं. तुम्हांला केस पिकलेल्या म्हाताऱ्याप्रमाणें गंभीरमुद्रा धारण करून हृदयांत द्रव्यलोभाशिवाय दुसरा कोणताहि विकार ठेवावयाचा नाहीं हें भासविण्यासाठींच ना टोप घालाव-याची रीत पडली आहे? कवित्व, आणि त्यास साजतील असे इतर गुण म्हणजे रसिकता आणि देशाभिमान इत्यादि सर्व श्रीमंत होऊं पाहणाऱ्यास शोभत नाहींत. आणखी काय म्हणतां—"माझें लग्न झालें नसतें तर किती तरी बरें झालें असतें असेंहि मधून मधून वाटते!" आणि याचें कारण देतां कीं, "कोणीतरी आंग्लसुंदरी हिंदुस्थानांत घेऊन आलों असतों आणि महाराज बागेंत हिंडावयास गेलों असतों, म्हणजे लोक माझ्याकडे टकमक पहात राहिले असते." खाशा! तुम्हांला असें वाटलें कां, आपण जें जें कांहीं लिहितां त्यावर मी विश्वास ठेवतें म्हणून? खरें कोणतें आणि थट्टेचें कोणतें हें ओळखण्यास पुरुषांची मुद्रा समोर पाहिजे असें थोडेच आहे! बायकांनां लिहिण्यांतूनहि तें ओळखतां येतें. मला दिवसानुदिवस अशी शंका पडूं लागली आहे कीं तुमची ती 'लीझी' कोणी खरोखरीची बाई आहे कीं काल्पनिक आहे? पुरुषांच्या बोलण्यावरून गूढेंगित ताडण्याची कला बायकांनां जन्मसिद्धच आहे. पुरुष जेव्हां दुसऱ्या बायकांच्या-वर लक्ष देतात तेव्हां आपल्या बायकोच्या लक्षांत ती गोष्ट येऊं नये म्हणून बाहेरून अधिकाधिक संभावितपणा धारण करतात. जेव्हां ते आपल्याविषयीं संशय उत्पन्न करूं पहातात तेव्हां त्याचे वर्तन निराळें म्हणजे निर्मल असतें. "अन्यसंक्रांत प्रेमाणः नागरिका अधिकं दक्षिणा भवन्ति" हें सांगावयास कोणी कालिदास नको, हें प्रत्येक बाईस कळत असतें.

या आठवड्यांत लिहावयास बातमी पुष्कळ आहे, तथापि याच आठव-ड्यांत मला घरीं काम पुष्कळ पडलें. याचें कारण आपली मोलकरीण राधा

"नीच रतली रायासी । तिसी कोण म्हणेल दासी ॥" या न्यायानें फार उच्च पदावर चढली आहे, आणि याच कारणास्तव ती नोकरी सोडून गेली. तिला एका व्हाडांतील वकिलानीं एक स्वतंत्र घर भाड्यानें घेऊन दिलें आहे.

मागील पत्रीं, मजवर गायन शिकण्याचा प्रसंग आला होता तो मी कसा टाळला हें लिहिलेंच होते. गवयी हरिभय्या मोघे यानीं आतां गायनाची शाळा काढली आहे. चार पांच विद्यार्थी असतात. त्याची खाणावळ आतां बाहेर पडूं लागली आहे, असें तें सांगतात. त्यांस आपल्या बंडूनानाचे वडील अनंतराव हे भेटले होते आणि त्यानीं आपल्यासाठीं कांहीं खटपट करूं असें अभिवचन दिलें.

बंडूनानांचे मेहुणे रा. हरिहरराव वारले. त्यांच्या संबंधींचा मृत्युलेख छत्तिसगडसेवकात प्रसिद्ध झाला आहे. तो अंक सोबत पाठविला आहे.

दोन तीन दिवसापूर्वी मजकडे पेनांगवाला शेटजींची मुलगी पुतळीबाई ही आली होती. ती, गेल्या आठवड्याला चीफ कमिशनरकडे पार्टी झाली तिला गेली होती, आणि त्या पार्टीचें ती मोठें रसभरित वर्णन देत होती. त्या पार्टीला आपल्या गांवांतल्या सभ्य सभ्य म्हणविणाऱ्या कितीतरी गृहस्थांच्या बायका गेल्या होत्या म्हणून सांगूं ? काय हो, जे गृहस्थ आपल्या बायकांनां आपल्या समाजांत फारसे फिरकूं देत नाहींत तेच शहाणे सुधे इंग्रज लोकांच्या घरीं आपल्या बायकांनां कशाला हो घेऊन जातात! आपण प्रागतिक आहोंत हें तर त्यांनां इंग्रजांनां भासवावयाचे नाहीं ना ? त्या बायकांत एक राव-बहादुरीण होती. तिला जिन्यावरून उतरतांना हात देण्याचें मानाचें काम चीफ कमिशनर साहेबांचा एक इंग्रज हुजऱ्या म्हणजे ए. डी. सी. होता त्यानें केले. आपण पूर्वी गोष्ट सांगत होतां ना की उत्तर हिंदुस्थानांत एक मराठी संस्थान आहे, तेथील अल्पवयस्क राजाची आई देशी लोकांसमोर पडदा बाळगते आणि पोलिटिकल एजंटबरोबर मात्र टेनिस खेळते. आपल्या लोकांबरोबर वागतांना बायका घरांत लपवून ठेवावयाच्या आणि इंग्रजासमोर मात्र बायका घेऊन जायचें ही सुधारणा अलीकडे फार बोकाळली आहे. बरें झालें आपण सुधारक नाहीं! नाहींतर माझे धिंडवडेहि तेच झाले असते.

असो, यंदा माझी मंगळगौर करायची नाहींच आहे, उरलेल्या चार मंगळगौरी आपण आल्यानंतरच करावयाच्या या बेताला सासूबाईनीं संमति दिली.

आपली
बायकोला चिडविण्याचा कामांत
नवऱ्याच्या पराभव करणारी
प्रियंवदा

ता. क.

आपल्याला सुंदर सुंदर बायका पहाण्याची फार इच्छा आहे. म्हणूनच मी मंगळगौर पुढें ढकलली. आपले लग्न झालें नसते आणि आपण इंग्रज बायको करून आणली असती, म्हणजे कुठे आपल्याकडे देखण्या बायका मंगळागौरीस आणि चैत्राच्या हळदीकुंकवाच्या दिवशीं बोलावता आल्या असत्या ?

प्रियंवदा

वाचकहो, गुप्त पत्रव्यवहार पहाण्याची फार इच्छा धरूं नये. पाहिला तेवढा पुष्कळ झाला. आता प्रियंवदेच्या रामभाऊस देखील झोंप येऊं लागली आहे. त्याला निजण्याला परवानगी द्या.

---

## प्रकरण १२वें

# भोंसला विजय मिल्सचीं तीन वर्षें

बंडुनाना मोठ्या तडफीचा आणि मेहनत करणारा मनुष्य होता. त्यानें कंपनी स्थापन करण्यापासून मिल बांधण्याचें व ती सुरू करण्याचें काम धडाडीनें उरकलें. तथापि घातलेल्या पैशाला व्याज किंवा मुनाफा ताबडतोब मिळावा म्हणून लोकांत अधीरता उत्पन्न झाली आणि तीमुळें बंडुनानास फारच त्रास झाला. शेअर गोळा करणें चालू असतां कापडाच्या गिरणीच्या कामाची मुख्य माहिती त्यानें मिळविली व अनेक गोष्टींवर प्रत्यक्ष माहिती मिळवून काम सुरू केलें. भोंसला विजय मिल्स स्थापन झाली, तिच्या स्थापनेसाठीं चार लक्षांचें

भांडवल तयार झाले तथापि मिलची स्थापना झाली ती अंदाजाबाहेर खर्चाची तयार केली गेली. तीन लाख रुपये तर गिरणीच्या इमारतीसच लागले आणि सूत तयार करण्याची यंत्रें बोलावून बसवून एकंदर खर्च ७ लक्ष रुपये झाला. हें इतर तीन लाखांचें भांडवल मिळविलें ते कर्ज काढून मिळविलें. कर्ज देण्याच्या वेळेस रूपराम मारवाड्यानें त्या गिरणीचे सर्व सामान गहाण म्हणून लिहून घेतले. त्या कर्जावर रूपराम मारवाड्याचें शेंकडा ९ व्याज सुरू झालें. ही परिस्थिति पाहून बंडुनानांस वाईट वाटले. कारण जर तीन लाख रुपयांवर शेंकडा नऊप्रमाणें व्याज द्यावें लागणार, आणि पुढें ज्या ज्या रकमा आपणांस लागतील त्यावरहि तसेंच जबर व्याज पडणार तर आपण लोकांस नफा तरी कसा देणार ! एक वर्षांत त्याला असें दिसून येऊं लागलें कीं दीड दोन लक्ष तर नेहमींच्या व्यवहारास लागतात. तर येणेंप्रमाणें पांच लाखांवर शेंकडा ९ प्रमाणें जर आपण व्याज देऊं लागलों तर गिरणी लवकरच मारवाड्याच्या घरांत जाते असें त्यास दिसून येऊं लागलें.

भांडवलाची तूट ही व्यापार बुडविण्यास मोठी कारण आहे. जेव्हां एखादा मनुष्य काहीं आपल्या पैशानें आणि कांहीं कर्जाऊ रकमेनें भरून मोठें घर बांधावयाची योजना करतो आणि शेंकडा ९ । १० दरानें पैसे काढतो तेव्हां तो व्यवहार फायदेशीर पडत नाहीं आणि घर पुढें लवकरच आपल्या मूळ रकमेसह सावकाराच्या घशात जातें हा अनुभव पुष्कळांस आहेच.

रूपराम मारवाड्याचें शेंकडा ९ दरानें व्याज सुरु झालें एवढेंच त्यांत वाईट नव्हतें, तर होरमसजी पेनांगवाला हा रूपराम मारवाडी आपल्या तंत्रानें आहे असें दाखवी आणि त्यामुळें ती रक्कम कायम ठेवण्यासाठीं होरमसजी पेनांगवाला दरमहा दोनशे पगार मागे आणि डायरेक्टरांनां निरुपायानें तें कबूल करावें लागे.

आतां ही गिरणी अशाच स्थितींत चालू राहिली आणि अल्पदरानें व्याज मिळण्याची सोय झाली नाहीं तर ही खात्रीनें बुडणार आणि त्यामुळें आपल्या वडिलांचा आणि आपला दुर्लौकिक होणार या गोष्टी बंडुनानांच्या डोळ्यापुढें खेळूं लागल्या.

डायरेक्टरांकडे जाऊन सल्ला घेण्याची सोय नाहीं. कां कीं मिलची जी डायरेक्टर मंडळी होती, त्यात कित्येक मतलबी माणसें होतीं, कित्येक रूपरामाचे हस्तक होते व कित्येक अल्पदृष्टीचे लोक होते. जास्त भाडवल वाढवून रूपरामाच्या कचाट्यातून सुटण्याची योजनाच कित्येकाना पसंत नव्हती. त्यांचे म्हणणें असें पडे कीं, शेकडा नऊ टक्के व्याज नागपुरास लोकाना घरीं बसल्या मिळत आहे. तुम्हांस नऊ टक्क्यापेक्षा अधिक नफा मिळविण्याची धमक नाहीं तर गिरणीचा खटाटोप केला तरी कशासाटीं ? जर नऊ टक्क्यापेक्षा जास्त व्याज तुम्हास मिळविता येत असलें तर राहीना रूपरामाचा पैसा आपल्यापाशीं ! त्यांत फायदाच आहे. डायरेक्टरानीं कामात विघ्न आणण्यासच प्रारंभ केला. शिवाय डायरेक्टरानीं आपल्या घरचीं अनेक कामें गिरणीच्या खर्चानें करून घ्यावयास सुरवात केली. कुणाचा बूट फाटला कीं, पाठवा तो गिरणीच्या मोच्याकडे. कांहीं पट्टयाचें कातडं उरलें तर घ्या तळवे करून आपल्या घरच्या जोड्यांना. कोणाचा पाट मोडला तर पाठवा गिरणीच्या सुताराकडे. पेनागवाला शेठजीची गाडी मोडली तर ती देखील दुरस्त करून घेतली. गिरणीमध्यें कित्येक खोगीरभरती कारकून होते. त्यात गिरणीस कारकून लागतात हा प्रश्न पुढे नसून आमच्या भाचेसुनेच्या चुलत भावाची सोय कशी करून द्यावी हा प्रश्न डायरेक्टरापुढें असे. डायरेक्टराच्या घरचें काम आले आणि ते जर अगोदर करून दिलें नाहीं तर डायरेक्टरांस घुस्सा येई. नोकराना आपली नोकरी कायम ठेवण्यासाठीं डायरेक्टराच्या घरच्या कामाकडे अधिक लक्ष द्यावें लागे. गिरणीचें काम दहा मिनिटें डायरेक्टराच्या कामाकरिता अडून राहिलें तर फक्त दहा मिनिटें कामास उशीर झाला एवढेंच त्यास वाटे. तथापि ५०० लोकांचीं दहा-दहा मिनिटें व्यर्थ जाऊन दहा-पाच रुपयाचें नुकसान तेवढ्याच दहा मिनिटांत होतें हें त्यास कळत नसे. तथापि बंडुनानानें या सर्व गोष्टी बंद केल्या.

बंडुनानांच्या हातून काहीं चुका झाल्याच. उदाहरणार्थ, त्यास कापसाची चांगली पारख नसल्यामुळें चागला कापूस कोणता, वाईट कोणता हें कळत नसे. कापसाचा भाव अमुक आहे, तरी दोन रुपये कमी अशा हिशोबानें कापूस

तुम्हाला देतो असें कोणीं सांगितल्यास त्यानें त्यावर विश्वास ठेऊन कापूस घ्यावयाचा. शिवाय हाताखालच्या कारकुनास लांच मिळाल्यामुळें कापूस वजन करून घेतांना कारकूनाकडून कशी काय लबाडी होते हेंहि त्यास कांहीं दिवस कळलें नाहीं. गिरणींतील स्पिनिंग ( सुतकामाचे ) मास्तर, वीव्हिंग ( विणकामाचे ) मास्तर हे साधारणपणें ब्रऱ्यापैकीं होते. व कापडहि बरें निघे व त्यामुळें त्याला गिऱ्हाइकी देखील बरी येई तथापि विकण्याची व्यवस्था चागली नव्हती. पुष्कळ व्यापारी आंत माल बराचसा साचला आहे अशी बातमी कळली म्हणजे मागणी करीत आणि त्यावेळेस एकदम पुष्कळ माल आम्ही घेतो आहों, आम्हाला स्वस्ता दर द्या म्हणून भाव पाडून घेत. एकदम पुष्कळशी विक्री झाली म्हणजे बंडुनानास आनंद होई. पण त्याच्या हें लवकरच लक्षात आलें कीं एकदम पुष्कळशी विक्री होण्यात फायदा नाहीं. कारण जे व्यापारी मोठी खरेदी करीत ते विकत घेतलेला माल बाजारात ताबडतोब फैलावून देत आणि त्यामुळें खरेदी करण्यास दुसरे व्यापारी लवकर येत नसत. त्याच्या लवकरच लक्षात आलें कीं, गिरणीनेंच चोहोकडे एजंट ठेवून विक्री केली पाहिजे. ही कल्पना अमलात आणावयास त्यास त्रास पडला, कारण जे व्यापारी खरेदी करणारे होते त्याचें डायरेक्टराशीं सूत जमलेलें होतें, व त्यामुळें त्यांचा विचार डायरेक्टराकडून पास व्हावयासच पंचाईत पडली.

भोसले विजय मिल्सच्या स्थितीविषयीं व प्रगतीविषयीं काहीं माहिती बंडूनानाच्या रामभाऊस गेलेल्या पत्रावरून मिळेल.

रामभाऊस नागपुराहून जी पत्रें जात असत, तीं केवळ घरचींच पत्रें नव्हती; त्यास घरकुट्ट्याकडून पत्रे येतच असत व तीं पत्रे नागपुरची स्थानिक बातमी वेळोवेळीं कळवीत असत. घरकुट्टे याच्या पत्रांतील बराचसा भाग जर प्रसिद्ध केला तर त्यावेळच्या नागपूरच्या राज्यव्यवस्थेवर व शासक वर्गाच्या आसपास हिंडणाऱ्या ‘ नेटीव ’ लोकांच्या रीतींवर बराच प्रकाश पाडील. त्याप्रकारची कल्पना तत्कालीन वर्तमानपत्रांवरून कधींच यावयाची नाहीं. कारण सर्व वर्तमानपत्रे राज्यद्रोहाच्या किंवा लायबेलच्या कायद्यानें बद्ध असतात.

खासगी गप्पांत ती अडचण नसते, त्यामुळें जर कोणास स्वकालीन इतिहासाची खरी माहिती पाहिजे असेल तर कोर्टातील कारकुनांच्या गप्पा वगैरे गोळा केल्या पाहिजेत, यूरोपियन क्लबांमध्यें जेव्हां दोन गृहस्थ सहज बाजूला जाऊन चार शब्द बोलतात तेहि मिळविले पाहिजेत, व या दोहोंची कागदपत्राशीं संगति लावली पाहिजे. नागपूरच्या परिस्थितीचे दर्शक असे बंडुनाना घरकुट्टे यांच्या पत्रांतील कांहीं उतारे येथें देतो. त्या उताऱ्यातच भोंसले विजय मिल्स चालवीत असतांना बंडुनानास आलेले अनुभव व्यक्त झालेलें आहेत.

" मूर्ख आहेस तूं रामभाऊ! तुला वाटतें कीं शिकून आलास तर तुला मोठी जागा मिळेल, पण केवळ शिकण्यानें थोडीच ती मिळणार आहे ? तूं वेड्यासारखे जे शिकण्यात पैसे खर्च करतोस ते करूं नकोस. चीफ कमिशनरला लांच देण्यासाटीं ते पैसे शिलक ठेव. नागपूरला आजकाल नोकरीचे भाव येणेंप्रमाणें आहेत — इ. ए. सी. ची जागा पाहिजे असल्यास ५००० रुपये भरावे, तहशिलदारी पाहिजे असल्यास अडीच हजार रुपये आणि नायब तहशिलदारीची जागा पाहिजे असेल तर १००० रुपये पुरतील. चीफ कमिशनरसारख्या मोठ्या साहेबाला लाच देण्याला एकदम जावें तरी कसें ? अशी शंका घेण्याचें तुला बिलकुल कारण नाहीं. दयाळू चीफ कमीशनरनें तुमच्या भिडस्तपणावर उपाय म्हणून सोय करून ठेवलीच आहे. त्यांचा लाचेची देखरेख करणारा एजंट गोपाळ चांदे म्हणून गावात आहे. त्याच्यापाशीं जावें, तो सर्व प्रकारची कामें करून देईल.

जर पुरेसे पैसे नसले तर एक युक्ति आहे. येथे इन्शुरन्स कंपनीचा एक गोवानीज एजंट आहे, त्याच्या मार्फत तुम्ही दहापंधरा हजाराचा विमा उतरावा म्हणजे तो व गोपाळ चांदे मिळून तुम्हास रक्कम देणारा सावकार कोणीतरी गांठून देतील आणि तुमची रक्कम चीफ कमिशनरकडे बिनचूक नेऊन पोंचविण्याचें काम गोपाळ चांदेच करील. गोपाळ चांदे तुला ठाऊकच आहे. आमच्या बाबांचा तो मोठा स्नेही. निदान बाबा तरी असें सांगतात. मी पुष्कळदां लहानपणापासून गोपाळ चांद्याकडे जात आहे आणि त्याच्याकडे फार

मोठमोठाले लोक भेटावयास येतात म्हणून पहात आहे. आमचे बाबा त्यांच्यांचपैकीं. आमच्या घरीं आईला ते सांगत असत कीं गोपाळ चांदे माझा मोठा स्नेही आहे; पण वस्तुतः तशी गोष्ट नव्हती. जे अनेक अधिकारी गोपाळ चांद्याकडे जात त्यातच आमचे बाबा. लांच देण्यासाठीं व ती लांच फलद्रूप करण्यासाठी गोपाळ चांद्याकडे जातों म्हणून ते आईला कसें सांगणार? म्हणून सांगत कीं, तो आमचा स्नेही आहे. गोपाळ चांदे यानें पैसा जरी सपाटून मिळविला आहे, तरी त्यानें आपल्या घरातला अरुंद काळोखी जिना देखील दुरुस्त केला नाहीं. जर तुम्हीं कधीं त्या जिन्यानें गेला, तर एखाद्या बड्या धेंडाबरोबर धक्काबुक्की व्हावयाची. नोकरी मिळाल्यानंतर देखील बड्या धेंडांनां गोपाळ चांद्याची गरज लागतेच. कोणाला बदली करून घ्यावयाची असली तर, कोणाला पेन्शन घ्यावें न लागून एक्स्टेन्शन मिळवावयाचें असलें किंवा कोणाला ज्या जागीं जम बसला असेल त्या जागेवरून हलूं न लागावें अशी इच्छा असेल तर त्यानें गोपाळ चांद्याची अवश्य भेट घ्यावी. नाहींतर त्याचें ह्या रियासतींत तरी वजन रहणार नाहीं. कांहीं दिवसापूर्वीं मला लोकांनीं असा सल्ला दिला कीं, भोंसले विजय मिल्सच्या डायरेक्टरामध्ये त्याचें नांव घालावें म्हणजे चीफ कमिशनरची व सरकारची कृपादृष्टि ह्या कंपनीवर राहील. तेव्हां, 'आपण डायरेक्टर होण्यास लागणारे शेअर घेण्यास तयार आहात काय?' म्हणून विचारण्याकरितां मी गोपाळ चांद्याकडे गेलों तेव्हां त्याची वागणूक कित्ता घेण्याजोगी आहे असें आढळून आलें. तो, कोणीहि मनुष्य आला तरी त्यास मोठ्या स्मित मुद्रेनें सत्कारितो; मी गेलों तेव्हां व्यवहाराचा प्रश्न पुढें आला तेव्हां त्यानें सरळ उत्तर दिलें कीं, कंपनीनें मला पांच हजारांचे शेअर फुकट द्यावे म्हणजे मी डायरेक्टर होईन, आणि हे जे शेअर द्यावयाचे ते सुद्धां साडेसात परसेंट प्रिफर्ड स्टॉकपैकीं द्यावेत; म्हणजे त्यास ३७५ रुपयांचें वर्षासन द्यावें आणि डायरेक्टरच्या मीटिंगबद्दलचें कमिशन होईल तें निराळेंच. असें केलें म्हणजे ते आम्हांस आंत येऊन नेहमीं मदत करतील, व गव्हर्नमेंट संबंधाच्या कांहीं अडचणी आल्या तर त्याहि पार पाडतील. त्या दिवशीं मला त्याच्या बोलण्याचा फार राग आल्यामुळें मी

तेथून निघून गेलों, तो जिन्यामध्यें मला वीरण्णा पंतलू भेटले. वीरण्णा पंतलूना मी तेथें दिसल्याबरोबर मोठा आनंद झाल्यासारखें वाटलें आणि ते म्हणाले, 'काय नानासाहेब तुम्ही तर फार सोंवळे, तुम्हीं येथें कसें ? काय मिल सोडून देणार काय ? आणि पुन्हां सरकारी नोकरींत शिरणार ? मला वाटलेंच होतें कीं त्या स्वदेशी मिलमध्यें कांहीं अर्थ नाहीं.' मला त्या वीरण्णाचा फार राग आला पण मी तो आत्मसंयमानें दाबून टाकला. मी त्याला सहज उत्तर दिलें कीं 'मी येथें पैसे घेण्याकरितां आलों आहे, देण्याकरितां नाहीं! तुमच्यासारख्यानीं गोपाळ चांदे यांना पैसे द्यावेत आणि माझ्यासारख्यानीं घ्यावेत.' मला जरी मनांत अत्यंत संताप आला होता तरी हे शब्द मी अत्यंत स्मितमुद्रेनें बोललों होतो."

× × ×

"काय ? मला ती इ. ए. सी. ची जागाहि नको आणि चीफ कमिशनरचा ५ हजार रुपये देणेंहि नको ? अरे निदान माझ्यासारखा मूर्खपणा तूं तरी करूं नकोस. पुष्कळसे पैसे न खाण्याचा बाणा बाळगणारे ऑफिसर आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत पस्तावतात, आणि खोट्या तत्त्वानीं उगाच आपल्याला बांधून घेतलें असें तें म्हणूं लागतात. पैसा न खाणाऱ्या कारकुनास किंवा सरकारी अधिकाऱ्यास स्वर्गलोकांत मान मिळत असेल, येथें मात्र मिळावयाचा नाहीं! येथें आजकाल तर अशी फॅशन झाली आहे कीं, प्रत्येक सरकारी नोकरानें इंग्रजी अमदानींत पैसे खाऊन गबर व्हावें, मालगुजारी गावें विकत घ्यावींत आणि बाता मात्र प्रामाणिकपणाच्या माराव्यात व आपणच मिळविलेली आपली श्रीमंती भोंसलेशाहीपासून किंवा पेशवाईपासून किंवा वाटल्यास ब्राह्मणी राज्यापासून आली आहे म्हणून सांगावें. परवां नागपूरला एक वऱ्हाडांतला वकील आला, त्याचा बाप झांशीला भाकऱ्या भाजीत होता. झांशीच्या राणीच्या विरुद्ध यानें हेरपणा चांगला केला म्हणून सर ह्यू रोझच्या कृपेनें त्याला वऱ्हाडांत नोकरी मिळाली. नोकरींत असतांना सपाटून पैसे खाऊन बरीच

इष्टेट पैदा केली आणि त्याचा हा लेक आता देशाभिमानाच्या गप्पा सांगत आहे; आणि आपल्या श्रीमंतीचा पेशवाईत झालेल्या मोठमोठ्या लढायांशीं संबंध लावीत आहे. आणि भोंवतालची मंडळीं देखील त्याला श्रीमंत हें उपपद लावीत आहेत. दुनिया आहे ती अशा प्रकारची. तूं आपला प्रामाणिकपणाचा मूर्खपणा कोठें घेऊन बसणार? अरे, मीच मोठ्या प्रामाणिकपणाचा डौल मारणारा, मला पैसेखाऊ मंडळीचा फार तिरस्कार, पण माझीच वृत्ति व्यवहारांत पडल्यापासून काय झाली आहे पहा!

ह्या पैसेखाऊ श्रीमंतांच्या घरीं मी जातो, त्यांनां त्यांच्या अंतःकरणांत असलेल्या स्वदेशीबद्दलच्या प्रेमाची मी फार तारीफ करतों, आपल्याला इंग्लंडबरोबर टक्कर कशी द्यावयाची आहे ह्याचें चित्र मी त्यांच्या पुढें रंगवितों, व त्यांच्याकडून हजार बाराशाचे शेअर घेण्याचें लेखी अभिवचन मिळालें म्हणजे तेथून उठतो. आणि त्याच्या देशाभिमानाची तारीफ मी आणखी दुसऱ्या दोघांजवळ करतो. परवा मला एक सबरजिस्ट्रार भेटला. ओळखीचाच आहे तो तुझ्यातो महालांत कोठीजवळ रहाणारा सोन्याबापूच तो. त्या सोन्याबापूची माहिती तुला चागलीच आहे-तो कशा प्रकारचा माणूस आहे. त्यालाहि पाचशे रुपयांचा शेअर घ्यावयाला लावलाच, आणि तो रस्त्यानें मला भेटला तर 'कसें काय बापुसाहेब?' म्हणून मी त्याला नमस्कार करतों, यावरून मी देखील कसा बिघडत किंवा सुधारत चाललों आहें हे तुझ्या लक्षांत येईल. पैसे खाण्याचें काम आणि लांच देण्याचें काम सगळे मोठे लोक करतात. त्या बन्सीलाल अबीरचंदाला विचारा ना कीं एखाद्या बॉयलर इन्स्पेक्टरला तो लवून सलाम करील किंवा नाहीं? बन्सीलाल अबीरचंद म्हणजे आपल्या मध्यप्रांत सरकारचा सावकार, चीफ कमीशनरच्या हिशोबाचें खातें त्याच्याकडे, व चीफ कमीशनरला मात्र त्याच्या ठेवीवर नऊ परसेंट व्याज. साहेब लोकांनां क्लब काढावयाचा झाला तर क्लबाला लागणारी रक्कम थोड्या व्याजानें बन्सीलाल द्यावयास तयार; पण इतका मोठा मनुष्य असून त्याला अगदीं सामान्य सरकारी अधिकाऱ्याला 'खूष' करावें लागत नाहीं काय? थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे पैसे खाऊं नयेत किंवा

चोरूं नयेत हें तत्वज्ञान व्यवहारशून्याकरितां आहे; व्यवहारज्ञाकरितां खास नाही."

× × × ×

" तूं बॅरिस्टर होऊन येणार तर आल्यानंतर तुझी मला फार मदत होईल. कायदा जाणणारा एखादा स्नेही असला आणि विशेषकरून डायरेक्टराच्या मंडळांत असला तर फार चागलें होईल. आमच्या डायरेक्टर मंडळींत कांहीं वकील आहेत. परंतु त्याची हुशारी व त्याची मुत्सद्देगिरी मॅनेजरला पगार फारसा कसा मिळूं नये, मॅनेजरला आपल्या पेंचांत कसा ठेवावा, मॅनेजरकडून एखादा गुन्हा होईल तर तोहि चागला, म्हणजे तो गुन्हा लोकाच्या नजरेस आणण्याचा धाक वारंवार दाखविता येईल असा विचार करणारी असते. गिरणीच्या मॅनेजरनें जें काम करावयाचे तें लोककल्याणाचें आहे, त्यात त्याच्या फायद्याचा लवलेश नसावा, फायद्याच्या विचाराने कार्याचे पावित्र्य कमी होते, आपल्या फायद्याकरिता त्याने गिरणी काढली असा लोकांकडून प्रवाद येऊं नये म्हणून केवळ गिरणीच्या मॅनेजरच्या कल्याणासाठीं व त्याच्या इभ्रतीचे रक्षण करण्यासाठीं त्यानें मुळींच पगार घेऊं नये आणि घ्यावयाचा असला तर अगदींच पोटापुरता—खाणावळ बाहेर पडण्याइतका—घ्यावा अशी तत्त्वें ते नेहमीं प्रतिपादित असतात. आणि त्याच्या त्या प्रतिपादनास कांहीं भागीदार मंडळी उत्तेजन देत असतात. येथील एक बडे वकील आमच्या बोर्डात डायरेक्टर आहेत; तें पुण्याला काहीं स्वार्थत्यागी मंडळीनीं कसलें एक कॉलेज काढलें आहे, त्याची तारीफ करीत असतात. पण त्या वकीलाना आपली उपवर मुलगी त्या कॉलेजातल्या एका-तरुण प्रोफेसरला देण्याचें धैर्य होत नाहीं. आणि त्या कॉलेजातल्या प्रोफेसराचें उदाहरण आम्हाला सागतात. एकदां क्लबांमध्ये त्या प्रोफेसरांची स्तुति त्यांच्या समक्ष हे वकीलजी करीत बसले होते तेव्हा मीं सरळ सागितलें की तुमच्यासारख्या मंडळींच्या स्तुतीनें हुरळून जातील इतके हे प्रोफेसर मूर्ख खास नाहींत. त्यानां हें ठाऊक आहे कीं ते जर आजारी पडले तर त्यांची तुमच्याप्रमाणेंच तारीफ करणारे हे डॉ. लटपटे ( शुक्रवार तलावाजवळ रहाणारे )

अगोदर पैसेवाल्यांची केस पहातील आणि तुमच्याकडे जावयाचे किंवा नाहीं ह्याचा सावकाश विचार करतील. भोळसर तरुण मंडळी पाहून त्याची स्तुति करावयाची आणि त्यांनां थोडक्या पगारांत काम करावयाला लावावयाचें ही वडील मंडळीची हुशारी ह्यांना अजिबात ठाऊक नाहीं असें नाहीं. पुण्याच्या स्वार्थ-त्यागाची कल्पना आपल्याकडेहि उत्पन्न होऊन येथेंहि आपल्या लोकानीं मॉरिस कॉलेज काढले परंतु नागपूरच्या मंडळींनां हा चतकोर भाकरीच्या गुलामगिरीचा मूर्खपणा लौकरच पटेल व तें कॉलेज सरकारच्या गळयांत बांधलें जाऊन येथल्या मंडळींच्या स्वार्थत्यागाचें थोतांड कमी होत जाणार आहे. परंतु तें थोतांड कॉलेजच्या कमिटीच्या डोक्यांतून निघून भोंसले विजय मिल्सच्या डायरेक्टरांच्या डोक्यांत शिरूं पहात आहे."

× × × ×

प्रकरण १३ वें

## इतिहाससंशोधक

रत्नपूर हे गांव विलासपूरपासून बारा मैलांवर आहे. याच्या भोंवतालीं टेकड्या आहेत आणि हें गाव मध्ये आहे. त्या टेकड्या इतक्या सभोंवताली आहेत कीं या गावांत असता आपण एक मोठ्या लाकडाच्या द्रोणांत तर नाहींना असा भास होतो. या गावांचें क्षेत्रफळ पंधरा चौरस मैल येईल. पण यावरून हें गांव आज फार मोठे आहे असें समजूं नये. जीं शहरें नष्ट होत आहेत, आणि तेथील सुंदर इमारती धुळीस मिळत आहेत त्यापैकींच हें एक आहे. हें शहर अनेक शतकें चालत आलेल्या रजपूत राज्याची राजधानी होतें. तथापि पुढें तें राज्य भोसल्याच्या वाढत्या साम्राज्यात विलीन झालें, आणि तें भोसल्यांचें साम्राज्य पुढें इंग्रजी साम्राज्यांत विरघळलें. या सर्व परिवर्तनाचें परिणाम रत्नपुरांत दिसून येतात. जीर्ण झालेल्या इमारती व इतर अवशेष १५ चौरस मैल पसरले आहेत. त्यांत शेंकडों तळीं अगर कुंडें आहेत. लहान कुंडे आणि मोठी तळीं यांची गोळाबेरीज केली तर तीनशेंवर भरतील, आणि लहान

तर नाहीं ना आली ? कदाचित् असेल, अशी कल्पना करून शारदाबाईनीं आपल्या पोलक्याच्या अस्तनींतून हातरुमाल काढला आणि ती वैजनाथशास्त्र्यास वारा घालूं लागली. वैजनाथशास्त्र्यास आपल्याला कोणीं वारा घालील हे किंवा कांहीं स्वाभाविक वारा चेहेऱ्यास स्पर्श करीत आहे याची जाणीव मुळीच नव्हती. वैजनाथशास्त्री तरी देखील निमीलितलोचनच होऊन राहिले. शास्त्रीबोवास भोंवळ आली असें वाटून शारदाबाईनीं "शास्त्रीबोवा" असे शब्द उच्चारून त्याच्या कपाळावर हात ठेवला.

शास्त्रीबोवा जणूं काय विजेचा धक्का बसल्याप्रमाणें जागे झाले आणि एकदम उठून बसले. अर्थात शारदाबाईनीं आपला हात काढून घेतला. तथापि त्याची स्थिति त्यावेळेस विचित्र झाली होती. त्याच्या अंगाला घाम आला, कंप सुटला आणि शरीरातील रक्तच जोरानें वाहूं लागलें एवढेंच नव्हे तर शरीराच्या मृण्मय परिमाणूंमध्येंच जोराची खळबळ चालली, आणि शरीरातील सप्तधातू एकमेकापासून वेगळे होत आहेत कीं काय असें वाटलें. तिचें मन संभ्रमित झालें. आणि मोठ्या प्रयत्नानें तिनें प्रश्न विचारला कीं, "आपल्याला भोंवळ आली होती काय ?"

"छे मी केवळ विचारात गढलों होतों. शारदे, ज्याअर्थी मला तूं गुरूच समजतेस त्या अर्थी तुला एकेरी नावानें संबोधावयास हरकत नाहींच. या सारख्या गहन विषयाची चर्चा आपण जरा अधिक स्वस्थतेनें करूं. आपल्या या रत्नपूर येथील उपनिषदाच्या पहिल्याच अध्यायात सर्व गोष्टींची विशेषतः गलितप्राण समाजातील व्यक्तींच्या आयुष्यहेतूंची चर्चा कशी होणार ? तुझ्या प्रश्नास उत्तर द्यावयाचें म्हणजे माझ्या मनात गढलेली विचारमाला अव्यक्त स्थितींतून व्यक्त स्थितींत आणावी लागणार."

"काय आपले कार्यध्येय अव्यक्त स्थितींत आहे आणि तसें असल्यास तें इतक्या परिश्रमाच्या कार्यास प्रवृत्त कसें करतें ?"

"शारदे, जें अव्यक्त आहे तें कार्यास प्रवृत्त कसें करील अशी तुला शंका वाटत आहे काय ? ब्रह्म हें अव्यक्त आहे तथापि ब्रह्मप्राप्तीसाठीं लोक धडपडतातच

ना? अगदीं अडाण्यापासून अत्यंत विद्वानापर्यंत सर्व लोक ब्रह्मप्राप्त्यर्थंच खटपटी करीत आहेत, आणि तो खटाटोप आज हजारों वर्षे अव्याहत चालला आहे. अव्यक्त, अक्षर आणि निराकार असें ब्रह्म सामान्यांस गोचर होण्यासाठीं मूर्तिरूपानें अगर ब्रह्मबोधक मनुष्यरूपानें अगर ग्रंथरूपानें व्यक्त व्हावें लागतें. जें खरोखर अव्यक्त आहे त्याची व्यक्त अशी प्रतिकृति खरोखरच आभासात्मक होय पण त्या आभासात्मक प्रतिकृतीची देखील आवश्यकता आहे. जगांतील ज्ञेयें दोन प्रकारचीं असतात; कांहीं केवळ मनोगोचर असतात. उदाहरणार्थ विचार, कल्पना इत्यादि. आणि कांहीं इंद्रियगोचर असतात. याला उदाहरण म्हणजे आपणास जे पदार्थ दिसतात ते सर्व होत. कमी अधिक प्रमाणानें पहिलें अव्यक्त आणि दुसरें व्यक्त असतें. व्यक्त हें समजण्यास अर्थात सोपें आणि अव्यक्त हें समजण्यास दुर्बोध असें असतें. आणि याचसाठीं अव्यक्त गोष्टी कल्पनेनें व्यक्त कराव्या लागतात. मूर्तिपूजा याचा अर्थ जे दूर आहे तें निकट आहे असें कल्पिणें, जें केवळ मनोगोचर आहे तें इंद्रियगोचर करणें, आणि जें कारणरूप आहे तें क्रियारूपाने जाणणें. जोंपर्यंत अव्यक्ताच्या कसें तरी करून व्यक्त बनविलेल्या स्वरूपांवर मनुष्यप्राणी संतुष्ट आहे तोंपर्यंत त्यास अडचण पडत नाहीं."

"तर तुम्ही देखील अव्यक्ताच्या कशा तरी रीतीनें व्यक्त बनलेल्या स्वरूपामुळेंच कार्यप्रवृत्त होतां ना? मला तरी तेंच पाहिजे."

शास्त्रीबोवांनीं तिच्या प्रश्नाची जाणीव न दाखवितां पुढें बोलण्यास सुरवात केली. "अव्यक्त गोष्टींच्या, मग त्या अव्यक्त गोष्टी ब्रह्म असो अगर लोककल्याणासारख्या कांहीं अंशीं व्यक्त आणि बऱ्याच अंशीं अव्यक्त अशा असोत, त्यांच्या व्यक्त बनविलेल्या स्वरूपाविषयीं भक्ति जडून गेली म्हणजे हृदयांची तळमळ सुरू होते. पुष्कळ प्रसंगीं कांहीं लोकांच्या बुद्धिविकासाप्रमाणें अधिक उज्ज्वल कल्पना लागते. ज्या गोष्टींपासून जनहित होते अशा अनेक गोष्टी असतात. तथापि जनहित म्हणजे काय असा प्रश्न केला म्हणजे उत्तर देणें कठिण असतें. असें जरी आहे तरी आत्मशिक्षण ज्यास घडवावयाचें असेल त्यास जनहितास अनुकूल असें चित्त बनवितां येणार नाहीं काय?"

" मला अव्यक्ताची साधना करतां येणार नाहीं. आणि अनंताशीं साधर्म्य संपादनहि करतां येणार नाहीं. मला आयुष्यक्रमण करावयास अधिक सोपा धर्म पाहिजे. "

" जें केवळ दृश्य असेल त्याचीच तुला साधना करतां येईल, असें आहे काय ? "

" कांहीं अंशीं तसेंच आहे. निदान ज्याची साधना करावयाची तो विषय कल्पनेस तरी शक्य नको काय ? "

" अर्थात हवा. तथापि कल्पनेस शक्य अशा अनेक अव्यक्त गोष्टी आहेत. तथापि प्रस्तुत व्यक्तीच्या कल्पनेस काय शक्य आहे आणि काय शक्य नाहीं हें प्रकृतिभेदानें ठरत असतें. मनुष्यें बुद्धीच्या दृष्टीने निरनिराळया पायऱ्यांवर आहेत. "

" मी कोणाच्या पायरीवर आहें हें माझें मला सांगतां येणार नाहीं. "

" शारदे, पुरुषाचें मन आणि स्त्रियांचें मन याविषयीं आपण जसजसा अधिकाधिक विचार करावा तसतसा त्यांच्यामध्यें अधिक भेद दिसून येतो. सर्वसामान्य विचार करून तत्वनिर्णय करणें हें काम जितकें पुरुषांस सुलभ होतें तितकें स्त्रियांस होत नाहीं. स्त्रियांचें केवळ बुद्धिगोचर बाबतीपेक्षां इंद्रियगोचर बाबतींत लक्ष अधिक दिसतें. इतिहासासारख्या बाबतींत संशोधन करून लेख अगर ग्रंथ लिहिणारामध्ये पाश्चात्य देशांत ज्याप्रमाणें पुरुष आहेत त्याप्रमाणें स्त्रिया देखील आहेत. तथापि या दोहोंच्या ग्रंथांचें अवलोकन केलें तर असें दिसून येईल कीं प्रगतीचे आणि ऐतिहासिक कार्यकारणाचे नियम लक्षांत घेऊन ऐतिहासिक वृत्ताचा अर्थ लावण्याच्या बाबतींत पुरुषांस जें यश येतें, तें स्त्रियांस येत नाहीं. स्त्रियाच्या ग्रंथांत मेहेनतीनें माहिती जमविलेली असते आणि त्यांचें लक्ष ऐतिहासिक पुरुषांच्या जीवितक्रमाकडे अधिक असतें. भावात्मक सृष्टीकडे व सामान्य नियमांकडे पुरुष अधिक वेधला जातो. आणि स्त्रीहि द्रव्यात्मक उर्फ अधिक व्यक्त अशा सृष्टीकडे वेधली जाते. विश्वसर्गवेत्त्या पुरुषांनीं

जगाची उत्पत्ति ही पुरुष आणि प्रकृति याच्या परस्परांवर होणाऱ्या परिणामानें होते असें लिहिलें आहे. स्त्री व पुरुष हीं खरोखर प्रकृति आणि पुरुष यामधील भेदाचींच उदाहरणें होत अशा अर्थाचा सिद्धांत आपल्या देशांतील तत्त्ववेत्त्यांनीं व कवींनीं गाइला आहे. भगवंतानीं गीतेच्या तेराव्या अध्यायांत म्हटलें आहे कीं

प्रकृतिं पुरुषंचैव विद्धयनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥

म्हणजे प्रकृति आणि पुरुष हीं दोन्ही अनादि आहेत असें समज. विकार आणि गुण हे सर्व प्रकृतीपासून उद्भवतात.

तथापि अज्ञानी लोक माझें म्हणजे पुरुषाचें उत्तम आणि अव्यय असें रूप न जाणतां अव्यक्त अशा मला म्हणजे पुरुषाला श्रेष्ठ झालेला मानितात

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।

तथापि परमेश्वराचें रूप आपणांस व्यक्त होतें ते प्रकृतीमुळें होतें. "

" पुरुष अव्यक्त असतो आणि त्याला प्रकृति ही व्यक्त अशा स्वरूपास आणिते, हा जर सिद्धांतच आहे तर मग मी आपणास देशकल्याणाच्या अगर दुसऱ्या कशाच्या कल्पना व्यक्त करावयास लावणें स्त्रीस्वभावास अनुसरून प्रकृतीचेंच कार्य करीत आहे. जें केवळ अव्यक्त आणि गूढ असेल तें न समजणारा जर आपण प्राकृतजन म्हणाल तर मग मीं देखील आपणांस प्राकृतजन म्हणवि-ण्यास तयार आहे. अव्यक्त स्थितींत संतुष्ट राहणारा पुरुष धर्म मला नको. मला व्यक्त ज्ञान पाहिजे. ' ब्रह्म ज्ञान नको मुनिवरा येईन कामास ते ' हेंच मी तुम्हांस म्हणणार ! "

" शारदे, प्रकृतीच्या संसर्गानें पुरुषास जर व्यक्त स्वरूप धारण करावें लागतें तर तुझ्या संसर्गानें मला माझ्या कल्पना व्यक्त करावयास का बरें लागूं नये ? "

" तर मग आतां स्पष्टपणें बोला. मी प्रकृति धर्माम प्रकृति धर्मानें आठदां गुणलें म्हणजे जे प्राकृतत्त्व उत्पन्न होईल तितकें माझ्या अंगीं आहे अशी

कल्पना करा व आयुष्यध्येय तितक्या प्राकृत भाषेत समजावून द्या. मला तत्त्वज्ञानाच्या जाड्या भाषेत बोललेलें कळत नाहीं. 'स्पिरिच्युअल' वगैरे शब्द भाषणांत आणूं नका. मला स्पिरिट म्हणजे काय तें समजत नाहीं आणि त्याला युअल मिळाला म्हणजे काय जिन्नस होतो तें त्याहून कळत नाहीं. मला स्पिरिच्युअल शब्दाची भीति फार वाटते "

"त कां ?"

"का म्हणजे त्याचा मला कांहींच अर्थ समजत नाहीं. आणि हा शब्द आपल्याकडील लोक वाटेल त्या गोष्टाचें समर्थन करण्यासाठीं वापरतात."

"तें कसें ?"

"नागपुरास असता मी एकदां स्त्रीधर्मावर व्याख्यान ऐकावयास गेले होतें त्यावेळेस तो व्याख्याता कोणी बंगालकडून आला होता आणि त्याचे व्याख्यान इंग्रजींत झालें; तें व्याख्यान बायकांनां समजून द्यावयाची आणि अध्यक्ष म्हणून भाषण करण्याची पाळी माझ्यावर आली. तेव्हां मोठीच पंचाईत झाली."

"ती कशी काय ?"

"व्याख्याता म्हणाला पूर्वेकडील देश 'स्पिरिच्युअल' आहेत व पश्चिमेकडील देश 'मटीरिअल' आहेत; त्यामुळें पश्चिमेकडील विवाहाची कल्पना शरीरसुख ही आहे आणि आपल्याकडील 'स्पिरिच्युअल' आहे. पाश्चात्य स्त्रियांना शरीरभोग हें ध्येय आहे आणि यासाठीं पश्चिमेकडे पुनर्विवाह रूढ आहे आणि पूर्वेकडे पुनर्विवाहाचा निषेध आहे."

"मग यांत वावगें काय सागितलें ?"

"सगळेंच वावगे सांगितलें."

"आपल्याकडील लोक शरीरभोगास कमी महत्त्व देत असते, तर विचार करणाऱ्या ब्राह्मण मंडळींनीं ब्राह्मणास दान करण्याचें महत्त्व कशासाठीं गाईलें ? व समाजांत आपलें उच्चत्त्व तरी कशासाठीं स्थापन केलें ?"

" अशासाठीं कीं पैसा आणि अधिकार यापेक्षा विद्वत्तेस अधिक मान रहावा यासाठीं. "

" कांहीं असो, त्या गृहस्थास मी स्पिरिच्युअल याला संस्कृत शब्द काय म्हणून प्रश्न केला तो कांहीं त्याला सांगता आला नाहीं. "

" मग तुम्ही तें व्याख्यान श्रायकानां समजावून देताना कसे भाषांतर केलें ? "

" मी एवढेंच सांगितलें कीं, पाश्चात्यांचे लक्ष संपत्ति व शरीरसुख यांकडे आहे आणि पूर्वेकडे या गोष्टीविषयीं अनास्था आहे. "

" झालें, मग भाषांतर तर बरोबर केलें आहे—

एकांतविध्वंसिषु मद्विधानां ।
पिंडेष्वनास्था खलु भौतिकेषु ॥

या ओळी तुमच्या परिचयाच्या असतीलच. तुम्ही ' अनास्था ' शब्द बरोबर वापरला. "

" मुळींच नाही ! अनास्था हा सद्गुण आहे काय ? त्या व्याख्यात्याच्या मते ' मटीरिअल ' पेक्षा ' स्पिरिच्युअल ' ही कांहीं चागली चीज आहे. अनास्था हा अभावात्मक शब्द आहे. व्याख्याता स्पिरिच्युअल म्हणजे कांहीं भावात्मक चीज समजतो. आपल्याकडे भौतिक पिंडाविषयीं अनास्था आहे हें खरें पण आस्था कशाविषयीं आहे तें सांगा ? आस्था भौतिक गोष्टीविषयींहि नाहीं आणि मानसिक गोष्टींविषयींहि नाही. "

" अगदीं खरें आहे तुझे अवलोकन. आपले लोक म्हणजे अगदी नीग्रोच्या पलीकडचे आहेत. पूर्व स्पिरिच्युअल यामध्यें मुसुलमान येतात काय म्हणून प्रश्न विचारला तर उत्तर द्यावयास पंचाईतच पडेल. आपल्या लोकांनां आपल्या सर्व तऱ्हेनें निकृष्ट स्थितींत आपण कशांत तरी वर आहों म्हणून तर कोणी पाश्चात्यांनीं सागितले तर त्यावर आपल्या लोकांचा विश्वास पक्का बसतो. आपले लोक तत्त्वज्ञानी म्हणून त्याचा मतलबी पाश्चात्य गौरव करतात. आणि

तें ऐकून आपला ब्रामण खूष होतो. ज्या लोकांना भौतिक शास्त्रें ठाऊक नाहींत त्या लोकाना सर्व शास्त्रामागें असलेलें तत्त्वज्ञान कसें समजणार ? गाढव लेकाचे फिलॉसफी शिकवताहेत कॉलेजांतून ; हे सर्व फिलॉसफीचे प्रोफेसर कोणत्याहि भौतिक शास्त्राचा अभ्यास न करता फिलॅासफी शिकविणार. अगदीं जवळच्या झाडाला टांगून फाशी देऊन टाकावेत. लोकाना क्यांट आणि स्पिनोझा याची नावे घेऊन गप्पा मारायला पाहिजेत. ”

“ मग तुम्ही फारशा गूढ वाक्यात न शिरतां आयुष्यहेतूंविषयीं जे काय सागावयाचें असेल तें सागा. ”

“ तुझा मुक्काम येथें किती दिवस आहे ? ”

“ उद्या तरी मीं येथे आहे, रायपुरास सध्यां असतें. आपले येथील काम झालें म्हुणजे आपण रायपुरास यावें. येथें जर आपले बोलणें संपलें नाहीं तर आपण तेथे संपवूं. ”

“ उद्या आपण काहींतरी येथे बोलूंच. ”

“ ठीक आहे. आपणांस आणखी एक विनंति आहे. ”

“ ती कोणती ? ”

“ आपण आज संध्याकाळीं आणि उद्यां सकाळीं आमच्याकडेच जेवावयास यावे. आमच्याकडे स्वैपाकाला ब्राह्मण आणि इतर कामाला कारकून आहेच. ”

“ ठीक आहे. ”

---

## प्रकरण १५ वें

# गोंडवनांतील दुसरें आरण्यक

संध्याकाळीं वैजनाथशास्त्री जेवावयाला आला होता. दोघा गोंड राजकन्यांची व्यवस्था व परिवार निराळा होता. बिंबाबाईकडे वैजनाथशास्त्री

जेवावयास गेले, आणि भोजनोत्तर आपलें सामान त्यानीं ज्या इमारतींत ठेविलें होतें तेथें निजावयास गेलें. शारदाबाईनीं आपल्याबरोबर आणलेल्या नोकराच्या हातीं कंदील देऊन आणि बरोबर एक मेणबत्ती देखील देऊन पाठविलें. रात्रीं बिंबाबाई आणि शारदाबाई या एका खोलींत निजावयास गेल्या. वैजनाथशास्त्री यानीं निजावयाच्या अगोदर शारदाबाईस, उद्यां सकाळीं मीं येईन म्हणून सागून ठेविलें होतें.

शारदाबाई आणि बिंबाबाई यांच्यामध्यें गुरुशिष्येचें नातें दिवसानुदिवस कमी होत जाऊन सख्याचें नातें उत्पन्न होऊं लागलें. बिंबाबाई शारदाबाईपाशीं विनोदानें "आपण आता पुनर्विवाह केव्हां करणार, तो करणार तरी कोणाच्या-बरोबर, आपणांस कोण डॉक्टर, प्रोफेसर की वकील पाहिजे तरी कोण, आपण पुन्हां लग्न करणार तें कोकणस्थाशींच करणार कीं देशस्थ चालेल, कोणी बंगाली चालेल की नाहीं" इत्यादि अनेक प्रश्न विचारून शारदाबाईस कधीं कधीं चिडविण्यासहि कमी करीत नसे. वर्तमानपत्रांतून कोणा कांग्रेसवाल्या बड्या पुढाऱ्याची बायको मेल्याचें वाचलें म्हणजे 'आतां तुम्हीं आपलें जाळें त्याच्या-वर टाका' असेंहि म्हणावयास कमी करीत नसे. दोघी बायका आपसांत बोलत बसल्या म्हणजे काय बोलतील आणि काय नाहीं !! पुरुषांसमक्ष बोलतांना इतक्या लाजतील, आपल्याला कांहीं एक समजत नाहीं अशा प्रतारणा करतील पण आपापसांत बोलावयाला लागल्या म्हणजे त्या काय बोलतील त्याला सुमार नाहीं ! बायकाबायकांतच असल्या म्हणजे किती चहाटळ आणि घाणेरडे बोलत बसतात हें ज्यांस चोरून ऐकण्याची संधि आली असेल त्यास सहज कळून येईल कीं, त्यांच्या घाणेरड्या बोलण्यापुढें वकीलांच्या खोलीतलें घाणेरडें बोलणें म्हणजे कांहींच नाहीं ! शारदाबाईची स्वाभाविकपणें वृत्ति गंभीर होती आणि त्या बायकांबरोबर गप्पा मारीत न बसतां बहुधा पुरुषमंडळीबरोबरच ती गप्पा मारीत बसे. कारण तिला, बायकांतल्या स्पर्धा, त्यांचे एकमेकीसंबंधाचें उणें बोलणें, याविषयीं कंटाळा येई. तिच्या वृत्तीचा पुरुष असला तर त्यास भोंवतालच्या पुरुषांच्या गटारगप्पांचा कंटाळाच आला असता. तथापि शारदेस

पुरुषाचा गटारगप्पांचा कंटाळा येत नसे आणि त्यांचे मुख्य कारण तिच्यासमक्ष पुरुष गटारगप्पा न काढतां महत्त्वाच्या वाङ्मयविषयक आणि सार्वजनिक गोष्टीच बोलत असत. ज्या पुरुषांशीं ती बोले ते बायकापेक्षांहि अधिक उच्च अभिरुचीचे होते अशातला भाग नाहीं.

आज बिबाबाईस शारदाबाईशीं खूप बोलावयाचे होते. मोलकरणीनीं टाकलेल्या अंथरुणावर शारदाबाईनीं पाठ टेकल्यानंतर निजलेल्या प्रभाकराचें चुंबन घेऊन बिबाबाई शारदाबाईच्याच अंथरुणावर पडल्या.

" काय बाई, आपण त्या गृहस्थाशीं बोलत होतां ? बराच वेळ बोलत होता. मध्यें मला वाटलें कीं, आपणास मध्यें येऊन भेटावें, पण म्हटलें दोघामध्यें आम्हीं कशाला ? त्या दोघी राजकन्यास तर आपणांस अत्यंत शिष्टतेच्या गोष्टी सागणाऱ्या मास्तरीणबाई कोणी नवख्या गृहस्थापाशीं बोलत आहेत हें पाहून बरीच मौज वाटली. कोण हे गृहस्थ आहेत कोण जाणे ! का कोणी सावज पकडण्याचा विचार चालवला आहे वाटतं ? " बिबाबाई बिछान्यावर पडतां पडतां शारदाबाईस म्हणाल्या.

शारदा थोड्याबहुत अंशी काहीं विचारांत गढली असल्यामुळें तिनें ताबडतोब बिबाबाईच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं तेव्हां बिबाबाई अधिक जोर येऊन म्हणाल्या " का आमच्या बोलण्याकडे लक्ष देखील नाहीं तर आपण आज कोणत्या विचारांत आणि आनंदांत गर्क झाला आहां ? "

" काय, मला बोलतेस तूं ? होय, या गृहस्थाविषयीं विचारतेस तो मोठा प्रसिद्ध विद्वान मनुष्य आहे. "

" मग आपला काय विचार आहे ? "

" आज आमचें बरेंच संभाषण झालें आणि पुढें उद्यां होणार आहे. "

" हें कशाबद्दल ? "

" या गृहस्थाचें मन जरा विचित्र आहे. तें फारच गूढ आहे असें दिसतें. तें गूढ उकलण्याचा माझा विचार आहे. "

" पण इतका खटाटोप कां ? जगात पुष्कळ लोक आपलीं मनें गूढ ठेवूं इच्छितील. आपण प्रत्येकाची तपासणी करीत बसणार काय ? हा गृहस्थ आपल्या फारसा परिचयाचा नाहीं किंवा याच्याशीं आपण स दररोज प्रसंग पडेल अशांतला भाग नाहीं, तर याच्याविषयीं आपणास जिज्ञासा का ? "

" तुला काय सांगूं ? बिंबा, हा गृहस्थ फार मोठा आणि थोर आहे; तसाच तो परोपकारी, जातीचा आणि देशाचा अभिमानी आहे. सरकारच्या अगर लोकांच्या आश्रयाची पर्वा न करतां यानें आपलें ग्रंथलेखनाचें कार्य चालविलें आहे. हा गृहस्थ मोठा ऋषितुल्य आणि खरा संन्यासी आहे असा याचा लोकांत बोलवा आहे. जन्मभर मेहेनत करण्यास याला उत्तेजन तरी कशानें येते हें मला गूढ आहे. सतत काम करीत रहाणें हेंच संन्यासधर्माचें बीज मी समजतें. कारण सततोद्योगी मनुष्याखेरीज करून दुसऱ्या कोणी मनुष्यास या प्रकारची विदेही स्थिति यावयाची नाहीं. "

" बरं मग, एका विलक्षण मनुष्याचें मन समजून घ्यावें एवढाच आपला आपला हेतु आहे काय ? "

" का बरं, दुसरा कोणता हेतु असणार ? "

" या गृहस्थावर आपले विशेष मन वेधले असावें असें दिसते. "

" विशेष म्हणजे काय ? "

" काय बाई, तुम्ही माझ्यापेक्षां मोठ्या; तुम्हांला मी काय सांगणार ! "

" तुझ्या मनांत काय आहे ? "

" मला असें वाटतें कीं, बायकांचें पुरुषांवर जसें मन वेधतें तसें या गृहस्थावर आपलें मन वेधलें आहे. "

" छे, तसें मुळींच नाहीं. "

" तर मग काय या गृहस्थाविषयी आपण फार उदासीन आहांत ! केवळ एक विचित्र पुतळा आहे तर त्याचा विचित्रपणा चांगला समजून घ्यावा एवढाच हेतु आहे ! "

"हो जवळ जवळ एवढाच."

"पहा हो, तुम्हीं कांहीं तरी बोलतां हो! त्या गृहस्थापाशीं जितका भाषणप्रसंग अधिक होईल तितका चांगला, त्या गृहस्थाच्या आपण कांहीं थोडे बहुत उपयोगी पडावें, त्याच्या सुखदुःखाकडे लक्ष द्यावें, इत्यादि गोष्टींकडे आपलें लक्ष आहे कीं नाहीं? कां कोणी बुद्धीच्या पर्वताचा सर्व भाग बारकाईने पाहून घ्यावा एवढाच हेतु आहे? त्याच्याविषयीं मनात दुसरा भाव नाहीं काय?"

"मोठा विद्वान आहे तेव्हां त्याच्याविषयीं आदर असणें स्वाभाविक आहे."

"तर मग आपण जेव्हां त्यानां वारा घातला आणि त्यांच्या कपाळावर हात ठेवला तेव्हां आपणांस कांहीं एक वाटलें नाहीं? एखाद्या हॉस्पिटलमधल्या रोग्याच्या कपाळाला आपण जेव्हां हात लावतां तेव्हां जसें आपणांस वाटते तसेंच या वेळेस वाटलें?"

शारदाबाईस या प्रश्नानें थोडीबहुत जागृति झाल्यासारखें वाटलें. आणि आपल्या अंतःकरणांत कोणत्या भावना असतील याविषयींचा विचार उत्पन्न होऊं लागला. तथापि आपल्या मनांत प्रस्तुत गृहस्थाविषयीं आदराशिवाय अन्य विचार असेल असें त्याचें मन म्हणण्यास तयार होईना. उलट मन सांगूं लागलें कीं, आदराशिवाय दुसरा कोणता तरी विचार होता हें कबूल देखील करूं नये.

"काय ग चिंबा, मी त्यांच्या कपाळावर हात ठेवला तें तूं पाहिलंस?"

"उघडच आहे. आणि मला असें वाटलें की त्या अडाणी गोंड राज-कन्यांनां हें दिसू नये, आणि ब्राह्मण बाईविरुद्ध त्यांनीं कांहीं बोलूं नये म्हणून मी दुसऱ्याच बाजूनें फिरावयास गेलें."

"त्या गृहस्थाच्या कपाळावर मी हात ठेवला होता. मला वाटलें कीं मीं चपापलें एवढेंच."

" प्रारंभ असाच होतो. "

" कसचा प्रारंभ ? "

" एखाद्या पुरुषाविषयीं प्रेम उत्पन्न होणाचा. प्रथमतः आदर अगर आवड, थोड्याश्या प्रसंगीं भय पण शेवटीं प्रेम. "

" बिंबा ! "

" काय बाई ? "

" मलाच तूं शिकावयास लागलीस. तूं कालची मिच्याएवढाली पोर ! "

" असेन कदाचित, पण प्रेमाच्या बाबतींत मी आपणाइतकी नवखी नाहीं. "

" मला त्या गृहस्थाविषयीं जिज्ञासा आणि आदर आहे, प्रेम नाही. "

" पण प्रेम पुढें उत्पन्न होण्याची आगाऊ चिन्हें दिसत आहेत. "

येणेंप्रमाणें शारदाबाईचा बिंबाबाईशीं संवाद चालला होता. पुढें मला आतां झोंप येते असें म्हणून शारदाबाईनीं बोलणें बंद केलें. तथापि वैजनाथ-शास्त्र्यांची मूर्ति त्यांच्या डोळयापुढें मात्र स्थिर झाली आणि स्वप्नांत वैजनाथ-शास्त्री पुन्हां दिसले. निरनिराळे देखावे निरनिराळ्या स्वप्नात आले. एका स्वप्नांत दिसलें की वैजनाथशास्त्री आणि आपण स्वच्छंदानें फिरावयास जात आहोंत; दुसऱ्या स्वप्नांत दिसलें कीं, वैजनाथशास्त्री ग्रंथ सागत बसले आहेत आणि आपण त्यांचें ' विश्वंभरबोवाप्रमाणें लेखकू ' जाहलों आहोंत. ही सर्व कार्ये करतांना आपणांस मोठा आनंद झाला आहे असें वाटलें आणि जन्मभर आपण हेंच काम करीत बसलों तर आपल्या आयुष्यास दिशा लागेल कीं नाहीं आणि आपण जन्मभर आनंदांत राहूं कीं नाहीं असे प्रश्न मधून मधून निद्रेत येऊं लागले. येणेंप्रमाणें अनेक कल्पनाचित्रें आमच्या शारदाबाईच्या डोळयासमोरून जाऊं लागली. शारदाबाईची झोंप स्वप्नानीं थोडीशी बिघडविली होती ; तथापि स्वप्नें चांगलीं पडलीं असलीं म्हणजे लहान मुलांचा चेहरा सकाळीं जसा प्रफुल्लित झालेला दिसतो तसा तिचाहि दुसऱ्या दिवशीं सकाळीं दिसत होता. तिनें सकाळीं फराळाचें सामान काढून ठेवलें आणि गड्यामार्फत आपण फराळाला या असा

निरोप पाठविला. वैजनाथशास्त्री आले तेव्हां लाडू तिनें पुढें केले आणि स्टोव्हवर सकाळची एक ताजी दशमी करून घातली आणि तूप वाढलें. अर्थात या प्रकारचें स्वागत वैजनाथशास्त्री जरी संन्यस्ताचरणी होते तरी त्यांस आवडलें नाहीं असें नाहीं. इंग्लंडमध्ये म्हातारीकडून तरुणीस अशा परंपरेनें हजारों आयुष्याच्या वर्षांचा एक फारच मौल्यवान उपदेश आहे, तो आजकालचे पाश्चात्य तत्त्ववेत्ते ज्या स्त्रियांची लग्न होण्याची संधी शिक्षणामुळें कमी होत आहे अशा तरुणींपुढें ठेवतात, आणि तो उपदेश अर्वाचीन व स्वतः सुशिक्षित आपण आहोत म्हणून ज्यांस भास होतो अशा सर्व तरुणींनीं लक्षात ठेवण्यासारखा आहे अशी आम्ही शिफारस करतों. तो उपदेश म्हटला म्हणजे, "पुरुषाच्या अंतःकरणाच्या अगदी जवळची जागा म्हणजे त्याचे पोट होय. तें संतुष्ट करा म्हणजे अंतःकरण काबीज कराल." सकाळच्या प्रहरीं ताजी ताजी दशमी, लोणच्याच्या फोडी, तूप आणि लाडू पोटांत गेल्यानें वैजनाथशास्त्र्यास देखील बरें वाटलें. आणि सकाळीं आणखी कांहीं काम करण्यास त्यास हुरूप आला. आपण मेहनत करीत असता आपल्या जेवणाची अशी जर सोय होईल तर किती बरें होईल, असा विचार क्षणभर त्यांच्या मनांत आला, पण छे! असला सुखाभिलाषेच्या अपवित्र विचार कडकडीत आचरणाचे वैजनाथशास्त्री आपल्या डोक्यांत कसा राहूं देणार? बरें झालें शारदाबाई आणि इतर मंडळी जवळ होती म्हणून. नाहीं तर वैजनाथशास्त्री यानीं असल्या अधम सुखेच्छेबद्दल स्वतःच्या पन्नास थोबाडींत मारून घेतल्या असल्या.

फराळ आटोपला तेव्हां नुकताच सूर्योदय झाला होता. आणि या वेळेस ही वेळ फिरावयास जाण्यास चांगली आहे असे वैजनाथशास्त्र्यास वाटून त्यानीं 'चला, आपण आणखी कांहीं अवशेष पाहूं आणि कालच्या उरलेल्या गप्पा मारूं' असें शारदाबाईस सुचविले. शारदाबाई तर अशाच सूचनेची वाट पहात होती. शारदाबाई अंगावर शाल घेत आहेत असें पाहून बिंबाबाईनें 'मी येऊं का तुमच्याबरोबर फिरायला?' असा प्रश्न केला. आणि शारदाबाईची संभ्रमित मुखचर्या पाहून म्हणाल्या,

" बरं आहे ; मी तुमच्याबरोबर येत नाहीं, मी कशाला तिथें गर्दी करायला ? "

" तुला येऊं नको असें कोण म्हणते आहे ? मी पाहिजे तर वैजनाथ-शास्त्र्यास विचारून येते. तथापि मला अशी शंका वाटतें कीं त्यांच्या सर्व संशोधनानें आणि विद्वत्तेने भरलेलें बोलणें तुला कंटाळवाणे वाटेल. माझी काहीं ना नाहीं. "

" येऊं नको असं म्हणण्याचा हा दुसरा प्रकार आहे झालं. "

" का बरं, मी कोठें असं म्हटलं ? "

" म्हटलं नाहीं पण मी ओळखतें. आपण खरं सांगा कीं त्या शास्त्री-बोवापाशीं आपण एकट्या बोलत असता तर आपणास बर वाटेल कीं, मी बरोबर असले तर बरं वाटेल ? खरं बोला. "

" खरं बोलायचं म्हटलं म्हणजे मी एकटी त्यांच्याबरोबर असले तर मला बरं वाटेल. कां कीं मी एकटीच बरोबर असलें म्हणजे त्याना जें काय बोलावयाचे ते ते स्पष्टपणानें बोलतील. "

" तुम्हीं त्याच्याबरोबर एकट्या असलां म्हणजे बरें वाटेल, एवढंच मला पाहिजे होतं. मीं कारण कोठे विचारले होतं ? पण कारण आपण होऊनच सागतां. त्यानां जे काय आपणांशीं बोलावयाचं ते आपण एकट्या असलां म्हणजें ते मन मोकळें करून बोलतील. एका भेटींत इतक्या थरापर्यंत गोष्ट जाईल असें मला वाटलं नव्हतें. "

" काय चहाटळ झाली आहेस ! " असे म्हणून आमच्या शारदाबाई बाहेर पडल्या.

शारदाबाई आणि वैजनाथशास्त्री हीं दोघेजणें जरा बाहेर गेल्यानंतर वैजनाथशास्त्री म्हणाले, " काय शारदे, तुझ्या आयुष्याला हेतु पाहिजे आहे नाहीं आणि सध्यां ज्या अर्थी कोणतेंहि कार्य फलप्रद होत नाहीं त्या अर्थी दुसऱ्या कोणाच्या आयुष्याला हेतु उत्पन्न कसा होतो, आणि तो कार्यास प्रवृत्त कसा होतो

हें समजावयास पाहिजे ? आणि ज्या गोष्टी दुसऱ्यास आयुष्यहेतु उत्पन्न करतात त्याअर्थी त्या आपल्याहि आयुष्यास हेतु उत्पन्न का करणार नाहींत? त्या आपल्याहि आयुष्यास हेतु उत्पन्न करून देऊं शकतील. अशीच तुझी विचार-मालिका नाहीं ? "

" होय अगदी अशीच. "

" शारदाबाई, तुला थोडक्यात सांगतो ऐक. आपण आजचा काल सोडून जरा पन्नास अगर शंभर वर्षांच्या पूर्वीचा काल घेऊं. समाजातील चातुर्वर्ण्य हें लोकनिःश्रेयसार्थ आहे ही कल्पना मनीं दृढ धरून पूर्वी तिच्यावर विश्वास ठेवून ब्राह्मण आपल्या वर्णाचें ब्रह्मकर्म आनंदानें आणि कर्तव्य समजून भक्तीनें करीत होते ना ? ते तसें करीत होते याचें कारण त्याची धर्मवाक्यावर भक्ति होती आणि भक्तीमुळें ते कार्याला प्रवृत्त होत होते नाहीं काय ? प्रत्येक ब्राह्मणांस लोकनिश्रेयस उर्फ लोककल्याण म्हणजे काय याची खात्री नसे तथापि त्यांच्या मनात संदेह उत्पन्न झाला असता म्हणजे त्याची स्ववर्णाच्या कर्तव्याविषयीं श्रद्धा नष्ट झाली असती. आतां तुमची थोडीबहुत आपल्या अमुक करण्याचा उपयोग काय अशी कल्पना मनात येऊन कर्तव्याविषयी संदेह उत्पन्न होत आहे काय ? "

" होय. "

" तर आता आपण असें पाहूं कीं, कोणते भावी कल्याण आपणांस कर्तव्यमय करील, आणि तें पाहण्यासाठीं आतां आपण असा विचार करूं कीं, आपणांस आधिभौतिक कर्तव्यध्येय पाहिजे कीं पारलौकिक कर्तव्यध्येय पाहिजे ? "

" मला ऐहिक कर्तव्यासंबंधाचें ध्येय असे पाहिजे कीं, जें कार्य मी करीन त्यापासून ऐहिक कोणतें तरी कल्याण होईल. "

" तुम्ही सध्यां काय शिक्षकाचें काम करीत आहां नाहीं ? "

" होय हा लोकापवाद आहे खरा. मी काय शिकवितें, त्याचा हेतु काय, त्यापासून मझ्या शिष्यिणींचें काय कल्याण मी करतें तें मला समजत नाहीं. "

" धर्मासंबंधाचें अनेक विभाग करतां येतील. मनुष्य चातुर्वर्ण्यातील कोणत्यातरी वर्णाचें कार्य करीत राहणारच. बायकांची गोष्ट पाहता चातुर्वर्ण्यातील ज्या वर्णांत ती समाविष्ट झाली असेल त्या वर्णाचें आणि त्याबरोबर त्या वर्गाच्या स्त्रीचे कर्तव्यकर्म तिला करावें लागतें: उदाहरणार्थ, ब्राह्मण वर्णाची स्त्री असली तर ब्राह्मण वर्णाचें कार्य करण्यास पुरुषास समर्थ करणें हें बायकांचें काम. क्षत्रिय वर्णाची स्त्री असेल तर तिला राज्यरक्षणादि कामें करून क्षत्रियाचेंच काम करावें लागतें. येणेंप्रमाणें धर्मशास्त्रसंमत स्त्रियांच्या कर्तव्याची दिशा आणि मर्यादा आहे. "

" धर्मशास्त्रांतर्गत स्त्रीधर्म मी वाचला पण त्यानें माझें चांगले समाधान झाले नाहीं. कारण धर्मशास्त्रांत पत्नींची कर्तव्यें विशेष विस्तारानें दिली असतात. त्यांत स्त्रियांनीं पतीची सेवा करीत जावी, आणि गृहकृत्यें कशीं करावीं इत्यादिकांचेच विवेचन केलें असतें. कुमारीस अगर विधवांस जो धर्म धर्मशास्त्रकारांनीं सागितला आहे तो वाचून मला तें ज्ञान फारच कोतें असें वाटलें. मला असें वाटतें कीं धर्मशास्त्रकारांनीं स्त्रियांच्या मनाचा अधिक सूक्ष्म रीतीनें अभ्यास करावयास पाहिजे होता. स्त्रियांच्या मनाविषयीं धर्मशास्त्रकारांनीं जीं अनेक मतें दिलीं आहेत त्यांतील कांहीं फार मार्मिक आहेत पण ती बरीच अपुरी आहेत असें मला वाटतें. कुमारी आणि गतभर्तृका यांच्या धर्मासंबंधानें फारसें विवेचन नाहीं. कुमारी फारशा त्या काळीं नसतील पण मजसारख्या विधवा तर असतील ना ? त्यांच्यासंबंधानें धर्मशास्त्रकारांचा उपदेश काय ? तर नवऱ्याचें नामस्मरण करून काल कंठावा ; आणि सर्व प्रकारें देहदंडन करण्यासाठीं व्रतें उपवास इत्यादी गोष्टीहि त्यांस सांगितल्या आहेत. पुनर्विवाहासाठीं सतृष्ण रहाण्यापेक्षां आणि पुरुष संपादन करण्यासाठीं पुन्हां पुन्हां झटके खाऊन स्वतःच्या आयुष्याचा अंधःकार करून घेण्यापेक्षा संन्यस्त वृत्तीचें ध्येय वाईट आहे असें मीं कधीं म्हणणार नाहीं. पाश्चात्य देशांत मुलगी विधवा झाली म्हणून लग्नास उमेदवार म्हणून तयारच, त्यामुळें मनास शांति मिळेल अशातलाहि भाग नाहीं. धर्मशास्त्रकारांशीं येथपर्यंत येण्यास मी तयार आहे,

तथापि मजसारख्या बुद्धिभेद झालेल्या मंदभगिनीस अमर्याद व निर्हेतुक शरीरदंडनाचें ध्येय बजावणें शक्य नाहीं. नवरा देव आहे हे कबूल करूं, तथापि मनाच्या कल्पनाशक्तीस देखील मर्यादा आहे. पुष्कळ आज अशा विधवा आहेत कीं, ज्यांस नवऱ्याचा कोणत्याहि दृष्टीनें परिचय नाहीं. 'कुर्यात् सदा मंगलम्' म्हणून अंतःपट काढून घेतल्यानंतर नवऱ्याचें तोंड दिसलें तेंच शेवटचे अशी देखील कांहींची स्थिति आहे. अहो, दगडावर देखील भक्ति जडेल, आणि दगडावर शेंदूर फासला म्हणजे त्याला मारुती अगर म्हसोबा समजून देखील काहीं लोकाना तो साधनरूप होईल. पण जो मुलगा केवळ पंधरा सोळा वर्षांचा असतांना एकदां पाहिला, आणि आज ज्याची आठवण केली असतां तो पुरुष न दिसता पुन्हां पंधरा सोळा वर्षांचाच असेल अशी कल्पना येते, आणि ज्याच्या गुणदोषाविषयीं कांहींच माहीत नाहीं त्यास दैवत समजून त्याच्या नामस्मरणात काळ कसा घालवावा? भक्ति ही गुणाधिक्या-शिवाय उत्पन्न होत नाहीं. जेव्हां नवऱ्याचे स्वरुपच कल्पावयाचें असतें तेव्हां मृतपतींच्या ठायीं देवाला साचतील असेहि गुण कल्पावयाचेच असतात. इतकी अचाट कल्पनाशक्ति कोणत्या बरें स्त्रीच्या वाट्यास आली आहे? विधवांस साजेल असा धर्म कोणता याला अर्वाचीन सुधारक देखील उत्तर देत नाहींत. ते म्हणणार पुनर्विवाह करा. पण पुनर्विवाह ही गोष्ट सोपी नाहीं, आणि पुनर्विवाह हें, विधवांस धर्म कोणता या प्रश्नास उत्तर नाहीं. विवाह पुनर्विवाहांची वाढ होण्याची शक्यता नसतां केवळ पुनर्विवाहाची लालसा आज उत्पन्न करून सुधारकांनीं स्त्रियांचें मोठें नुकसान केलें आहे असें मला वाटतें."

"तें कसें?" वैजनाथशास्त्री खिशांतील विडी काढीत काढीत म्हणाले.

"कांहीं विशिष्ट सामाजिक कारणांमुळें पुनर्विवाह फारसे होणारच नाहींत आणि फारसें पुनर्विवाह होणें शक्य नसता समाजांतील विधवांच्या मनांत पुनर्विवाहाची तृषा जागृत करून देणें हा अधर्म होय!"

"पुनर्विवाह करावा असा उपदेश स्त्रियांस कोणी करीत नाहीं, पुरुषांस करतात."

" पण त्याबरोबर नायकांनां दुसरें लग्न करण्याचा अधिकार आहे असें प्रतिपादन करतात. "

" असो. सुधारकांच्या बिनअकली बडबडी लक्षांत घेण्याचें फारसें प्रयोजन नाहीं. कारण हिंदुस्थानांत गाजलेले आणि गाजत असलेले सुधारक सर्व वस्तुस्थितीसंबंधानें अगदीं ज्ञानशून्य आहेत. त्याच्या वेड्या बडबडीकडे सुशिक्षितांनीं लक्ष तरी कां द्यावें ? आपला विषय विधवांचें आयुष्यध्येय हा होता."

" होय, मला एवढेंच विचारावयाचें कीं, विधवांस कार्यक्षेत्र काय ? "

" ज्याप्रमाणें पाश्चात्य देशातील विधवास अगर मठवासिनींस रुग्णशुश्रुषा इत्यादि कार्यक्षेत्रें आहेत त्याप्रमाणें इकडे नाहीत काय ? "

" ज्या लोकांविषयीं आपली सहानुभूति असते त्याविषयीं आपण अधिक खटपटतों ; संस्थामध्यें जाऊन डॉक्टरच्या हाताखालीं काम करण्यापेक्षां प्रत्येकीनें आपले मित्र, आप्त आणि नातेवाईक याच्या अडचणींत त्यांस उपयोगीं पडलें तर अधिक नाहीं कां चांगलें ? आणि त्या गोष्टींकडे लक्ष दिलें तर विधवा समाजसेवा उत्तम तऱ्हेनें करीत आहेत मग त्या सेविकेचा सर्वसामान्य पोषाख घालोत अगर न घालोत. शुश्रूषा आणि परिचर्या हीं कामें विधवा आज पूर्वापार प्रत्येक झोंपडींत वर्तमानपत्रांत नांव येण्याची इच्छा न करतां करीत आहेत. तेव्हा अर्थात हें पाश्चात्यांपासून येणारें ध्येय आमच्या नायकांनां कांहीं नवीन नाहीं. पैसे घेऊन सेवा करावयाची म्हणजे हा एक धंदा झाला आणि बिनपैशानें सेवा करावयाची हें क्षूद्र प्रकारचें दान झालें. "

" बरं मग, दान हें कर्तव्य क्षूद्र आहे काय ? "

" आपल्याजवळ असेल तें दुसऱ्यांच्या खिशांत टाकावयाचें याला म्हणतात दान. मला यापेक्षां कांहीं निराळें आयुष्यध्येय पाहिजे, हें मी आपणांस अगोदरच सांगितलें नाहीं काय ? "

" सांगितलें असेल, पण या दानाखेरीज निराळें – मी उच्च म्हणत नाहीं, केवळ निराळें म्हणतों – असें ध्येय आपणांस कां पाहिजे ? "

“ वैजनाथशास्त्री, आपण विद्वान आहांत तर मग आपण कोठें चार-पांचशेंची नोकरी करून उरलेले पैसे गरीबांनां कां वांटीत सुटत नाहीं ? ”

“ जुगारी मनुष्य चांगल्या तऱ्हेनें पैसे मिळविण्याचें काम सोडून जुगार कां खेळतो ? दारूबाज दारू कां पितो ? ”

“ त्याला तें व्यसन असतें म्हणून. आपण आपल्या कार्याला केवळ दारूबाजी किंवा जुगार यांचीच उपमा देतां काय ? ”

“ काय हरकत आहे ? ”

“ तुम्हांला हें व्यसन लागलें तरी कसें ? ”

“ त्या कार्यामागे लागलें म्हणजे व्यसन लागतें. ”

“ पण त्या कार्याकडे प्रथम तरी मन कसें वळलें ? त्याला कांहीं देश-कल्याणाचा हेतु मुळाशीं नाहीं काय ? ”

“ मी या फंदांत पडलों त्याला पुष्कळ वर्षें झालीं, कोणत्या भावनांनीं या फंदांत पडलों हें मला आज पक्कें आठवत नाहीं पण देशकल्याणाच्या कांहीं वेड्या कल्पना त्यावेळेस माझ्या डोक्यांत शिरल्या असतील असें वाटतें. ” वैजनाथशास्त्र्यांनीं डोक्यावरील रुमाल हातांत घेऊन डोकें खाजवीत उत्तर दिलें.

“ आपण या फंदांत पडला ते जर वेड्या कल्पनामुळें पडला असतां तरी आपला व्यासंग आतांपर्यंत कसा राहिला ? आपण हा जीवितक्रम केव्हांच सोडून दिला असता. ”

“ आमची पुढची कथा काय करायची ? हम् अब बन चुके ; आयुष्याला एकदा वेडेवांकडें स्वरूप आलें म्हणजे तें तसेंच कायम ठेवावें लागतें, नाहींतर लोक वेडे म्हणतात. तुम्हांला ‘ बन चुके ’ ची गोष्ट ठाऊक आहे ना ? ”

“ काय आहे ती गोष्ट ? ”

“ ब्रह्मदेवानें सृष्टि मिमाण केली तेव्हां एक मातीचा गोळा घेऊन त्याचा उंट बनविला. आणि त्यास सजीव केलें. उंटास निर्माण केल्याबरोबर तो

इकडे तिकडे उड्या मारूं लागला. त्याचें तें वेडेविद्रें रूप पाहून ब्रह्मदेवाला वाटलें कीं छे! आपला प्रयत्न फसला. आतां आपण त्याला पकडून त्याचें रूप सुधारलें पाहिजे. आणि हा हेतु मनांत धरून तो उंटास बोलावूं लागला, पण उंट कांहीं येईना. उंट म्हणाला "हम् अब बन चुके." त्याच्या वाट्यास जें रूप आलें तें एकदां तो बनल्यानंतर त्यानें सोडलें नाहीं. त्यांतलीच गोष्ट आमची!!"

"काय शास्त्रीबोवा आतां आपण सांगा, कीं ज्या मार्गांत आपण एकदां पडलों तोच मार्ग कायम ठेवला पाहिजे, कां कीं लोक चंचल म्हणतील म्हणून. एवढीच वृत्ति आपणांस कार्यास चिकटून रहाण्यास पुरेशी आहे काय? आपण करतों त्यांत देशकल्याण बंद तरी पडणार नाहीं असें आपणांस वाटतें कीं नाहीं?"

"माझ्या कार्यानें लोककल्याण कितपत होईल हे आज सांगतां येत नाहीं, तथापि मला एवढेंच वाटतें कीं, दादाभाई नौरोजीसारख्या अल्पबुद्धीच्या एतद्देशीय लोकांनीं आणि मतलबी परकीय लोकानीं उत्पन्न केलेल्या कांग्रेसच्या खुळापेक्षां माझा मार्ग अधिक खुळेपणाचा नाहीं."

"आतां माझ्या प्रश्नाजवळ आपण पुन्हां आलांतच. काग्रेससारख्या चळवळीपेक्षां आपले कार्य आपणांस अधिक कां वाटतें?"

"कांग्रेसवाली मंडळी म्हटली म्हणजे कायस्थ धर्माची अपेक्षा करीत आहेत. मीं ब्राह्मण धर्म आचरीत आहे."

"याचा अर्थ काय?"

"या कांग्रेसवाल्याचे म्हणणें काय कीं, तुम्ही आम्हाला मोठमोठ्या नौकऱ्या द्या व यांची ओरड तेवढ्यापुरतीच. यानां ब्राह्मणधर्म आचरावयास नको, आणि त्यांच्या महत्त्वाकांक्षाहि त्या प्रकारच्या नाहींत. हें इंग्रजांना राजा मानसिंगास अकबरानें कसें उच्चपदास नेलें त्याचें उदाहरण देतात. ते म्हणतात कीं मोंगल बादशहांनीं कसें राजा मानसिंगास नोकरीला ठेवलें आणि

( पंचतुंड नर रुंडमालधर—या चालीवर )

कामबाण जरि मर्मच्छेदी त्रस्त करी तरुणांतें ।
स्मित युवति तव अमृत, त्याच्या सेकानें ये त्यातें ।
नवजीवन, परि चंचलता तव आकुल हृदया करि ती ।
आश्वासनपर वाक्यें स्फुट तव देतिल मजला शांति ।
हृदय कठिण तव असें बोधिण्या घेउनि तद्भावातें ।
स्तनयुगलें हीं पुढें येति तव, गर्वोन्नत चित्तातें ।
योग्य प्रतिनिधि असति लाभले; वज्रताडना मुकले ।
जणों महीधर, अथवा दिसती अरघट्टाच्या माले ।
कुंभ जणो; हे लावण्याच्या जलसेकानें तुजला ।
मोहक करुनि कुसुमशराच्या वाढविती सैन्यबला ।
मौन तुझें तें सोडुनि देई भूमिकडे नच पाही ।
कालविलंब न करी बालिके हृदय वदे शब्दांहीं ।

" हां, हें पद कुठलं ? हें देखील आपल्या एखाद्या काल्पनिक मित्राचेंच असेल ? "

" नाहीं हें मीं स्वतःच लिहिलें आहें. "

" हें पद ' युवती 'स उद्देशून लिहिलें आहे. कोण ही युवती ? कोणी खुरीखुरी आहे कां केवळ कवि कल्पनेची आहे ? "

" आपणांस काय वाटतें ? "

" मला असें वाटतें कीं आपण हें कोणा विशेष स्त्रीला उद्देशून लिहिलें आहे. "

" कशावरून ? "

" ' मौन तुझें तें सोडुनि देई ' हें वाक्य कोणा विशेष स्त्रीला उद्देशून नव्हे काय ? "

" असलेंच पाहिजें असें नाहीं. काव्य तयार करतांना नायिका विशेष प्रकारची अगर विशेष कार्यांत गढली आहे, अशी कल्पना करून काव्य करणें हा कविसंप्रदाय आहे. संस्कृतमध्यें असे श्लोक पुष्कळ आहेत. हें पद देखील काही संस्कृत श्लोकाचें रूपातर आहे. "

" कोणचे संस्कृत श्लोक ते ? "

" ते, हे. "

कामबाणप्रहारेण मूर्च्छितोस्मि पदे पदे ।
जीवंति युवचेतांसि युवतींना स्मितामृतैः ।
मौनं कालविलंबश्च प्रयाणं भूमिदर्शनम् ।
भृकुट्यन्यमुखी वार्ता नकारो षड् विध.स्मृतः ।

" हे खरोखर मूळ श्लोक आहेत, कीं मी बायकोमाणूस, मला संस्कृत श्लोक म्हणून गप्प करावयाचे अशांतला प्रकार तर नाहीं ना ? "

" का बरें ? "

" का म्हणजे ! संस्कृत श्लोक आणून दुसऱ्याला भेवडावून सोडण्याचें प्रकार पुष्कळ पाहिले आहेत. रुद्र अगर पवमान म्हणून अभिषेक करतो म्हणून बायकास सागणारें पुष्कळ ब्राम्हण वाटतील ते दुसरेच संस्कृत श्लोक म्हणतात. "

" नाहीं, असा प्रकार येथे नाही. "

" मला बरीच शंका येते. "

" का बरें ? " हरिभयय्यानें जरा भीतचित्तानें विचारलें. त्याला असें वाटलें कीं, आपण बिंबाबाईशीं जी लगट केली आणि तिला जी गीतें गाऊन दाखविली त्याबद्दल तिला राग तर नाहीं ना आला ?

" कारण एवढेंच कीं, त्या पदांत स्त्रियांच्या मनाविषयी थोडेसें अज्ञान दिसतें. संस्कृत कवींमध्यें तसें अज्ञान होतें काय ? "

" अज्ञान कोठें दिसतें ? "

" कवि त्या तरुणीस आपलें हृदय शब्दानी बोलून दाखविण्यास प्रार्थना करीत आहे. एक तर स्त्रिया कधीं आपलें हृदय शब्दांनीं व्यक्त करून दाखवितील काय ? आणि दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे पुरुषांनीं आपलें हृदय व्यक्त करून दाखविलें तरच स्त्रियाना आपलें हृदय व्यक्त करण्याचें उत्तेजन येतें. "

" तर मग आपलें म्हणणें काय ? "

" पुरुषानीं आपलें हृदय व्यक्त करावें आणि स्त्रियांची संमति अगर विरुद्धता स्त्रियाच्या वर्तनावरून ओळखावी. पुरुषानीं आपलें हृदय अगोदर उघड करून दाखवावयाचे कीं स्त्रियानीं ? "

" बरं तर मग मी कबूल करतों की मी ती कविता स्वतःचेच अंतःकरण व्यक्त करण्याकरिता केली होती. "

" आपण ती कविता कोणा तरुणीस उद्देशून लिहिली ? "

हरिभय्यानें उत्तर केले नाहीं. तो तिच्या जरासा जवळ सरकला आणि तिला त्यानें दृढालिंगन दिले. बिंबाबाईनें कांहीं हरकत केली नाहीं. उलट त्याचे हात जरासे ढिले झाले तेव्हां तिनें उलट त्यास स्वतः आपले बाहुपाश विस्तृत करून आलिंगिलें. तेव्हां ती संधी साधून हरिभय्यानें बिंबाबाईच्या अधरामृताचे प्राशन केलें.

तीं दोघेंहि तेथें काहीं वेळ बसली. दोघेहि स्तब्धच होतीं. तथापि मधून मधून आलिंगनचुंबनादि विधी उरकून घेत होती. तथापि स्तब्धतेवरून तीं केवळ प्रेमसागरांत बुड्या मारीत होती अशांतला भाग नाहीं. हरिभय्या आणि बिंबाबाई यास एकमेकांचीं हृदयें समजलीं होती. कांहीं वेळानें बिंबाबाई म्हणाली, " आपलें हें करणें पाप तर नाहीं ना ? "

" हें पाप आहे अगर नाहीं हें पुढील विचारावर अवलंबून आहे. "

" तें कसें काय ? "

" आपणांस पुढें लग्न करावयाचे असेल तर आपलें आजचें करणें गैर नाहीं आणि जर आपणास पुढें लग्न करावयाचें नसेल तर गैर आहे."

" आपला काय विचार आहे ?"

" आपला काय आहे ! "

" मला जी गोष्ट गैर आहे ती करावयाची नाहीं. आजचें आपलें करणें गैर न होईल असें झालें पाहिजे."

" माझी तयारी आहे."

" आपण मला अंतर देणार नाहीं ना ?"

" मुळींच नाहीं ! "

" आपण माझा स्वीकार देवालयांत केला आहे हें लक्षांत ठेवा ! "

" माझ्याकडून लग्न करावयास बिलकूल हरकत नाहीं. प्रश्न तुमच्याचपुढें आहे."

" आपण माझ्या प्रभाकराला अगदीं आपल्या मुलाप्रमाणें वागवाल ना ?"

" मला प्रभाकराचा लोभ पूर्वीपासूनच जडला आहे."

बिंबाबाईनें हें शब्द ऐकतांच थोडेसें अस्वस्थतेचें सोंग करून हरिभय्याच्या अंगावरच स्वतःस लोटून घेतले. हरिभय्यानें तिला पुन्हां घट्ट धरलें.

थोडक्याच वेळानें पुन्हां बिंबाबाईनें स्वत स सोडवून घेतलें, आणि पुन्हां म्हणाली " छे ! आपण करीत आहों तें वाईटच आहे. आपणांस एकमेकांवर प्रेम करावयाचा आज अधिकार नाहीं ; आपलें लग्न झाल्यानंतरच आहे."

हरिभय्यानें उलट तिला पुन्हां आपल्या हृदयाशीं आवळून धरलें आणि म्हणाला " आपण जर लहान मुले असतों आणि जुन्या चालीप्रमाणेंच आपलें लग्न व्हावयाचें असतें, आणि त्यांत स्त्रीचे पहिल्या प्रथमच व्हावयाचें असतें तर तो नियम लागू पडतां. मोठ्या झालेल्या स्त्रीपुरुषांनीं जर लग्नें करावयाचीं तर

त्यांचे एकमेकाचें प्रेम तरी एकमेकांवर असलें पाहिजे. प्रेमनिवेदन हावभावानीं आणि क्रियांनीं जितक्या स्पष्ट रीतीनें करता येतें तितके स्पष्ट दुसऱ्या रीतीनें म्हणजे बोलून करतां येत नाहीं. यासाठीं अयोग्य आणि पापात्मक प्रेमाच्या जुळवाजुळवीसाठीं जो प्रकार करावा लागतो तोच खऱ्या व सद्हेतुयुक्त प्रेमाच्या जुळवणीस लागतो. एकाचें प्रेम दुसऱ्यावर आहे हें तरी ठरावें कसें ? "

एवढें बोलल्यानंतर अधिक स्पष्टपणानें बोलण्यासाठीं अगर बिंबाबाईच्या आलिंगनापासून होणारें सुख बोलण्यांत गुंतल्यामुळें कमी कमी होऊं लागलें होतें म्हणून म्हणा, हरिभय्यानें बिंबाबाईच्या बाहुपाशांतून—एक दोन वेळां चुंबन घेऊन — आपली मुक्तता केली आणि म्हणाला, " पुनर्विवाह हें जुन्या शिष्टाचारा-विरुद्ध आचरण, तेव्हा आपल्या लग्नाचा चिवडा लोकचर्चारूपी वर्तमानपत्रातून विकला जाऊं नये म्हणून तरी खात्री असली पाहिजे. ज्या स्त्रीबरोबर आपण लग्न करणार ती स्त्री आपल्याशीं केवळ आपल्या पोटापाण्याची सोय करण्यासाठीं लग्न लावीत नाहीं, अगर कोणीही पुरुष केवळ रात्रीच्या सोईकरता हवा एवढ्या-साठींच लग्नास प्रवृत्त होत नाहीं किंवा आपण हवे तसे व्यवहार केल्यामुळें मूल झालें असता मुलाचा बाप म्हणून दाखविण्यासाठीं कोणी तरी हवा म्हणून पुनर्विवाहाकरितां तयार होत नाहीं याबद्दल तरी मनाची खात्री पाहिजे. व यासाठीं विवाहपूर्व प्रेमसाधनाहि केलीच पाहिजे. आजकालच्या सुधारकानां पुनर्विवाह पाहिजे ; पण विवाहापूर्वी स्त्रीपुरुषांनीं एकमेकास भेटावें व एकमेकांवर प्रेम करण्याची संधि स्त्रीपुरुषांस मिळावी हें नको आहे. "

" सध्यांचे पुनर्विवाह होतात ते प्रेमामुळें नाहीं कां होत ? "

" फारच क्वचित, पुष्कळदां पुनर्विवाह करणाऱ्या स्त्रीपुरुषांची ओळख देखील नसते. आणि पुनर्विवाह पद्धत म्हटली म्हणजे एखाद्या पुनर्विवाह-संयोजक कंपनीच्या सेक्रेटरीमार्फत लग्न जुळवावयाचें. स्त्रीपुरुषांची लग्नापूर्वी थोडी ओळख होती व दोघाचे एकमेकांवर प्रेम होतें हें कळलें तर ती गोष्ट जणूं काय मोठी लज्जास्पद गोष्ट झाली. चांगल्या घराण्यांतीच विधवांपर्यंत हे सेक्रेटरी पोंचतच नाहींत. यांचीं कुळें म्हटलीं म्हणजे कांहीं मास्तरणी, कांहीं नर्सा

आणि कांहीं मिडवाईफा —ज्या बहुतकरून एक किंवा अनेक डाक्टरांनीं पूर्वी प्रेम-पात्र केलेल्या—असावयाच्या. ज्या बायका पुनर्विवाहास तयार होतात त्या नर्सचें अगर मास्तरणीचें काम करून कंटाळून गेलेल्या असतात, आणि दुसरा कोणी तरी पैसे मिळवून आणणारा हवा असें त्याना वाटूं लागतें. कधीं कित्येक श्रीमंत मतलबी सुधारक आपण खराब केलेल्या स्त्रियांचा मागाहून त्या अक्षतयोनी असें सांगून भोळसर मनुष्य पाहून पुनर्विवाह लावून देतात. असल्या कारणामुळें कांहीं ठेवलेल्या आणि पुनर्विवाहाच्या बायका याच्यामध्ये फरकच नाहीं असेंहि पुष्कळदां होतें."

"वाईट बायकाच पुष्कळदां पुनर्विवाहास का फार प्रवृत्त होतात?"

"याचें कारण एवढेंच कीं, पुनर्विवाहाची चाल अगर त्याची इच्छा लोका-मधूनहि निघाली नाहीं; आणि विधवांमधून तर त्याहूनहि नाहीं. तर आपल्या धर्माचा आणि समाजाचा नाश करूं पहाणारे ख्रिस्ती मिशनरी. त्याना आमच्या बायकांची फार कींव आली. त्यांचे चेले आमचे सुधारक! पुनर्विवाह आमच्या समाजांत पाहिजे असें त्यास वाटलें आणि काहीं तरी पुनर्विवाह घडवून आणण्या-साठीं तुम्ही स्वार्थत्याग करून पुनर्विवाह करा असा उपदेश करूं लागले!"

"कां बरें? तुम्हीं पुनर्विवाह करण्यात स्वार्थत्याग करीत नाहीं काय? तुम्हीं पुनर्विवाह केल्यानें तुमच्या हरिदासपणावर गदा नाहीं का येणार? तुमचें आज उत्पन्न आहे तें नाहीं का कमी होणार?"

"होईल, नाहीं असें नाहीं. तथापि त्याला मी स्वार्थत्याग म्हणत नाहीं. त्या उत्पन्नापेक्षा मला एखाद्या स्त्रीच्या प्रेमाची किंमत अधिक आहे. प्रेम करणारी स्त्री मला मिळाली तर मी एका झोंपडींत सुद्धां राहून दिवस घालवीन. तथापि ज्या स्त्रीसंबंधानें मला कांहीं माहिती नाहीं, ज्या स्त्रीस मी ठाऊक नाहीं, तथापि आपणास एक पुरुष हवा एवढें मात्र जिला ठाऊक आहे तिच्याशीं लग्न लावण्याचा स्वार्थत्याग करण्यास मी तयार होणार नाहीं."

"माझें तरी तुमच्यावर प्रेम आहे हें तुम्हीं कसें म्हणतां?"

" तुझें माझ्यावर प्रेम थोडें बहुत तरी असलेंच पाहिजे हें तुझ्या आतां-पर्यंतच्या वर्तनावरून वाटतें. आणि याशिवाय दुसरें एक कारण म्हटलें म्हणजे तूं श्रीमंतीण आहेस आणि मी दरिद्री आहे. "

" बरं, लोकांमध्ये पुनर्विवाह फारसे कां होत नाहींत हें आपलें सांगायचं राहिलं. "

" याचं कारण मनुष्यस्वभावाकडे दुर्लक्ष झालं आहे. सुधारणा करावयाची ती मनुष्यस्वभावाला अनुसरून पाहिजे. "

" सुधारकानीं काय करायला हवं होतं ? "

" सुधारकांनीं कांहींच करावयाला नको होतें; त्यांनीं मरून जावयाला पाहिजे होतें आणि पाहिजे आहे. जें काय करावयाला पाहिजे होतें तें देशाभिमानी लोकांनीं करावयाला पाहिजे होतें. "

" तें काय करायला पाहिजे होतं ? "

" ते मग सांगेन, प्रथमतः मानवी स्वभावाकडे दुर्लक्ष कसें झालें तें सांगतों. पुरुषांच्या स्वभावाचेंच उदाहरण आपण घेऊं. अठरा वीस वर्षाचा मुलगा झाला आणि त्याला आपलें लग्न व्हावेसें वाटलें तरी, ' बाबा माझें लग्न करून द्या ' असें म्हणावयाला तो लाजेलच. व दुसरे कांहीं घोंटाळे करण्याची त्याची प्रवृत्ति होईल. "

" मुलींची तीच गोष्ट आहे. बाबा माझें लग्न करून द्या असें म्हणणें तिच्या जिवावर येईल, तथापि दुसरे कांहीं घोंटाळे करण्यास मुली कांहीं कचरत नाहींत. आपल्या लोकात अविवाहित मुली फारशा नाहींत. तथापि हें कांहीं बंगाली ब्रम्हो मुलींच्या वर्तनावरून मला कळलें. आमच्या दादाशीं एका बंगाली मुलीचा पत्रव्यवहार चालला होता. ती मुलगी जवळ जवळ आमच्या दादाच्याच वयाची होती. तो पत्रव्यवहार पुढें वडलांच्या हातीं पडला. ते दादावर खूप रागावले. पण त्यानीं लगेच पुढच्या वैशाखांत दादाचं लग्न करून दिलं. "

" तरुण कुमारिकांचें देखील असेंच आहे ना ? आता विधवांची गोष्ट देखील अशीच. तूंच सांग बरं कीं माझें दुसरें लग्न करून द्या असें आपल्या वडलानां सांगण्याची तुझी छाती झाली असती का ? "

" नाहीं. प्राण गेला असता तरी देखील मी असं म्हटलं नसतं. "

" आणि तीच तूं आता एका माझ्यासारख्या सामान्य मनुष्याबरोबर लग्न करावयास तयार झाली आहेस " असें म्हणून हरिभय्यानें तिचे चुंबन घेतलें.

" मी यासाठीं एवढेंच म्हणतों कीं, पुनर्विवाह व्हावयाचे ते लहान मुला-मुलींच्या पद्धतीनें जुळणार नाहींत. कुमारीच्या लग्नासाठीं बाप हजारो रुपये हुंडा खर्च करण्यास तयार होतो तसा विधवेसाठीं तयार होईल काय ? आणि तसा होत नसतां विधवेचे लग्न कसें होईल ? लग्न विधवेबरोबर करावयाचे तें केवळ स्वार्थत्याग करून करावें ! तिचे आपल्यावर प्रेम आहे किंवा नाहीं हें पहाण्याची संधि देखील नसावी. केवळ पुनर्विवाह कंपनीच्या सेक्रेटरीचे शिक्के सर्टिफिकिट असले म्हणजे झाले. तेवढ्यावर तरुणांनीं खूष रहावें. आणि ते दाखवून देतील त्यापैकीं एखाद्या विधवेबरोबर लग्न करावे ही आजकालची विधवाविवाहाची रीत. तशाप्रकारें पुनर्विवाह झाला म्हणजे बिनअकली लेख-कानीं चालविलेलीं पत्रें व मासिके त्या लग्नाचें नगारे पिटावयास तयारच. "

" तर मग पुनर्विवाह व्हावा कसा ? "

" आपण जुळविला तसा. तरुणांनीं तरुणींशीं आपले आपण लग्न जळ-वावें. आईबापांच्या चोरून पाहिजे तर पत्रव्यवहार करावा. आणि स्पष्ट भाषेत सांगायचें म्हटल्यास तरुणींस तरुणांनीं फूस लावून पळवून न्यावें. "

" हें काय बाई आपलं बोलणं ! "

" स्पष्ट बोलावयाचें म्हटलें म्हणजे कानाला जरा कठोर लागतें, पण प्रीति-विवाह आणि पुनर्विवाह हे जुळविण्याचा सन्मान्य मार्ग दुसरा नाहीं. "

" आणि पुढें पुरुषांनीं बायकांना टाकून दिलं म्हणजे मग ? "

"तें बंद करण्यासाठीं विधवांनां हें शिकवलें पाहिजें कीं तुम्ही अगोदर पुरुषांशीं फारसा संबंध ठेऊं नका. ठेवला तरी अशांशीं ठेवा कीं त्यांच्याशीं पुढे मागे लग्न होण्याचा संभव असेल. म्हणजे त्यांनीं ओळख किंवा स्नेह वाढवावयाचा तो आपल्याच जातीच्या लोकाबरोबर वाढवावा आणि ते गृहस्थ अविवाहित अगर विधुर आहेत असें पाहून वाढवावा. ब्राह्मण तरुणाशीं परभु मुलीनें अगर परभाशीं ब्राह्मण मुलीनें फार संघठण होऊं देऊं नये. आणि तो मनुष्य आपल्याच वर्गातला अगर ज्याच्यांशी लग्न केलें असतां आपले लग्न फार हलक्या पुरुषाबरोबर झालें असें वाटणार नाहीं अशाबरोबर ठेवावा. आणि पुढें त्या पुरुषाला जाळयात पकडण्यासाठीं वेधडक खटपट करावी."

"ती काय करावयाची?"

"आपण काय केली तीच करायाची. आपण दोघांनीं जे प्रकार केले ते सर्व आजच्या सोंवळया सभ्यतेचे खोटे नखरे करणाऱ्या समाजांत असभ्य आणि फाजील असेच समजले जातील. असले प्रकार चोहोंकडे होतातच. पण त्यानंतर लग्ने मात्र नाहींत. लग्ने व्हावयाचीं झाली म्हणजे तीं पुनर्विवाहाच्या सेक्रेटरींमार्फतच होतात. आणि ते पुनर्विवाह पुढें सुखमय होत नाहींत."

"समजा, पुरुष अविवाहित अगर विधुर असला आणि त्याच्याशीं एखाद्या बाईचं जुळलं आणि पुढें त्यानें तिला टाकून दिलं म्हणजे मग?"

"त्यासाठीं पाहिजे तर कायदा करावा."

"तो कसला?"

"कायदा जो करावयाचा असतो, तो लोकमान्य होण्यास एक गोष्ट आवश्यक आहे आणि ती म्हटली म्हणजे कायद्याचा हेतु लोकांस नीतीचा वाटला पाहिजे. विधवानीं पुनर्विवाह केला तर? त्यांस सर्व हक्क असावे असा कायदा करण्यापूर्वी जो विधवास पळवून नेऊन टाकून देईल त्यास कडक शासन व्हावें यासाठीं कायदा करावा, अगर विधवांस त्यानें पळवून नेऊन पुढें सोडून दिलें तर त्या बाईस त्या पुरुषापासून पोटगमाण्यासाठीं पैसा घेण्याचा

हक्क शाबीत करण्याचा कायदा करावा. तसा कायदा झाला म्हणजे बायकांस फसविणाऱ्या मनुष्यावर कांहीं तरी जबाबदारी उत्पन्न होईल. दोन दिवस मजा मारण्यासाठीं स्त्रियांचें जन्माचें नुकसान करणारे जे सभ्य गृहस्थ समाजांत वावरतांना दृष्टीस पडतात त्यांनां थोडा विचार पडेल, आणि यासाठीं बायकांनां पळवून नेण्यापूर्वीं ही पळवून नेण्यालायक विधवा आहे कीं नाहीं, हाहि त्यांनां विचार पडेल. व पुरुषाकडून होणारी लगट अधिक विचारयुक्त होईल आणि ती तशी झाली म्हणजे उभयतांचे प्रेमहि अधिक टिकण्याचा संभव आहे."

"बरं आतां आपण लग्न करावयाचे तर तें बाबांनां कळावयास नको काय?"

"कायदा असा आहे कीं बाईस दुसरें लग्न करणेंचें झालें म्हणजे बापाचीं संमति लागत नाही, तथापि त्यांस कळविलेले बरे."

"तें कसें कळवावयाचें?"

"तुम्हांला वाटलं तर तुम्ही कळवा!"

"मी नाहीं बाई कळवीत. माझ्याच्यानं नाहीं धीर होणार!"

"पाहिजे तर मी कळवितों, मी त्यानां पत्र लिहीन म्हणजे झालें. पाहिजे तर तूं शारदाबाईना मध्यस्थी घाल."

"शारदाबाई तर मला वाटतं कीं आपलंच लग्न जुळवीत आहेत."

"कुणापाशीं?"

"आज ते वैजनाथशास्त्री आले आहेत, त्यांच्यापाशीं."

"वेडी आहे शारदाबाई. वैजनाथशास्त्री म्हणजे काय अरसिकतेचा मूर्तिमंत पुतळा! शारदाबाईनी कोणी तरी ब्यारिस्टर अगर कोणीतरी संपन्न नवरा पहावा!"

"खरें आहे, शारदाबाईसारख्या रत्नाचा त्या दरिद्र्यास काय उपयोग?"

"म्हणजे बायकांनीं लग्न करतांनां केवळ पुरुषाच्या द्रव्याकडे पहावे? निदान आपण तरी असें म्हणूं नये. मजजवळ काय आहे?"

" मग आपलें म्हणणें हा विवाह व्हावा असें आहे काय ? "

" अर्थात नाहीं. माझ्या मतें द्रव्यास महत्त्व नाहीं. आयुष्य क्रमणाऱ्यांच्यां अभिरुचीस महत्त्व आहे. तर संसारसुखाचा भोक्ता तरी पुरुष हवा ना, तो वैजनाथशास्त्री म्हणजे शारदाबाईला एकटीच बिछान्यावर सोडून देऊन जुन्या पोथ्या चाळीत बसेल आणि त्या पोथ्यांत दिसणाऱ्या भाषेवरून हा ग्रंथ किती जुना असावा असले सिद्धांत काढीत बसेल. आपल्या बायकोच्या तारुण्याचे दिवस कमी होताहेत याचा त्याला विसर पडेल. "

" म्हणजे तेवढ्यावरून तो लग्नाला अयोग्य झाला काय? मला त्याची आठवण होते ; ते देखील रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत हिशोबाच्या वह्या पहात बसत असत. आणि निजायच्या अगोदर बायकोचें चुंबन घेतल्याशिवाय निजत नसत. अहो, कामाचा मनुष्य असला म्हणजे त्याला बायकोकडे थोडा वेळ तरी दुर्लक्ष केलेंच पाहिजे. "

" यासाठीं मी असें म्हणतो कीं सुंदर स्त्रियांशीं लग्न करण्याचा अधिकार कवि, गायक व चित्रकार इत्यादि ललितकलांच्या सेवकांसच आहे. " असें म्हणून हरिभय्यानें तिचें पुनः एकदां चुंबन घेतलें.

× × × ×

कांहीं वेळानें बिंबाबाई व हरिभय्या मूळ ठिकाणावर परत आलीं. त्यावेळेस बिंबाबाई अगदीं स्तब्ध पण आनंदमय दिसत होती.

---

प्रकरण १७ वें

## एका रात्रींत विद्वान

" तुमची काय एकदम विद्वान् होण्याची इच्छा आहे ? आणि मला एका रात्रींत विद्वान् करा म्हणून सांगतां ? तुम्हालाहि उद्यां रत्नपूर सोडून जावयाचें आहे आणि एवढ्यांत मी काय तुम्हांला विद्वान करावयाचं !

आणि कसें करणार! बाबा रे, तुला मी सांगतों कीं हें मला अगदीं अशक्य आहे."

"गुरुकृपा असली म्हणजे सर्व कांहीं होईल."

"बाबा रे, गुरुकृपेनें कोणीहि कधींच विद्वान होत नसतो. गुरूच्या इच्छेपेक्षां शिष्य स्वतःच्याच प्रयत्नानें विद्या संपादतो. गुरु थोडेसें सांगेल पण शिष्यानें परिश्रम मात्र पुष्कळ केला पाहिजे."

"गुरूची शिकवणी आणि शिष्याची मेहनत यांत प्रमाण काय असतें?"

"जितका शिष्य मूर्ख व बिनमेहनती तितके गुरूला श्रम जास्त पडत जाणार. परंतु जर शिष्य फार मेहनती असेल तर गुरूला फारच थोडें काम पडतें."

"पण जर शिष्यच पुष्कळ मेहनत घेणारा असेल तर—"

"तर गुरूला फारच थोडें काम पडणार."

"तर मग समजा कीं, शिष्य पुष्कळ मेहनत घ्यावयास तयार आहे आणि गुरुदर्शन मात्र बारा बारा वर्षांनीं होणार आहे तर गुरु शिष्यास कांहीं शिकवूं शकेल कीं नाहीं?"

"शिकवूं शकेल, पण नियमितपणानें वाचन करणें, मेहनत करण्यास प्रवृत्त करणें, इत्यादि गोष्टी करतां येणार नाहींत."

"तर मग नियमितपणा व मेहनत यांची जबाबदारी शिष्यावरच ठेवावी. मग काय अडचण आहे?"

"मग अडचण एवढीच कीं शिष्याची पूर्व तयारी कांहीं तरी पाहिजे. उदाहरणार्थ, एखादी भाषा शिकवावयाची झाली तर बारा बारा वर्षांनीं पाठ देऊन भागणार नाहीं. पण ज्या विषयाची बरीचशी प्राथमिक माहिती विद्यार्थ्यास आहे, त्या विद्यार्थ्यास आपल्या पुढील अभ्यासक्रम कसा ठेवावा हें सांगून तीर्थाटनास जातां येईल."

"तर मग तुम्ही माझें काम खात्रीनें करणार!"

" कसें बरें ? तुमची कोणत्या शास्त्रांत सामान्य उपस्थिति आहे व माझ्याकडून त्या शास्त्राची पारंगतता मिळवूं पहाता ? "

" मला एकच शास्त्र परिचित आहे आणि तें म्हटलें म्हणजे संगीत. "

" आणि संगीत मला बिलकुलच येत नाहीं. हिंदुस्थानच्या अवनतीचें कारण संगीतच होय. आणा तुमचा तो तंबोरा, फोडून टाकतों. "

" मी संगीतात प्रवीणता मिळविण्याकरिता तुमच्याकडे मुळींच येणार नाहीं. "

" तर मग कशाकरिता ? कोणत्या शास्त्रांत तुम्ही विद्वान होऊं पाहता ? "

" माझी खरोखर विद्वान् व्हावें अशी मुळींच इच्छा नाहीं. "

" तर मग ! "

" विद्वान् समजलें जावें एवढीच माझी इच्छा आहे. "

" पण ती साध्य होण्यास काहीं विद्वत्ता नको कां ? "

" ती फार थोडी पाहिजे अशी माझी समजूत आहे. "

" आणि अशी तुमची समजूत कशी झाली ? "

" मी एकदां उमरावतीला गेलों होतों त्या वेळेस एका वकीलाकडे उतरलो होतों. तेव्हां पाहिलें कीं गांवांत त्याची मोठा विद्वान म्हणून ख्याति. तीन चार दिवस तेथेंच होतों तेव्हां त्या वकीलाच्या विद्वत्तेच्या मर्यादा कळल्या. त्याला सुभाषिताचे शेंसवाशें श्लोक येत असावेत. संगीतरत्नाकरांतले एक दोन श्लोक त्यानें म्हणून दाखविले. त्याला संगीत काहीं फारसें समजत नव्हतें पण रसिक आणि विद्वान म्हणून त्याची ख्याती होती खरी. मला सहज विचार उत्पन्न होतो तो हा कीं, दोनतीनशें श्लोक पाठ करून आपण विद्वान् म्हणून सहज मोडलें जाऊं. तर आपण तरी तसें कां करूं नये ? या गांवढ्या गांवांत कांहीं संस्कृत श्लोक म्हणून दाखविले म्हणजे लोक पंडित समजतात. पण अलीकडे इंग्रजी शिकून बी. ए. वगैरे झालेलीं पुण्याकडची माणसें येतात तीं त्रासदायक

होतात. म्हणून म्हणतों कीं त्यांनांसुद्धां भेवडावतां येईल इतकें आपलें वाचन आपण दाखविलें पाहिजे. म्हणून म्हणतो कीं बी.ए. झालेल्याना भेवडावण्याची युक्ति सांगा."

वैजनाथशास्त्र्यांनीं यावर उत्तर काय दिलें ते पुढें येईलच. पण आमच्या हरिभय्यास एकदम विद्वान् होण्याची इच्छा का झाली आणि बी.ए. वाल्याना भेवडावण्याची आवश्यकता कां भासली ह्या रहस्याचा उलगडा होण्यासाठीं त्या काळच्या सामाजिक वातावरणांत वाचकानां गेलें पाहिजे. नागपुरास त्या वेळच्या सुशिक्षित वर्गामध्यें ज्या प्रकारच्या भावना वागत होत्या, त्या आमच्या सुशिक्षित वर्गांत कांहीं अंशी लुप्त झाल्यामुळें निम्याशिम्या वाचकांस परिचित पण निम्याशिम्यास अपरिचित असा सामाजिक इतिहास दिला पाहिजे.

हरिभय्या मोघे याच्या मनावर प्रेमामुळें जो संस्कार झाला त्यात महत्वाकांक्षा मुख्य होती. बिंबाबाईनें आपल्यापेक्षा कमी योग्यतेच्या पुरुषाबरोबर लग्न केलें असा प्रवाद लोकांकडून होऊं नये आणि विशेषतः सुधारक वर्गाकडून होऊं नये अशी त्याची इच्छा होती. सुधारक वर्गातल्या बऱ्याचशा मंडळींचें अंत करण तो जाणत होता. त्या वेळेस सुधारक वर्गाच्या संप्रदायाची अशी समजूत होती कीं, पुनर्विवाह वगैरे करावयाचा झाला तर कांहीं लोकांनां तो सोईस्कर पडला म्हणून तो त्यानीं लावला असें जर कोणी म्हटले तर पुनर्विवाहाच्या संस्थेसच कोणी भोंसकलें असें त्यास वाटे. तसेंच एखाद्या शाळामास्तरानें स्वयंपाकाला बाई मिळत नाहीं किंवा तिला पगार देणें परवडत नाहीं म्हणून हा पुनर्विवाह लावला तर पुनर्विवाहासारख्या उच्च दर्जाच्या संस्थेची थट्टा केल्यासारखें त्यांनां वाटे — खरोखर वाटे किंवा नाहीं कोण जाणे, पुनर्विवाहाच्या पावित्र्याचा गाजावाजा करण्यासाठीं, ते असलीं तत्त्वें बोलत मात्र असत. स्त्रियांच्या हक्कांचे व पुनर्विवाहाचे अभिमानी म्हणवून घेऊन तरुण तरुण पोरींबरोबर व्यभिचार करण्याकरितां क्षेत्र वाढविणारे जाडे सुधारक पहावयाचे झाल्यास राजमहेंद्रीच्या प्रार्थना समाजाकडे जाण्याचें मुळींच कारण नाहीं. वीरेशलिंगम् पंतलू हा मुद्देमालासह पुरावा पुढें आल्यामुळें कोर्टांत

फजित झाला. परंतु विधवाविषयीं कळकळ दाखविणारे आणि त्यांस फशी पाडणारे पाजी गृहस्थ त्या वेळच्या सुधारक म्हणविणाऱ्या चमूमध्यें थोडेथोडके नव्हते. जेव्हा कांहीं सुशिक्षित वर्गातल्या बायका नर्सचें काम शिकण्यासाठीं इस्पितळांत जात असत, तेव्हां शेंकडा ५० सेविकांचें जीवनवृत्त असें होतें कीं, एक कोणी तरी विधवा देखणी, तिला 'क्ष' गृहस्थ दुर्मार्गास लावितो आणि नंतर तिला 'स्कॉलरशिप' देऊन मिडवाईफचा कोर्स शिकविण्याकरितां पाठवितो. हेतु एवढाच कीं, ती आणि तिच्या पोषणाचा खर्च कायमचा गळ्यांत पडूं नये. भोळसर तरुण पाहून त्यास समाजकल्याणाच्या गोष्टी सांगून आपण डाग लावलेली विधवा त्याची बायको करून द्यावयाची हा प्रकारहि चाले. या सर्व गोष्टी जरी लोकांनां दिसत असत, तरी त्या गोष्टींचें सत्यत्व नाकारलें जाई. परंतु सामान्य वर्ग त्यातून काय समजून घ्यावयाचें तें समजून घेई. सुधारक पत्रें प्रत्येक सुधारकाची तळी उचलून धरीत व आक्षेपकांस लबाड ठरवीत. तरी बऱ्याच सुधारकांस खरोखर समाजसुधारणा पाहिजे होती यांत शंका नाहीं. विचारप्रवाह एका दिशेनें नेण्याची खटपट करीत असतां त्यास वेडेवांकडे फाटे, त्या वर्गांत कांहीं कार्यसाधु माणसें शिरल्यामुळें फुटत, व त्यांच्या वागणुकीमुळें विशेष तत्त्वाच्या चालनासाठीं जो वर्ग निर्माण झाला त्यावरहि शिंतोडे उडत याबद्दल त्यांस वाईट वाटे. कांहीं सुधारकांस असेंहि वाटे कीं, एकाद्यानें पुनर्विवाह केला, तर तो मनुष्य आपल्या वर्गांत मोडणार, सार्वजनिक सभांमध्यें आपल्या मांडीशीं मांडी लावून बसणार आणि तो मनुष्य कर्ता सुधारक म्हणून उलट आपल्या वर्गांतील वरच्या दर्जाचा होणार. तर जो मनुष्य आपल्या वर्गांत मोडण्यासारखा असेल म्हणजे मुनसिफ, सबजज्ज किंवा ई. ए. सी ची असेल त्यानेंच काय तो पुनर्विवाह करावा. नाहींतर एखादा पोळपाट-लाटण्या येईल, तो आपल्याच धंद्यांतल्या एका बाईबरोबर पुनर्विवाह करील, आणि कर्ता सुधारक म्हणून पहिली खुर्ची अडवील. म्हणून एखादा पुनर्विवाह झाला म्हणजे ते पुनर्विवाही पुरुषाचा पुनर्विवाह करण्यांत स्वार्थत्याग काय झाला हें मोजूं लागले आणि पुनर्विवाह करावयाचा तो सोईसाठीं किंवा स्त्रीप्रेमासाठीं नसून

स्वार्थत्यागासाठीं करावा, असें प्रतिपादूं लागले. कित्येकांचा असें म्हणण्यांत आपणांस चांगला शिकलेला जांवई फुकटांत मिळावा असाहि हेतु असे. खरोखर पहातां ह्या स्वार्थत्यागाच्या दृष्टीनें देखील एखाद्या बल्लवाचार्याचा पुनर्विवाह अधिक श्रेयस्कर ठरला असता, का कीं, एखाद्या ई. ए. सी. नें जर पुनर्विवाह केला तर त्याच्या नोकरीवर गदा खास यावयाची नाहीं. परंतु बल्लवाचार्य उत्तम स्वयंपाकी जरी असला तरी त्यानें जर पुनर्विवाह केला तर त्यास कोणीहि स्वयंपाकी म्हणून स्वयंपाकघरात प्रवेश करूं देणार नाहीं. हरिभय्या मोघे ह्यास एखाद्या ई. ए. सी. पेक्षां आपणास अधिक स्वार्थत्याग करावा लागेल कां कीं, त्यामुळें आपला पंडितजीपणा कमी होईल ही गोष्ट अगदीं स्पष्ट दिसत होती. पुनर्विवाहामुळें सुधारकपक्षांत जरी मान्यतेची खात्री नव्हती तरी जुन्या वर्गातून किंवा शास्त्रीपंडितास मान देणाऱ्या वर्गातून गचांडी मिळण्याची त्यांनां पूर्ण खात्री होतीच. ज्या सुधारक वर्गात आता आपणांस जाऊन पडावें लागणार त्या वर्गात मोठ्या मालगुजारणींशीं आपला पुनर्विवाह झाला म्हणून खरोखर मत्सरच होणार, व थोरामोठ्याची मुलगी लुच्चानें लगट करून भाळवून नेली अशी भावना लोकांच्या मनांत असणार. तर या वर्गावर छाप पाडण्यासारखी कांहीं तरी विद्या आपणापाशीं पाहिजे, निदान सुशिक्षितेची कांहीं सुधारक आढ्यता करूं लागले म्हणजे त्यांची फजिती करतां आली पाहिजे आणि आपल्या सुशिक्षितेमुळें त्यांस उलट दिपवितां आलें पाहिजे. आणि मनांत आणलें तर तेंहि कठिण नाहीं असें त्यास भासूं लागलें व म्हणूनच बडे जाडे विद्वान वैजनाथशास्त्री ह्यांस जाऊन भेटावें व आपण विद्वान् आहों असें लोकांस भासवावें अशी कांहीं युक्ति करतां आली तर पहावी. अशा इच्छेने तो त्यांस भेटण्याकरितां गेला होता.

हरिभय्याच्या जुन्या पद्धतीच्या गौरवाच्या भाषेनें आणि गुरुकृपा वगैरे शब्द त्यांत आल्यानें वैजनाथशास्त्री तर अगदीं खूष होऊन गेले आणि त्याच्यासाठीं आपण कांहींतरी करावें म्हणून त्यांस वाटूं लागलें. त्यांनीं यासाठीं एक कागद घेऊन अनेक पुस्तकांची यादी तयार केली आणि ‘ हीं पुस्तकें वाचा म्हणजे

तुम्हीं सुशिक्षित वर्गाबरोबर बरोबरीच्या नात्यानें गप्पा मारूं शकाल' असें सांगितलें. त्या पुस्तकात बरींच इतिहासाची पुस्तकें होतीं. ही यादी घेऊन शास्त्रीबोवा म्हणाले, 'सामान्य सुशिक्षित म्हणविणारा वर्ग इंग्रजी जाणतो पण त्यास कोणत्याहि विशिष्ट विषयाची माहिती असते असें नाहीं. तुम्हीं जर इंग्रजी शिकलां आणि रोज नियमानें एक तास वाचूं लागला तर तुम्हांला असें आढळून येईल कीं, येथील सुशिक्षित आणि आग्लविद्याविभूषित म्हणविणारांचें वाचन फारच थोडकें आहे. ही मंडळी कॉलेज सुटलें म्हणजे पुस्तकास रामराम ठोकतात आणि कॉलेजमध्यें असतांना देखील याचे परीक्षेस लागेल त्या व्यतिरिक्त वाचन फार थोडकें असतें. तुम्हीं नियमानें वाचन चालू ठेवा आणि सहा महिन्यांनीं मला पुनः पत्र लिहा. माझा पत्ता त्या यादीखालीं दिलाच आहे.' असें सांगून हरिभय्यास त्यानीं निरोप दिला.

---

## प्रकरण १८वें

# उमरावतीची कॉंग्रेस

उमरावतीच्या १८९७ सालच्या कॉंग्रेसबरोबर सोशल कॉन्फरन्स भरणार होती आणि त्या परिषदेचें अध्यक्षस्थान रानड्यांस, महाजनीस, कीं वामनराव कोल्हटकरास द्यावयाचें हा प्रश्न होता. वामनराव कोल्हटकर यानां अध्यक्षस्थान द्यावें यासाठीं लोकमत अधिक अनुकूल होतें. कां कीं उमरावतीच्या एका वकीलास नागपूरच्या सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान चार वर्षांपूर्वीं दिलें गेलें तर नागपुरच्या मनुष्याचा उमरावतीच्या सामाजिक परिषदेच्या अध्यक्षस्थानावर स्वाभाविकपणें नैतिक हक्क होता. त्या वेळेस कांहीं शिष्ट मंडळींनां आपल्या बायकोकडून व्याख्यान देववून आपला प्रगमनशीलपणा लोकांच्या नजरेस आणावयाचा होता. त्यावेळेस शारदाबाईसारख्या स्त्रियांनां पुढें येण्यास क्षेत्र चांगलें होतेंच. पण त्यावेळेस शारदाबाईपेक्षां अनेक वकीलांच्या बायकांस पुढें येण्याची हौस अधिक होती. १७ सालच्या डायमंड ज्युबिलीच्या खेळाच्या निमित्तानें

बऱ्याच ठिकाणचे शिक्षक व शिक्षकिणी नागपुरास जमल्या होत्या, व नागपुरास कांहीं खेळहि झाले. त्या वेळेस नागपुरास प्लेगाचा प्रादुर्भाव फारसा झाला नव्हता. आणि वऱ्हाड तर प्लेगापासून पूर्णपणें अस्पृष्ट होतें. डायमंड ज्युबिलीच्या सुमारास शारदाबाई नागपुरास आल्या होत्या, आणि त्या प्रियंवदाबाईकडे पाहुण्या म्हणून उतरल्या होत्या. बिंबाबाईच्या मास्तरीण-बाई म्हणून त्या खरोखर घरकुट्टयाच्याकडे उतरावयाच्या. पण घरकुट्टयांकडील अस्सल नागपुरी राहणी, विशेषेंकरून त्यांच्या घरात प्रिय असलेली जवसाच्या तेलाची फोडणी शारदाबाईस आवडत नव्हती. शिवाय घरकुट्टयाच्याकडे बिंबाबाईसंबंधाने आपणांस बरेच प्रश्न विचारण्यांत येतील अशी भीति होती. कदाचित शारदाबाईंस तिकडे न उतरण्यास तेंच कारण अधिक प्रबल असावें असे वाटतें. तथापि आमच्याकडे का उतरला नाहीं, म्हणून घर-कुट्टयानीं प्रश्न केला तर त्यांच्या दुसरीकडे उतरण्याचें समर्थन करण्यास उपयोगी पडेल इतपत प्रियंवदेच्या नवऱ्याचे आणि शारदाबाईचें थोडेसें नातेंहि होतें. याशिवाय आणखीहि एक गोष्ट सांगतां येण्याजोगी होती. रामभाऊचे वडील आणि शारदाबाईचे वडील हे दोघेहि काहीं दिवस पुण्यास मेरुशास्त्री गोडबोल्यां-पाशीं संस्कृत शिकत असत. ही गोष्टहि त्याच्यामधील दुव्यासारखी होती. तथापि ज्या गोष्टीला शारदाबाई भीत होत्या त्या गोष्टीला त्यांनां टाळता आलें नाहीं. अनंतराव घरकुट्टे हे त्यानांच भेटण्यासाठीं आले.

"मग ती कारटी पुनर्विवाह लावणार आहे वाटतें ?"

"कोण बिंबाबाई ? मला पक्के ठाऊक नाहीं, तथापि ती पुनर्विवाह लावील अशी माझी कल्पना आहे."

"तुम्हांस रायपुरास जाऊन रहाण्यास उत्तेजन देण्याचा माझा मुख्य हेतु एवढाच होता कीं तुम्हीं तिला त्या भिकारड्या गवय्याच्या नादांतून सोडवावें."

"आपण मला तसें स्पष्ट कांहींच सांगितलें नव्हतें."

"तें सांगायला कशाला पाहिजे ? जीं माणसें आपल्या दर्जाचीं नाहींत त्यांच्याशीं फ़ार स्नेहसंबंध ठेवणें मोठ्या घराण्यांतील स्त्रियांनां योग्य नाहीं

हें तुम्हांला स्वतःला समजलें पाहिजे आणि तुम्ही स्वतः सांगायला पाहिजे."

"मला तुमचा दर्जा ठाऊक नाहीं आणि त्या गायनमास्तरचाहि ठाऊक नाहीं. हरिभय्या तुमच्यापेक्षां कुळानें कमी नाहीं, हें मात्र मला ठाऊक आहे. त्याच्या पूर्वजानीं पेशवाईसाठीं देह खर्ची घातले आहेत."

"त्यावरून दर्जा ठरत असतो काय? त्याचें उत्पन्न काय आहे?"

"मी कोणाच्या उत्पन्नाची चौकशी केली आहे? बरें पण हरिभय्याला तिकडे पाठविलें कुणी?"

"मीच घेऊन गेलो होतो."

"मग?"

"पण मला असें वाटलें नाहीं कीं हा श्रीमंत मुलगी पाहून तिला भुरळ घालील आणि लग्न लावण्याची खटपट करील. त्याच्या मनात काय आहे तें मला ठाऊक आहे. एवढ्या इस्टेटीचा कारभार जो माझ्या हातीं आहे तो हळूंहळूं आपल्या हातात घ्यावयाचा आहे. तो कऱ्हाडा लुच्च्या आहे म्हणून मला पुष्कळांनीं सांगितले होतें. पण मीच मूर्ख, मी चोराच्याच हातीं किल्या दिल्या."

"त्याला इस्टेटीचा लोभ आहे हें कशावरून?"

"काय तुम्हींच त्या गाढवाचा पक्ष घेऊन माझी फेरतपासणी करायला लागलां!"

"मला फेरतपासणी नको आहे. पण तुम्ही ज्याअर्थी आपल्या मुलीच्या संबंधानें आणि हरिभय्यासंबंधाने बोलणें काढलें आणि मी आपलें कर्तव्य केलें नाहीं, मी तुमच्या मुलीला वाईट मार्गाला लावलें, असा ज्या अर्थी तुम्ही माझ्यावर आरोप करतां त्याअर्थी मला अगोदर हरिभय्यानें किंवा तुमच्या मुलीनें वाईट काय केलें तें समजलें पाहिजे."

" तुम्हांला पुनर्विवाह वाईट वाटावयाचाच नाहीं. तुम्हाला पुनर्विवाह करावयाचाच असेल म्हणून तुम्ही पुनर्विवाहाची तरफदारी करतां."

शारदाबाईनां थोडेसें आपणांस कोणी पकडल्यासारखें वाटलें. त्यांनां क्षणभर चमकल्यासारखें होऊन त्या म्हणाल्या,

" मी शिक्षकाचें काम करण्यास गेले कीं, तुमच्यातर्फे तिच्या पुनर्विवाह-निषेधासाठीं गेले ? त्या कार्यासाठीं मी जावें अशी आपण स्पष्ट इच्छा कोठें कळविली होती ? तुम्ही मजकडे आतां आलांत ते माझी कानउघडणी करण्यासाठीं आला काय ? आपला हाच हेतु असेल तर मी तुम्हास रजा देते ; नमस्कार."

सकाळीं अनंतराव येऊन गेले, व संध्याकाळीं बंडुनाना शारदाबाईस भेटण्यास आले. बंडुनानांची वृत्ति यासंबंधानें अगदी निराळी होती. अनंतरावाचा खरा आक्षेप कोणत्या गोष्टीबद्दल होता, त्यांस काय हवें होतें यासंबंधानें पूर्ण खुलासा बंडुनानानीं अधिक स्पष्ट शब्दांनीं केला आणि आपली सहानुभूति बापाच्या हेतूशी नसून बहिणीच्या वर्तनाशीं आहे, आणि जेव्हां पुन्हा तिची भेट होईल तेव्हा तसें तिला सरळपणें सागा असें त्यानें सांगितलें. त्यानें आपल्या बापाच्या पुनर्विवाहनिषेधाची मीमांसा केली ती येणेंप्रमाणें :

" बाबाना पुनर्विवाह ही गोष्ट धर्मशास्त्रविरुद्ध आहे म्हणून नको आहे अशातला भाग मुळींच नाहीं. पुनर्विवाह झाला म्हणजे बिंबा ही बाबांच्या तंत्रानें न वागतां हरिभय्याच्या तंत्रानें वागूं लागेल म्हणून नको आहे. आमचे बाबा नागपुरातील एका विद्वान वकीलाचे अनुयायी आहेत. तो वकील अगदी वृद्ध आहे, तथापि त्याच्या हातीं चार पाच विधवांच्या इस्टेटी आहेत. त्या वकीलास त्या विधवानीं नीटपणानें वागावें असें मुळींच वाटत नाहीं. तरुण विधवा त्या उनाडकी करणारच, त्यानां जर सच्छीलाचा उपदेश केला तर त्या आपल्या तंत्रानें मुळींच वागणार नाहींत त्यांस जें हवे आहे तेंच आपण सुलभ करून दिलें, तरच आपल्या तंत्रानें रहातील. यासाठीं त्यांनां देखणे असे

कारकून हे वकील पाहून देतात. त्यांचें धोरण असें असतें कीं, लग्न झालेला कारकून पाहून द्यावा, तो देखणा असावा, त्याला कांहीं दिवस विधवेसह इस्टेटीच्या गांवीं पाठवावें, कांहीं दिवस नागपुरास ठेवावे. पुनर्विवाहाची कल्पना त्या विधवांच्या आणि कारकुनाच्या मनांत शिरतां कामा नये, दुसरे कांहीं घोटाळे झाले तरी हरकत नाहीं. बाबा त्यांचेच चेले, पण बाबानीं चूक केली ती ही कीं, हरिभय्या लग्न झालेला नव्हता. हरिभय्या लग्न झालेला असून त्यानें दुसरे कांहीं घोटाळे केले असते तर बाबाची हरकत बिलकुल नव्हती. जे घोंटाळे होतील ते सर्व 'निंदक लोकांच्या खोट्या अफवा' असें म्हणावें म्हणजे झाले अशी एकंदर आमच्या बाबाची वृत्ति आहे. अर्थात या सर्व गोष्टी होण्यापेक्षा माझ्या मतानें पुनर्विवाह झालेला बरा असेंच आहे."

अनंतराव घरकुट्टे पुढें कायदा पहात बसले. त्यानां कायद्यांत पहावयाचे होतें हें कीं, पुनर्विवाह झाल्यामुळें विधवा आपल्या मुलाची पालक होण्यास नालायक ठरते किंवा ठरत नाहीं असा पूर्वीचा निकाल नसल्यास कोणती विचार-पद्धति तिला नालायक ठरविण्यास, आणि आपणांस स्वतःला लायक ठरविण्यास उपयोगी पडेल. त्यानीं आपल्या एका वकील मित्राच्या साहाय्यानें 'रीझनिंगची' पद्धति ठरविली आणि पुनर्विवाह झाल्यास कोर्टास अर्ज कसा द्यावयाचा याचाहि विचार करून ठेवला. ती 'रीझनिंगची' पद्धति येणेंप्रमाणें होती :—

जो अर्ज करावयाचा त्याचा हेतु विधवेच्या हातून अधिकार काढून तो तिच्या बापाच्या हातीं द्यावा अशी मागणी करण्यासाठीं अर्ज करावयाचा. या प्रकारच्या अर्जास हरिहरराव तांबडे यांच्या कांहीं आप्तांची संमति मिळेल अशी घरकुट्टयास खात्री होती. कां कीं, बिंबाबाई आपल्या नवऱ्याच्या आप्तांस आश्रिताप्रमाणे वागवी म्हणून ओरड अनंतरावाच्या कानीं आलींच होती. त्या आप्तांस हरिभय्याचा उत्कर्ष तर विशेष दुःसह होईल, आणि याचसाठीं इस्टेटीचा कारभार मुलीच्या हातचा काढून बापाच्या हातीं द्यावयाच्या योजनेस ते पाठिंबा देतील यांत शंका नाहीं. हरिभय्या हरिहररावांची इस्टेट चालवावयास धर्मदृष्ट्या तसेच व्यवहारदृष्ट्या अत्यंत नालायक मनुष्य आहे. हरिहरराव

स्वर्गांतून हरिभय्याविषयीं काय बरें म्हणत असतील ? याप्रमाणें धार्मिक बुद्धि देखील हरिभय्याच्या इस्टेटीच्या व्यवस्थापकपणाविरुद्ध मांडता येण्याजोगी आहे. याशिवाय हरिभय्याचें हित हरिहररावांचा मुलगा मेला असतां वृद्धिंगत होणार आहे व यासाठीं हरिभय्याची वृत्ति इस्टेटीचा जो वारस त्याचे प्राण घेण्याकडेच होणार. मुलगा मरून मुलाची आई वारस झाल्यास ही सर्व इस्टेट तांबड्यांच्या घराण्यांतून जाऊन मोघ्याच्या घराण्यांत जाणार म्हणजे देशस्थाच्या घराण्यांतून जाऊन कऱ्हाडयाच्या घराण्यात जाणार. तर यासाठीं हरिहररावाच्या वारसाला हरिभय्याच्या तावडींतून सोडविणें आणि आपल्याचें रक्षण करणें आणि जावयाच्या वंशाची नीट काळजी घेणें हें आपलें कर्तव्य आहे असें देखील अनंतरावांस वाटूं लागलें.

आपण मुलीच्या हातांतून नातवास काढून घेतलें आणि इस्टेटीचें व्यवस्थापकत्व आपणच घेतलें म्हणजे मग हरिभय्याला उपजीविकेचें साधन तें काय राहील? मग पुनर्विवाह केल्यानें त्याची हरदाशीहि चालणार नाहीं, आणि मग तो आपणांस इस्टेटींतून दरमहा बायकोसाठीं काहीं तरी मिळावें म्हणून आपल्याकडे येईल आणि त्याला आपण कसें चापून बोलूं इत्यादि गोष्टी त्यांच्या मनांत येऊन मधून मधून त्यांस शेखमहंमदी गुदगुल्या होत.

अनंतरावानीं मी पुढें काय करणार आहे यासंबंधानें मुलीस स्पष्ट कळवून पुनर्विवाह बंद पाडण्याचा प्रयत्न केला; तथापि मुलीनें पुनर्विवाह करायचा तो केलाच.

उमरावतीच्या कॉंग्रेसच्या वेळेस उमेशचंद्र बानर्जींचें व्याख्यान संपल्यानंतर न्या. रानडे क्लबाच्या दाराशीं गाडींत बसावयास आले तेव्हां एका वृद्ध गृहस्थानें "तुम्ही पुनर्विवाहाची चळवळ सुरू करून अलीकडच्या बायकांना अगदीं बिघडवून टाकलें आहे" म्हणून मोठ्या संतापयुक्त शब्दांनीं न्यायमूर्ती रानडयांची संभावना केली ती गोष्ट पुष्कळांस आठवत असेलच. ते गृहस्थ दुसरी तिसरी व्यक्ति नसून आपले परिचित गृहस्थ अनंतराव घरकुट्टे, रिटायर्ड ई. ए. सी. हेच होत.

## प्रकरण १९ वें

# प्रोषितभर्तृका.

डायमंड ज्युबिलीच्या दिवशीं प्रियंवदेकडे शारदाबाई ही पाहुणी म्हणून उतरली होती. त्यावेळेस प्रियंवदेस बोलावयास एक सुशिक्षित बाई मिळाली म्हणून मोठा आनंद झाला होता. प्रियंवदेला आपले आयुष्य थोडेबहुत कंटाळवाणें झालें होतें; प्रियजनविरहामुळें जें कांहीं मनास वाटत असे तें वाटतच होतें, पण तें मोकळेपणें बोलावें तरी कोणापाशीं? सासूपाशीं प्रियंवदा जरी ब-याच मोकळ्या मनाने वागे आणि तें वागणें इतर सास्वासुनाचा संबंध पाहिला म्हणजे अत्यंत सलोख्याचे आणि सलगीचे दिसे, तरी त्या बोलण्यांत वयाच्या अंतरामुळे संयम होताच; सासूबाईशी मैत्रिणीचें नातें उत्पन्न होण्याचा संभव नव्हता. सासूबाई वडील, त्यांच्यापाशीं बोलावयाचें तें त्याचा मान राखून बोलावयाचें, आणि आपल्या मनोभावना फार व्यक्त होऊं द्यावयाच्या नाहींत, वगैरे भावना जाण्यासारख्या नव्हत्या. आपल्या नवऱ्याचीं पत्रें वाचून दाखविण्यास, नवरा किती चांगला आहे, तो दुसऱ्या बायकांच्या नवऱ्यासारखा मुळींच नाहीं इत्यादि गोष्टी बोलण्यास प्रियंवदेस कोणी मैत्रीण नव्हती. बर्डी-वरील मोदी आळींतील साठयांची थोरली सून थोडी शिकलेली होती. पण शिकलेली म्हणजे किती, तर इंग्रजी दोन पुस्तके. त्या वेळची स्त्रीशिक्षणाची कल्पना इतकी अल्प होती कीं, वऱ्हाड हें सुधारणेचे व स्त्रीशिक्षणाचे गृह समजलें जाई, आणि त्या वऱ्हाडांत अल्प शिक्षित मुलींच्या बडेजावाच्या मौजा दिसत. एका वकीलांची मुलगी जेमतेम थोडेसें लिहितावाचतां येणारी, पण तिला जें शिक्षण मिळालें त्याबद्दल तिच्या बापाची स्तुति सुधारक पत्रांत भरलेली असे. त्या मुलीनें काय केलें तर एक जुनें मोरोपंताचें काव्य प्रसिद्ध केलें. काव्य केलें मोरोपंतानें, त्यावर टीपा लिहिल्या नवऱ्यानें, पुस्तक छापावयास पैसे दिलें बापानें आणि छापलें मुंबईच्या एका प्रसिद्ध छापखानदारानें, मात्र तें प्रसिद्ध केलें मुलीनें! इतकी ती मुलगी सुशिक्षित होती, पण तेवढ्याबद्दलच

पुण्याच्या सुधारक पत्रांनीं तिजवर स्तुतीचा वर्षाव करावा असें ते मौजेचे दिवस होते.

त्या दिवसात व पुढें अनेक वर्षेपर्यंत शिकलेल्या बायकांसंबंधानें लोकांस फारच कौतुक वाटे. एवढेंच नव्हे तर आपल्या बायका शिकलेल्या आहेत असें खोटें भासविण्याची लोकात हौस होती. बायकाचें व्याख्यान म्हणजे पुष्कळ गर्दी होई, त्या व्याख्यानात बहुधा काहीं नसावयाचें पण तें व्याख्यान एका बायकोनें दिलें हेंच त्यात विशेष असावयाचें व हीं व्याख्यानें बहुधा स्त्रीशिक्षणावर असावयाचीं. या तऱ्हेचें व्याख्यान देवविण्यासाठी स्वतःस सुधारक समजणाऱ्या आणि आपलें घरहि सुधारलें आहे, असें दाखवूं इच्छिणाऱ्या लोकाना आपली बायको सुशिक्षित आहे, असें दाखविण्यासाठीं मोठी खटपट करावी लागे. एकदां एक गृहस्थ एका परिषदेचे अध्यक्ष झाले. त्या परिषदेच्या आठवड्यात त्याच गावीं महिला परिषदहि भरली होती; तेव्हा त्या परिषदेच्या अध्यक्षाच्या जागीं त्या पुरुष परिषदेच्या अध्यक्षाच्या बायकोनें अध्यक्ष व्हावें हें अस्वाभाविक नव्हतें. शिवाय ती परिषद महाराष्ट्राबाहेर असल्यामुळें आणि या गृहस्थाच्या कुटुंबाच्या सुशिक्षिततेच्या मर्यादा लोकास ठाऊक नव्हत्या यामुळे त्या गृहस्थाच्या पत्नीस आव्हान करण्यात आलें. तिला इंग्रजी येत नव्हतें, व मराठी वाचताहि बेताबाताचेंच येत होतें. पण तिच्यासाठीं एक इंग्रजींत व्याख्यान तयार करण्यांत आलें आणि परिषदेच्या दिवशीं त्या बाईसाहेबाचा घसा बसला असल्या-कारणानें तें व्याख्यान एका बंगाली स्त्रीकडून वाचविण्यात आलें. तें व्याख्यान नवऱ्यानें तयार केले होतें हा आरोप सर्वस्वी खोटा आहे. नवरा ज्या एका देशसेवक समाजास वर्गणी भरीत होता, त्या समाजांतल्या एका देशसेवकास हें भाषण तयार करण्यास सागितलें होतें. तें व्याख्यान झाल्यानंतर 'अमूक बाईचीं मतें' म्हणून त्या व्याख्यानाची इंग्रजी पत्रात चर्चा होऊं लागली!! अशा प्रकारची ठकवाठकवी इतकी सर्वसामान्य आणि राजरोस झाली होती कीं, एखाद्या स्त्रीचें व्याख्यान तिनें स्वतः लिहून आणून वाचलें तर तिला खोटें बोलणारी समजत.

या प्रकारच्या लबाड मसलतींत वर्तमानपत्रें व मासिकेंहि असत. स्त्रियांकडून एखादा लेख मागवावयाचा व तो लेख आल्यावर त्यांतले वरचें नांव आणि एखाद दुसरी ओळ ठेवून सर्व मजकूर अजिबात बदलावयाला, आणि आमच्या मासिकास सुशिक्षित कुलस्त्रियाची मदत आहे, स्त्रीलेखिका आमच्याकडे फार आहेत असा पोकळ बोभाटा बरींच वर्तमानपत्रे व मासिकें करीत असत. त्याचा परिणामहि एक तऱ्हेनें उलट झाला होता. ज्या लोकांना आपले लेख स्वतःच्या नांवावर मासिकाकडे आणि वर्तमानपत्राकडे गेले तर छापले जाणार नाहींत असें वाटे अशी मंडळी आपले लेख आपल्या बायकोच्या नावानें पाठवीत. या तऱ्हेच्या गोष्टी करण्यात त्या वेळच्या समाजाचे हेतु स्त्रियाचा गौरव करावा या प्रकारचे होते काय ? मुळींच नाहीं ; तर आपल्या घरात शिकलेली आहे म्हणून ज्याप्रमाणें डौली नवऱ्यास सपादणी करावीशी वाटे, त्याचप्रमाणें डौली संपादकास आमच्या वाचकमंडळात व लेखकांत बराच गोडस वर्ग आहे असे दाखवावेसें वाटे. शेक्सपिअर म्हणे ' फ्रेलटी दाय नेम इज वूमन ' पण आम्ही तर असें म्हणतो कीं ' व्हॅनिटी दाय नेम इज मॅन .' ' व्हॅनिटी ' च ती ; कारण ते ' बायकाचे लेख ' छापून गिऱ्हाइकें वाढत होती अशातला भाग नेहमी नसे. कांहीं सुधारकपत्रें असलीं ढोंगे चालविता चालविताच कर्जबाजारी होऊन मरून गेलीं.

अशा प्रकारच्या दिवसात आमच्या प्रियंवदेस मैत्रिणींचा अभाव वाटत असे आणि आपण अधिक शिकल्याने थोड्याबहुत स्त्रीवर्गाच्या बाहेर पडलों असें वाटे यांत नवल तें काय ? पुष्कळदा याच्यामुळे आपल्या नवऱ्याविषयीं गोष्टी मोकळेपणानें बोलावयाच्या झाल्या म्हणजे प्रियंवदा स्त्रियांपाशीं न बोलता आपल्या दिनकर भावोजीपाशीं बोले.

दिनकर भावोजी आणि प्रियंवदाबाई यांचे संबंध अत्यंत स्नेहभावाचे होते, आणि विवाहोत्तर काहीं दिवसपर्यंत तिच्या लाडक्या रामभाऊबरोबर तिचें वर्तन लज्जाभयमिश्रित होतें. दोघांची ओळख होती पण दोघांचें जें लग्न झालें तें दोघाच्या वडलाच्या इच्छेनें. या दोघाचा विवाह झाला तो प्रौढविवाह

होता, प्रीतिविवाह नव्हता. दोघांमध्यें अनुनय, प्रेमाची भाषा हीं होऊन लग्न ठरलें नव्हतें. प्रियंवदेस लग्न व्हावें असें वाटत होतें. पाहिलेला वर तिनें डोळ्यांनीं पाहिला होता, तो पसंत पडला होता. त्याच्याविषयीं विचार सुरूं झालें होते, हुंड्याच्या बोलण्यामुळें लग्न बिघडतें काय अशी भीति वाटूं लागली होती, आणि ती सर्व प्रकारचे सद्गुण रामभाऊंच्या ठिकाणी कल्पूं लागली होती. आणि रामभाऊंचें स्मित हें फार मोठ्या किमतीचें आहे असें तिला वाटूं लागलें होतें. तथापि विवाहपूर्व संघटण नव्हतें. एकमेकांच्या अंतःकरणाची एकमेकांस ओळख नव्हती, एवढेंच नव्हे तर विवाहापूर्वी आपल्या मनांत एखाद्या तरुणाविषयी प्रेम उत्पन्न होणें ही गोष्ट पाप तर नसेल ना? आपलें लग्न जर रामभाऊंशीं लागलें नाहीं व दुसऱ्या कोणाबरोबर लागलें तर आपण रामभाऊंवर जें प्रेम करतों तें परपुरुषावर तर होणार नाहीं ना? आपलें मनच कसें विचित्र आहे! पुस्तकांत वर्णन केलेल्या बायकांप्रमाणें तें नाहीं. पुराणांतल्या साध्वीनें, तिच्या लग्न झालेल्या पतीखेरीज दुसरा पुरुष मनात देखील चिंतिला नसतो, आणि माझें जर रामचंद्राबरोबर लग्न झालें नाहीं आणि दुसऱ्याच कोणाबरोबर झालें तर त्या मनुष्याखेरीज आपण दुसऱ्या कोणासहि मनानें चिंतिलें नाहीं असें पुराणांतल्या बायकांप्रमाणें मला म्हणतां येईल काय? अशा तऱ्हेच्या भावना तिच्या मनांत जागृत होत होत्या. तिला विवाहसंस्थेचें मोठें कोडे पडावयास लागलें होतें. दोन्ही पक्षांच्या आईबापांचा देण्याघेण्याचा आंकडा जुळला म्हणजेच प्रेम करावयास मोकळीक आहे काय? नाहीं तर नाहीं काय? विशिष्ट प्रेमाचें पवित्रत्व किंवा अपवित्रत्व आईबापांच्या आंकडेनुसार अवलंबून ठेवावयाचें काय? प्रेमोदधीला भरते छत्तीस गुणांचे किंवा पैशाचे आंकडे जुळतील तेव्हांच नेमकें कसें येईल? इत्यादि कल्पना तिच्या मनांत येऊन प्रेमविकार मनाला हेलकावे देत होता. प्रेमविषयक कर्तव्याविषयीं अनेक संशय मनाला येत होते: विवाहाची घटना आणि स्थिति हीं प्रेमावर अवलंबून ठेवावीं हें योग्य आहे कीं प्रेमाच्या प्रवाहाची दिशा विवाहावर अवलंबून ठेवावी यांत आपलें कर्तव्य तरी काय आहे याविषयीं तिला अनेक प्रश्न

उत्पन्न होत प्रेमविकारांच्या बाबतींत सल्लागार तरी त्या दिवसांत तिला कोण मिळणार ? मनांत ज्या प्रेमभावना उत्पन्न होत त्यांस व्यक्त करण्याचीच चोरी होती एवढेंच नाहीं, तर त्या तशा उत्पन्न झाल्या हें स्वतः आपल्यापाशींच कबूल करण्याची चोरी होती.

प्रियंवदाबाई लग्न होऊन सासरीं आल्या तरी त्यांची व नवऱ्याची ओळख एकदम झाली नाहीं. दहा पंधरा दिवस त्या दोघांनां दूर ठेवण्यांत आलें होतें, व त्यांची एकमेकाविषयीं उत्कंठा वाढविण्यांत आली होती. नवऱ्याशीं बोलावयाची चोरीच कांहीं दिवस होती. आणि दोघांची शास्त्रोक्त ओळख झाल्यानंतर देखील कांहीं दिवस दोघांनीं उघडपणें एकमेकांबरोबर गप्पा मारीत बसावें हें बरें दिसत नसल्यामुळें बंदच होते. नवराबायकोचें एकमेकांशीं वर्तन कसें असावें यासंबंधानें नेहमी परिचित जो रिवाज होता त्यापासून निराळा आयुष्यक्रम कांहीं महिने तरी दोघास आचरता आला नाहीं. प्रौढ विवाह झाला तरी नवराबायकोनीं एकमेकाशीं कसें वागावें याच्या मर्यादा कोठें नाहींशा झाल्या ? रामभाऊंच्या वडिलाच्या मनांत दोघांनां उघडपणे एकत्र बसण्याचे, गप्पा मारण्याचें, दिवसा ढवळ्या सुनेनें नवऱ्याच्या खोलींत जाण्याचे स्वातंत्र्य देण्याची इच्छा होती पण तसें एकाएकीं करतां आलें नाहीं. आसपासच्या बायकांच्या 'योग्य रिवाज काय' म्हणून ज्या कल्पना होत्या त्यांचें दडपण प्रियंवदेच्याच मनांवरून एकाएकीं निघालें नव्हतें तथापि प्रियंवदेची जी 'धीटपणा' ची वागणूक पुढें दिसून येऊं लागली ती बरीच लवकर पण क्रमाक्रमानेंच दिसून येऊं लागली.

रामभाऊंचा आणि प्रियंवदेच्या शिक्षणात परिक्षामोजूंच्या दृष्टीनें जरी फारसा फरक नव्हता तरी दोघाच्या विचारक्षेत्रांत पुष्कळच फरक होता. रामभाऊ लहानपणीं पुष्कळ उनाडकी केलेला, लाठी आणि कुस्त्या यांत प्रावीण्य मिळविलेला असा होता. त्याच्या अंगीं पुष्कळ गुण आडदांडपणाचे होते. आखाड्यांत बरीच ब्राह्मणांची मंडळीहि होती. त्यांत एक जुन्या प्रसिद्ध शास्त्र्याचा मुलगा होता. त्यास रामभाऊनें शरीरसंपत्ति वाढविण्यासाठीं

मांसाहार करणें अवश्य आहे हें तत्त्व इतकें पटवून दिले कीं, मुलगा पुढें घरीं चोरून मांस शिजवीत असे. या मुलासंबंधानें एक मौजेची कथा प्रचलित आहे. एके दिवशीं मुलानें बाप रात्रीं निजावयाला गेल्यानंतर आपल्या बापाच्या 'गार्हपत्या' वरच मटनचें भांडें रसा तयार करण्यासाठीं, उद्यां बाप उठण्याच्या अगोदर तें काढून घेऊं या अपेक्षेनें शिजवावयास ठेवलें. पण बाप मुलाच्या अगोदरच उठला, आणि आपल्या होमशाळेंतील कुंडावर काय आहे तें पाहूं लागला; आणि भांड्यांत काय आहे हें त्याला समजल्यानंतर बापानें सक्षौर प्रायश्चित्त घेतलें. या शास्त्रीबोवांचे चिरंजीव पुढें स्वतःहि व्याकरण, ज्योतिष, वेदांत इत्यादि विषयांत चांगले शास्त्रीबोवा झाले आणि त्यानीं कुस्तीवर पुस्तकें लिहिली आणि रामभाऊसंबंधानें त्यानीं कायशी 'मल्लेषु मल्लोऽभवत्', 'वीरेषु वीराकृतिः' इत्यादि शब्द असलेली कविता केली होती. हिंदु-मुसुलमानांचा दंगा झाला तर आपल्याला आपली लाठी चांगली मोकळेपणानें फिरवितां येईल अशी आशा हायस्कूलांत असलेल्या रामभाऊस व त्याच्या आखाडे मित्रांस वाटत होती. दंगा सुरू झाला म्हणजे पोलीस तेथून कसे नाहींसे होतात, आणि थांबल्यानंतर पकडापकडी करावयास कसें येतात याचें रामभाऊ रसभरित वर्णन करी. रामभाऊ या सर्व निरनिराळ्या समाजांगांची माहिती असलेला होता, आणि प्रियंवदा बऱ्याच अंशीं पडद्यांत असलेली म्हणजे जिचें परिचयक्षेत्र, अवलोकनक्षेत्र आणि वाचनक्षेत्र यावर करडी नजर ठेऊन परीक्षांचें शिक्षण तिच्या आईबापांनीं मॅट्रिकपर्यंत करविलें, अशी होती. या दोघांची बरोबरी कशी असेल ? प्रियंवदेस रामभाऊ जरी रूपानें आवडला तरी तो "गोंडसपणाचा ठेवा – आणि कुसकरून खावा," एवढ्याच भावनेनें आवडला होता. आपलें शिक्षण मडमेच्या हाताखालीं झालें असल्यामुळें आपण रामभाऊंपेक्षां अधिक चांगलें इंग्रजी बोलतों असाहि तिला थोडा गर्व वाटे. पण तिची आपल्या उच्चत्वाची भावना पुढें कमी झाली.

प्रियंवदेची आपल्या नवऱ्याशीं जसजशी अधिकाधिक ओळख होऊं लागली तेंव्हां आपला नवरा आपल्यापेक्षां निराळ्या अनुभवानें युक्त आहे आणि

आपलें शिक्षण जरी त्याच्याशीं कांहीं पुस्तकांवर पुस्तकी वादविवादास पुरेसें असलें तरी घराबाहेरच्या जगाशीं नवऱ्याची अधिक ओळख आहे, आणि आपली नाहीं; आपण केवळ स्त्री म्हणून बांधल्या गेलेल्या गाईसारख्या आहोंत असें तिला भासून आलें, आणि आपलें लग्न झालें हें बरें झालें; नवऱ्यामार्फत तरी आपणांस बाहेरच्या जगाची ओळख होत आहे एवढेंच नव्हे तर आपल्यास बाहेरच्या जगाची ओळख होण्याचें द्वार तेच आहे असें तिला भासलें. वाईट गोष्टी मुलींच्या कानीं जाऊं नयेत या भावनेनें ज्या कांहीं गोष्टी प्रियंवदेला आई-बापांनीं अगदीं कळूं दिल्या नाहींत, त्या पुढें तिच्या रामचंद्रामार्फत कळूं लागल्या आणि लग्नापूर्वी जी मंडळी मोठी सभ्य म्हणून वाटत होती त्याच्या अनेक लीला तिच्या कानीं आल्यामुळें खऱ्या खुऱ्या जगाविषयीं आपणांस बापानें मुद्दाम अज्ञानांत ठेवलें होतें पण, आपला नवरा आपणांस खरें जग कसें आहे याची कल्पना देतो हें कळलें; आणि जगाच्या दोन वाईट गोष्टी आपणांस कळल्या तर तेवढ्यानें आपण वाईट मार्गानें जाणार नाहीं इतका आपल्या नवऱ्याचा आपल्यावर विश्वास आहे याबद्दल तिला आनंद झाला. बाहेरच्या जगाची वस्तुस्थिति आणि तीवर मतें याचें ज्ञान तिला नवऱ्यामार्फतच झाल्यामुळें ती बहुतांशीं केवळ नवऱ्याच्याच मतांचा पुनरुच्चार नकळतच करूं लागली. तिच्या आवडीहि नवऱ्यासारख्याच होऊं लागल्या आणि नवऱ्याविषयीं तिला फार अभिमान वाटूं लागला. व नवऱ्याच्या विद्याविषयक हुषारीपेक्षां नवऱ्याची गांवातली चळवळी व्यक्ति या नात्यानें जी कामगिरी होई तिनेंच तिला आनंद होई. शाळेतले विद्यार्थी मास्तर वर्गाबाहेर गेला म्हणजे दंगा कसा करीत याविषयींच्या गोष्टी ऐकण्यांत तिला आनंद वाटे आणि असा दंगा मुली करीत नाहींत याबद्दल तिला खेद वाटे, आणि मुलीनां असा दंगा कोणी करूं देणार नाहीं या प्रकारची जाणीव असल्यामुळें मुलींच्या आयुष्यक्रमाबद्दल तिला फार राग येई. आपण नवऱ्याबरोबर हिंडावें एवढेंच नव्हे तर भाजी, दशम्या बांधून घेऊन दूर दूर वीस-पंचवीस मैल फिरायला जावें असें वाटे. पुरुषांस ज्या गोष्टी करतां येतात त्या गोष्टी तर आपणास करतां येणार नाहींतच, पण स्त्री या नात्यानें ज्या गोष्टी करण्याचा आपला हक्क आहे त्या गोष्टी देखील आपणांस कुलीनत्वाच्या खोट्या

कल्पनांमुळें करतां येणार नाहींत. एकदा तीं दोघें अशी दूर फिरायला जाऊन चांदण्यांत परत येत असतां तिनें कांहीं संवाद ऐकला.

" हा ब्राह्मण मुलगा कोण पोरीला घेऊन फिरायला आला आहे ? "

" ही नाशिककरीण असावी. "

" काय, अलीकडे इतकी लहान मुलें अंगवस्त्र ठेवायला लागलीं ! पण ती नाशिककरीण कशावरून ?"

" आम बाई इतकी फिरायला कशी येईल ? "

" बायको नाहीं कशावरून ? "

" बायको कशी असेल ? ती पहा कशी त्याच्या खांद्याला खांदा लावून चालली आहे ! लग्नाची बायको इतकी निर्लज्ज थोडीच बनणार आहे ? "

वरील संवाद ऐकून प्रियंवदा नवऱ्यास म्हणाली, " स्त्रीनें पुरुषाची सहचरी होणें आणि त्याला आपण मोहक होऊं असें बनणें हा पत्नीचा हक्क आहे कीं वेश्येचा हक्क आहे ? "

" अर्थात पत्नीचा आहे, पण पत्नीस तो हक्क बजावण्याचें कारण नाहीं असें लोकांनां वाटतें. नवरा लग्नानें बायकोच्या हातात अडकून पडलाच आहे — जाईल कोणीकडे तो ? बायकोनें अर्थात नट्टापट्टा करून त्यावर आपला मोहनास्त्राचा प्रयोग करण्याची आवश्यकता नाहीं – आणि एखादी बाई जर नवऱ्याला असा ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न करील तर नवरा बायकोच्या तंत्रानें वागेल, मग तो आईच्या तंत्रानें कसा वागेल ? यासाठीं समाजांत ' मातृभक्ति ' रहाण्यासाठीं स्त्रीनें नवऱ्याला फार प्रिय होण्याचा प्रयत्न केला तर त्यालाहि आळा घातला पाहिजे, असें बऱ्याच प्रौढ स्त्रियांचें मत आहे. कांहीं मोठमोठ्या मालगुजार व देशमूख घराण्यांत आईनें मुलाला त्याची व सुनेची ओळख होण्यासाठीं अंगवस्त्र पाहून दिलेलें आहे. म्हणजे आपला मुलगा सुनेच्या तावडींत मुळींच जायला नको. "

" स्त्रियांचें नवऱ्यावर प्रेम वाढूं नये याला बायकाच आडव्या जातात असें दाखवून पुरुषांचा दोष कोठें नसतोच असें दाखवितां काय ? "

" पुरुषांचा दोष नसतो कोणी म्हटलें ? या परिस्थितीच्या कारणासाठीं एक सांगितलें. पुष्कळ पुरुषांनांहि गबाळी बायको आवडते. त्यांना वाटतें गबाळी बायको म्हणजे भोळी. तिच्यात रंगेलपणा नसणार. खुशीनें अगर नाखुशीनें अधिक पवित्राचरण ठेवील अशीहि लोकांची समजूत आहे. आणि या प्रकारच्या परिस्थितीमुळें केवळ बायकांवरच अनिष्ट परिणाम होतो, पुरुषांवर होत नाहीं असें कोठें आहे ? उदाहरणार्थ एखाद्या पुरुषानें किंवा तरुण मुलानें स्त्रीकडे केवळ पाहिले म्हणजे जणूं काय मोठा दोष झाला अशी वृत्ति पुष्कळ लोक दाखवितात. आणि पोषाखी मनुष्य अनीतिमान असणार अशी कल्पना करतात. ऐटदार फेट्यालाहि ' रंडीबाज ' फेटा म्हणण्याची पद्धत आहे. "

" स्त्रियावर पातिव्रत्याच्या कल्पनांचा अतिरेक करून त्या लादाव्या ही गोष्ट घातुक नाहीं काय ? नवरा दुष्ट असला, तरी त्यास देवाप्रमाणें मानलें पाहिजे असले उपदेश समाजांत ढोंगीपणा शिकवावयास कारण होत नाहींत काय ? नवरा कसलाहि असला तरी त्यास देवाप्रमाणें मानलें पाहिजे हें तत्त्व कशासाठीं ? "

" या प्रकारच्या तत्त्वाचा उपदेश मला फार योग्य वाटतो. उदाहरणार्थ मला जर कांहीं रेल्वेतील अपघात होऊन मी कुरूप झालों तर माझी प्रियंवदा माझ्या हातांतून जावयास नको. यासाठीं नवरा कसलाहि असला तरी तो बायकोस आवडला पाहिजे हें तत्त्व मला फारच गोड लागतें. "

" माझ्या रामचंद्राला रेल्वेंत अपघात झाला तर माझें रामचंद्रावर प्रेम कमी न होतां वृद्धिंगत होईल. माझ्या रामचंद्राला कोणी दुखावलें तर मला तें खपणार नाहीं. "

" तर मग सौंदर्यावर प्रेम अवलंबून नाहीं काय ? "

" नाहीं असें मी कसें म्हणूं ? प्रथम पुरुषांचा देखणेपणा, कपड्याची छानछोकी हीच डोळ्यांत भरते पण पुरुषाविषयीं आपलेपणा उत्पन्न झाला

म्हणजे मग सौंदर्यावर प्रेम अवलंबून राहणार नाहीं. पण प्रेम कायम रहावयास परस्परांचा सहवास आणि सहचारित्व हीं नकोत काय? नवऱ्यानें इकडे बायकोस प्रिय होण्यासाठीं कांहीं गोष्टी करूं नयेत आणि बायकोनें मात्र नवऱ्यावर प्रेम करीत रहावें. किंवा उलटपक्षीं स्त्रियांनीं आपलें अस्तित्व नवऱ्यास अधिक रुचकर करण्यासाठीं कांहीं करूं नये आणि तरी देखील नवऱ्यानें तीवर प्रेम करावें ही गोष्ट नवऱ्यास तरी शक्य आहे काय? माझी अशी समजूत आहे कीं, स्त्रियांनीं आपले आकर्षकत्व वाढविण्यासाठीं कांहींच प्रयत्न केला नाहीं तर नवरे बाहेर हिंडायला लागतात."

"या बोलण्यावरून एक कल्पना सुचते ती ही कीं आजच्या समाजांतील स्त्रीपुरुषांसंबंधाची कल्पना पुरुषांनी अंगवस्त्र बाळगावें या तत्त्वाला धरून आहे. धर्मपत्नी ही म्हणजे धार्मिक कृत्यें करण्यासाठींच आहे. पुरुषांनीं 'कामा'-करतां दुसऱ्या कांहीं बायका ठेवाव्यात, त्याला कांहीं हरकत नाहीं, मोठेपणाचेंच ते केवळ लक्षण आहे असें लोकास वाटतें. पुष्कळ लोकांस असें वाटते कीं, स्त्रीनें नवऱ्यास आकर्षक होण्यासाठी खटपट करावी हें तत्त्व लोकांत एकदां कबूल झालें म्हणजे बायका रंगेल होतील आणि त्या रंगेल बनल्या म्हणजे वाटेल त्या पुरुषावर आपल्या आकर्षणशक्तीचे प्रयोग करतील."

या प्रकारच्या संभाषणाचा परिणाम प्रियंवदेवर झाल्यावांचून राहिला नाहीं. भोंवतालच्या परिस्थितीला फाडून काढावें असेंहि तिला वाटे. ती असें म्हणे कीं जर एखादी बाई पोषाखांत ठाकठिकी करूं लागली, नवऱ्याला प्रिय होतील अशा गोष्टी करण्यांतच पुढाकार घेऊं लागली, नवऱ्याची सहचरी होण्यांत आनंद मानूं लागली तर ती नायकिणीसारखी असें लोकांनी कां म्हणावें? पुरुषांचें मनोरंजन करणें, सुंदरवस्त्र विभूषित होणें या सर्व गोष्टींचा वेश्यानांच मक्ता आहे काय? आज असें आहे हें खरें, आणि लोकांची समजूत अशी झाली आहे कीं प्रजोत्पादनार्थ विवाहित स्त्रिया आणि मनोविनोदनार्थीं वेश्या. अशी वृत्ति जोंपर्यंत समाज पेरीत किंवा पिकवित आहे तोपर्यंत समाजामध्यें वेश्या ही संस्था कायम राहील.

प्रियंवदेला आपल्या नवऱ्यापासून वियोगाचे दिवस फारच कठिण वाटत होते; त्यास जीं अनेक कारणें होती त्यांत आपला रामचंद्र हातचा जाणार नाहीं ना अशा तऱ्हेच्या कल्पना तिच्या मनांत येत होत्या हें कारण प्रमुख होतें. स्त्रियांचें किंवा पुरुषांचें कोणाचेहि मन कितीहि खंबीर असलें तरी त्यास अनेक हेलकावे मिळाले तर तें अभंग रहाणार नाहीं. प्रेम जरी दृढ असलें तरी आपण दूर आहों, तेथल्या स्त्रियांनां जाळें टाकायला रामभाऊ जवळ आहे ही गोष्ट तिच्या मनाला वारंवार भासे. आणि आतां आपणास आपले प्रेमसाधनाचें कौशल्य दाखविलें पाहिजे, आपण केवळ नवऱ्याच्या खंबीर मनावर आपल्या आयुष्याचें भवितव्य विलंबून ठेवणें योग्य नाहीं इत्यादि गोष्टी तिच्या मनांत येत. पण य गोष्टी मोकळेपणाने बोलायच्या तरी कोणाबरोबर? इतर बायकांची कल्पनाच अशी झालेली कीं पुरुष ‘ या गोष्टी ’ करायचेच—त्या त्यांनीं करूं नयेत म्हणून बायकांनी प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं. कित्येक बायका उलट रामभाऊ दुसरी बायको तिकडून करून आणणार आहे असें म्हणत. प्रियंवदेनें आपल्या रामचंद्राला अत्यंत मधुर पत्रें लिहावीं, त्यांत आपली वियोगामुळें झालेली मनाची स्थिति व्यक्त करावी, इकडची अनेक प्रकारची खुशखुशीत बातमी लिहावी, आणि अनेक तऱ्हेनें आपल्या पत्राची मार्गप्रतीक्षा नवरा करील असें करावें. पत्राची उत्कंठा लागो आणि त्यामुळें तरी आपल्या अस्तित्वाची वारंवार आठवण राहो असें तिच्या मनांत येई. तिनें आपले दोन तीन पोषाखांतले निरनिराळ्या वेळीं काढलेले फोटोहि रामभाऊंकडे पाठविले होते. तिनें पत्रांत बॅरिस्टर झाल्यानंतर सरकारी नोकरींत शिरणार कीं वकिली करणार, कोणत्या मार्गानें अधिक लोककल्याण करतां येईल इत्यादि गोष्टींची चर्चा करावी.

आजचा लंडनस्थ भारतीय व १८९६–९७ च्या सुमारचा लंडनस्थ भारतीय यांच्या आयुष्यक्रमामध्यें बरेंच अंतर होतें. त्यावेळेस तिकडे जाणारांची संख्या कमी होती, राजे महाराजे देखील थोडेच जात, आणि जे जात त्यांचें कौतुक करण्यांत येई. हिंदुस्थानांतील गरीब लोक तिकडे क्वचित् जात त्यामुळें हिंदुस्थानांतील लोक श्रीमंत आहेत अशी कल्पना तिकडील सामान्य मंडळीच्या

मनांत असे. त्यावेळस आजची सुधारणा देखील फारशी दिसत नव्हती. मोटार बसेसच्या ऐवजीं घोड्यांच्याच बसेस रस्त्यातून दिसत असत. सिनेमा तर ऐकूंहि येत नव्हता. टेलिफोन घरोघर झाला नव्हता, तर विजेवर स्वयंपाक कोठून येणार? खोली उष्ण ठेवण्यासाठीं अमेरिकन रेडिएटर घरोघर झाले नव्हते व घरांतील चिमण्या ह्याच उष्णतेच्या अधिकारी होत्या, आणि त्यावेळेस लंडनमध्ये देखील खेडेपणाच दृष्टीस पडत असे. तथापि जगातील इतर शहरांच्या मानानें लंडनमध्यें अर्वाचीन सुखांची स्वस्ताईहि होतीच. आज ज्याप्रमाणें लंडनमधल्या मुली जेथें फ्लशिंगचे पायखाने नसतील, जेथे गॅसने स्वयंपाक करण्याची सोय नसेल, जेथें सवंग थिएटरें व सिनेमा नसतील अशा प्रदेशांत रहाण्यास नाखूष होतात, तशा त्यावेळेस होण्याचे कारण नव्हते. त्या वेळेस पहिल्या व्हिक्टोरियन काळांतील फाजील सभ्यतेची पद्धति वितळूं लागली होती, आणि स्त्रीस्वातंत्र्य बरेंच वाढूं लागलें होतें. त्यावेळेस काळ्या रंगाच्या हलकेपणाविषयीं कल्पना इंग्लंडांत फारशी पसरली नव्हती. इंग्लंडांतील हिंदुस्थानी मंडळी कठोर टीकेचा विषय झाली नसून अजून कौतुकाचाच विषय होती.

उलटपक्षीं इंग्लंडांतील रीतिरिवाज वगैरे गोष्टींचें लोकांस नवीनत्व वाटत होतें. रामभाऊंच्या पत्रांत प्रारंभीं आत्मकथनविषयक गोष्टी येत, पण त्या लवकरच बंद झाल्या. पुढें बऱ्याच समाजवर्णनपर गोष्टी असत. हिंदुस्थानविषयक गोष्टी क्वचित् असत. बरींच पत्रें काढलीं असतां फारच थोडक्या हिंदुस्थानविषयक गोष्टी सांपडतील. कोठें क्रिस्टल पॅलेसचें, कोठें ब्रिटिश म्यूझियमचे, कोठें सेंट पॉलचें, कोठे हॉटेलाचे अशीं वर्णनें असत. पत्रें मोठीं असत, पण त्या पत्रसमुच्चयास इंग्लंडच्या वर्णनाचें पुस्तक म्हणतां येईल. रामभाऊंच्या पत्रास देशवर्णनाचें स्वरूप केवळ साहजिकरीत्या आलें पण पुढें रामभाऊंनीं तें स्वरूप जास्त वाढविलें आणि ‘ माझीं पत्रें जपून ठेव, तीं एकत्र करून इंग्लंडवर एक पुस्तक प्रसिद्ध करावें असें मी योजिलें आहे ’ असें त्यानीं प्रियंवदेस लिहिले होतें. त्यांच्या पत्रांतील देशवर्णनपर नसलेले तुकडे फारच थोडे होते. १८९७ सालचे थोडके तुकडे वाचकांचें मनोरंजन करतील.

" लाडके, तुझ्या पत्राची मी नेहेमीं औत्सुक्यानें वाट पहात असतों आणि तुला पत्र लिहिण्यासाठीं मीं गुरवारची दुपार मोकळी ठेवीत असतों, तथापि येथल्या लोकांस येथल्या गोष्टींतहि मन घालावें लागतें."

× × ×

" प्रोफेसर गोखले इकडे वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं आले आहेत; त्यांचें वक्तृत्व आणि विषय मांडण्याची शैली यावरून येथील इतर हिंदी लोकांत या तरुण महाराष्ट्रीयाविषयीं आदर उत्पन्न होत आहे. पण पुढारीवर्गामध्यें बराच मत्सर होत असे. इतकी तयारी करून मद्रास व बंगाल येथील पुढारी आले नाहींत त्यामुळें त्यांनां असें वाटूं लागलें आहे कीं या महाराष्ट्रीयाच्या आंकड्यांत चूक निघावी. सर्व पुढारी मंडळीवर देशाचें हित कसें जास्त साधेल या विचाराचा पगडा जास्त नसून जास्त मार्क कोण मिळवितो याच विचाराचा पगडा प्राधान्यानें आहे."

× × ×

" येथें एक खानबहादुर आले होते. हिंदुस्थानी विद्यार्थ्यांनां धार्मिक उपदेश करण्याची 'परवानगी' इंडिया ऑफिसकडून मिळविली. हेतु असा कीं, आपली धार्मिक बुद्धि आणि विद्यार्थ्यांनीं नीतियुक्त आचरण करावें याबद्दल त्यांच्या मनांत असलेली कळकळ इंडिया ऑफिसच्या नजरेस यावी. आणि केवळ लोकोपकाराचें आणि विद्यार्थ्यांस दारू आणि स्त्री यांपासून अलिप्त राहण्यास उपदेश करण्याइतकें सोंवळें काम देखील करण्यास तो सरकारची परवानगी मागतो, असें सरकारास भासून त्यांची 'लायल्टी' व आज्ञाधारकता किती तीव्र आहे हें दिसावें. त्या खानबहादुरांचें व्याख्यान झालें त्या वेळेस एक मोठी मौजेची गोष्ट घडून आली. खानबहादुर आमच्या बोर्डिंग हाऊसमध्येंच उतरले होते. आणि लॅंड लेडीच्या पोरीबरोबर फार पाजीपणाचा चावटपणा केल्यामुळें त्यांस 'लॅंड लेडीनें' हांकलून दिलें होतें. हे येथें असतां त्यांनीं

पुष्कळ गुण उधळले. त्यांचें व्याख्यान हिंदुस्थानी विद्यार्थी मंडळीपुढें चालू असतां मी त्या हॉलमध्यें गेलों तेव्हां मला पाहून त्यानीं एक दोन वाक्यें बोलून भाषण संपविलें."

---

प्रकरण २० वें

## शारदा आणि प्रियंवदा

"मला येथल्या मंडळीचा फार आग्रह आहे कीं, मी स्त्रियांस सुशिक्षित करण्यामध्यें पुढाकार घ्यावा आणि स्त्रियांच्या उन्नतीस मीं लागावें."

"योग्य आहे आग्रह."

"पण मी यासाठीं काय करावें हें मला मुळीच समजत नाहीं. स्त्रियांचें शिक्षण वाढवावें असें म्हणावें तर लहान मुलींनां किंवा ज्या माझ्या खासगी विद्यार्थिनी होतील अशा स्त्रियांना शिकविण्याचें काम मी करीतच आहे, आणि यापेक्षां जास्त तें काय करावयाचें?"

"हें तर धंद्याचें काम झालें. हें सामाजिक काम झालें नाहीं."

"मग सामाजिक काम तें काय करावयाचें?"

"त्यांचें म्हणणें असेल कीं, विवाहित स्त्रियांनां वाचनाची वगैरे अभिरुचि लावावी, त्याचे विचार प्रगल्भ व्हावे म्हणून खटपट करावी."

"विवाहित स्त्रियाना वाचनाची गोडी लावावयाची ती आम्हीं कशी लावावयाची? हीं कामें त्याच्याशीं निकट संबंध असलेल्या त्यांच्या नवऱ्यांचीं नव्हेत काय?"

"स्वतःचें घर सुधारण्याची दगदग स्वतः घ्यावयाची नाहीं, आणि कोणी सार्वजनिक कामें करणारा मनुष्य भेटला म्हणजे त्याला समाजांतील अमुक गोष्ट सुधारा म्हणून म्हणावयाचें ही वृत्ति थोडीबहुत लोकांत असेल, मी नाहीं असें म्हणत नाहीं. माझें लग्न होण्यापूर्वी मी देखील महिना दीड महिना मास्तरणीचें

काम केलें आहे. त्यावेळेस आया येऊन आपल्या मुलीसंबंधानें कागाळ्या मास्तरणीला सांगत. त्या काय, तर मुलगी चोरून खाते, घरांत काम करीत नाहीं, मुलगा संभाळीत नाहीं, वगैरे. जणूं काय या गोष्टीबद्दल आई जबाबदार नसून मास्तरीण जबाबदार !! पण सुशिक्षित स्त्रियांनां दुसरा कांहीं कार्यक्रम नाहीं असें मला वाटत नाहीं."

"कोणता कार्यक्रम आहे ?"

"मला बाई आठवत नाहीं, पण आपल्या बायका ज्या अडाणी आहेत त्यांची कांहीं सुधारणा होण्यासाठीं तुमच्यासारख्या शिकलेल्यांनीं काहीं तरी करावें असें मला वाटतें."

"तर मग हें काम तूं कां अंगावर घेत नाहींस ?"

"मी आपल्यासारखी विदुषी नाहीं — आणि आपल्यासारखी सर्वपरीनें स्वतंत्रहि नाहीं — आणि माझें वजनहि स्त्रीवर्गावर पडणार नाहीं. तुमच्या वक्तृत्वाबद्दल, धैर्याबद्दल, वाचनावद्दल व विद्वत्तेबद्दल लौकिक आज सर्वत्र आहे. तुम्हांला येथें 'वादविवादांतली वाघीण' म्हणतात. गेल्या सालीं टाउन हॉल-मध्ये त्या पुण्याच्या प्रोफेसराचें शिक्षणपद्धतीवर व्याख्यान झालें त्यावेळेस तुम्ही बायकांत न बसतां पुरुषांत बसलां, आणि नोटबुक आणि पेन्सिल घेऊन बसलां त्यामुळें या प्रोफेसरची छाती धडधडायला लागली आणि तो मोठा जपून बोलूं लागला असें म्हणतात."

"त्यानीं नोटबुक आणि पेन्सिल यांनां भिण्याचें कारण नव्हतें. त्यांच्या वर्गांत विद्यार्थी नोटबुक आणि पेन्सिल घेऊन नाहीं कां बसत ?"

"कांहीं असो; तुम्हीं त्यांची बरीच मौज केली. प्रायोगिक शिक्षणशास्त्रावर तो बोलला. मुलें प्रश्न करतात त्यावरून त्यांच्या ठायीं अत्यंत बालवयांत चौकस बुद्धि कशी जागृत होते, तिचा बाराव्या वर्षापर्यंत विकास कसा होतो हें प्रयोगा-वरून कसें काढावें हें त्यानें सांगितलें, आणि त्या ज्ञानाचा शिक्षकांनीं कसा

उपयोग करावा हें इंग्रज व अमेरिकन अनुभवावरून सांगितलें — आणि तुम्हीं त्याची अगदी भंबेरी उडवून दिली."

"मुळींच नाहीं – मी नुस्ता 'तुम्हांला मुलें आहेत काय? तुम्हांला इकडच्या मुलांचा कांहीं अनुभव मांगतां येईल कीं नाहीं?' म्हणून प्रश्न केला. माझा उद्देश त्यांची भंबेरी उडविण्याचा मुळींच नव्हता. आपल्याकडील मुलांचा अभ्यास होऊन कांहीं कमजास्त कळलें असल्यास तें समजावें म्हणून मी सहज कुतूहलबुद्धीनें विचारिलें."

"आम्ही हें कसें कबूल करूं? तुम्हाला नेहमीं दुसऱ्याच्या अभ्यासांतलें व्यंग काढणारेच प्रश्न कसे सुचतात? तुम्हीं तो प्रश्न करताच अध्यक्ष हंसले, आणि सर्व लोकहि हंसले."

"मला त्या प्रश्नांत हंसण्याजोगें काय होतें, हें अजून गूढ पडलें आहे; आणि मी कांहीं वेड्यासारखा प्रश्न विचारला असें मला वाटत नाहीं."

"तें हंसणें तुमच्याविरुद्ध नव्हतें, तें तुमची तारीफ करणारें होतें. तुमच्या एका प्रश्नानें त्याच्या व्याख्यानाची तुम्ही किंमत केली. ऐकणाऱ्या सर्व मंडळीस तेव्हांच कळलें कीं एखादें प्रायोगिक शिक्षण शास्त्रावर यानें पुस्तक वाचलें आहे; आणि त्यावरून हा व्याख्याता कांहीं तरी बोलत आहे. स्वतःच्या मुलाचें मन जाणण्याची त्याने कांहींच खटपट केली नाहीं; किंवा आपल्याकडील मुलांचें त्यानें कांहीं अवलोकन केले नाहीं."

"पण तें त्यानें कबूल केलें — त्याचें लग्नच झालें नाहीं म्हणून सांगितलें ना?"

"म्हणजे त्याचें पुस्तकी ज्ञान बाहेर पडलें."

"पुस्तकी ज्ञानानें बोलूं नये असें कोठें आहे?"

"मग तुम्ही स्वतः त्यांनीं कांहीं अवलोकन केलें नाहीं हें बाहेर कां काढलें?"

" मी त्याबद्दल त्यांस दोष कोठें दिला ? मुलांविषयीं त्यांस अत्यंत जिज्ञासा असून त्यानां मुलें नसल्याने त्यानां सूक्ष्म निरीक्षणाची संधि मिळाली नाहीं यांत त्यांचा दोष काय ? मला तर त्यांच्याविषयीं अत्यंत सहानुभूति वाटली. मला जर आपल्या अल्पवयी मुलींच्या जिज्ञासा आणि महत्त्वाकांक्षा या विषयावर अनुभवानें बोलायला सांगितलें तर बोलतां येईल. पण मुलांच्याविषयीं कोठें बोलतां येईल ? व अर्भकांच्या मनाविषयीं तर कांहींच सांगतां येणार नाहीं; माझेंहि जें ज्ञान आहे तें पुस्तकीच आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन मला त्यांच्याविषयीं तर ' तो आपल्यासारखाच दुर्दैवी आहे ' अशी भावना उत्पन्न झाली. "

" तुम्ही त्याचें अज्ञान बाहेर काढण्याचा प्रयत्न केला नाहीं ? "

" मुळींच नाहीं. "

" आमचा तर असा समज झाला कीं तुम्हीं त्याची चांगली फजिती उडविली, आणि ती तशी उडविण्यासाठीं तो काय बोलत होता हें तुम्ही टिपून घेत होतां. "

" प्रियंवदे, आपल्या महाराष्ट्रांत दुसऱ्यानें कांहीं करावयाचें योजिलें म्हणजे त्याचें काहीं तरी उणें बाहेर काढावें अशी प्रवृत्ति आहे असें मी ऐकतें, पण माझा हेतु त्याचें उणें काढण्याचा मुळींच नव्हता. मला जी जिज्ञासा होती ती मी व्यक्त केली एवढेंच. पण दुसऱ्याचें उणें काढण्याचा तूं मजवर जो आरोप केलास तोहि तुझा गैरसमजच आहे. पण या समजाबद्दल मी तुला मुळींच दोष देत नाहीं. कां कीं, माझ्यासंबंधानें पुष्कळांचा असा गैरसमज झाला आहे कीं, मी सहज जिज्ञासेनें एखाद्याला प्रश्न करतें आणि तो प्रश्न त्या मनुष्याला सोडवितां आला नाहीं म्हणजें मी त्याची परीक्षाच घेत आहे कीं काय असा त्याचा समज होतो. आणि याबद्दल मला फार वाईट वाटतें. कां कीं ज्यांनां मी आपल्यापेक्षां अधिक समजणारे असें समजतें व ज्यांच्यापासून आपला ज्ञानाचा दृष्टीनें कांहीं फायदा होईल असें वाटतें, त्यांनांच मी प्रश्न विचारतें, आणि ती माणसें मजसंबंधानें वाईट मत करून घेतात. मी हें

हायस्कूलमध्ये होतें तेव्हांपासून पहात आहे. एकदां मी मास्तरला पांढरे ढग व काळे ढग यांत फरक काय म्हणून प्रश्न केला आणि त्यानां त्या प्रश्नाचें नीट उत्तर देतां आलें नाहीं तेव्हां वर्गांतले मुलगे हंसूं लागले. मी दुसऱ्याची फजिती करते असा माझा विनाकारण दुर्लौकिक झाला आहे. मला दुसऱ्याचें उणें काढण्याची, काय सांगूं, खरोखरच इच्छा नाहीं!"

"तुम्हांला लोक फार भितात."

"तसें असेल तर मला खरोखरच वाईट वाटतें, व हें जर खरें असेल तर मला आपली जिज्ञासा कमी केली पाहिजे. निदान मला जर कांहीं विचारावयाचें झालें तर तें सभेंत न विचारता शांतपणें मागाहून विचारण्याचा निश्चय मला केला पाहिजे."

"मग नोटबुक घेऊन कां बसतां?"

"मला वाचलेले चांगले ग्रंथ आणि चांगली ऐकलेलीं व्याख्यानें याच्या टीपा लिहून ठेवाव्या ही संवय कॉलेजमध्यें असतांना लागली म्हणून. त्या प्रोफेसरांच्या व्याख्यानाच्या टीपा मजजवळ अजून आहेत, त्या पुन्हां मी एक दोनदां पाहिल्याहि आहेत."

"पण तो प्रोफेसर तर, तुम्ही मोठ्या आढ्यतेखोर, दुसऱ्याचा उणेपणा बाहेर काढून आपल्या ज्ञानाचा तोरा मिरविणारी बाई असा आपला समज करून घेऊन गेला."

"छे, ही गोष्ट तर फारच वाईट झाली. त्यांनीं मजसंबंधीं विनाकारण चुकीचें मत बनविलें आहे. मला त्या प्रोफेसरनां पत्र लिहून कळविलें पाहिजे. व जर मी त्यांचा कमीपणा बाहेर काढण्यासाठीं बोललें असे वाटत असलें तर मला त्यांची माफी मागितली पाहिजे. तुम्हांला माझ्या प्रश्नाविषयीं काय वाटले?"

"आम्हांला तर तुमचे प्रश्न ऐकून फार आनंद झाला. आम्हाला वाटलें कीं तुम्ही त्या प्रोफेसरची ऐट चांगली बाहेर काढली. तो मानसशास्त्राचा

अभ्यास करावा, आईबापांनीं मुलांच्या मनाचा अभ्यास करावा आणि त्याप्रमाणें शिक्षणयोजना करावी म्हणून ऐटीनें सांगायला आला होता. त्याचा नक्षा एका नागपूरच्या बाईनें उतरविला याबद्दल आम्हांला तर उलट अभिमान वाटला. आणि आमचे दिनकर भावोजी म्हणाले कीं, नागपूरचे पाणी तुम्ही त्या पुणेकराला दाखविलें."

"तुम्ही ज्या कामगिरीचें श्रेय माझ्यावर लादूं पहातां त्या कामगिरीचे श्रेय मला नाहीं आणि मला तसलें श्रेय नको आहे; आणि व्याख्यान देणारा एखादा मनुष्य जरी थोतांडी विद्वान असला तरी त्याचा थोतांडीपणा बाहेर काढून मला काय मिळणार आहे? आणि शिवाय प्रोफेसर भातखंडे हे गृहस्थ थोतांडी नाहींत. त्यानीं जी पुस्तकांतली माहिती सांगितली ती बरोबर सांगितली, त्याला स्वतःच्या अवलोकनाची जोड नव्हती एवढेंच. मला स्वतःला अवलोकनाची संधि कोठें मिळाली आहे? त्यांनाहि मिळाली नाहीं तर मी त्यांबद्दल त्यांस कसा दोष देऊं?"

"तर मग तुमच्याकडून ही आविष्करणाची कामगिरी झाली ती नकळतच झाली?"

"छे, छे, ती कामगिरी नव्हे. दुसऱ्याचे अज्ञान बाहेर काढण्याचा प्रयत्न करणें हा निव्वळ उद्धटपणा आहे; आणि हा उद्धटपणा माझ्या हातून नकळत झाला. पण झाला तो अगदी उद्धटपणा झाला, हें मला कबूल केलें पाहिजे."

"आम्ही आपल्याविषयीं ज्या गोष्टीबद्दल अभिमान बाळगतों ती गोष्ट म्हणजे सद्गुण नसून दुर्गुण आहे असें तुम्हीं म्हणतां, आणि तो दुर्गुण आपल्या अंगीं नसून त्या गुणांचें श्रेय अगर दोष आमच्याकडून तुमच्यावर विनाकारण लादल्या जात आहे असे म्हणतां काय?"

"अगदीं खरें; माझा हेतु जिज्ञासातृप्ति हा असतो, तो साध्य होत नाहीं; वक्ता प्रश्न विचारल्यामुळें गोंधळांत पडतो, तेव्हां तो मी त्याची फजिती

करूं पहाणारी आहें असें समजतो, आणि लोक मला त्याची फजिती केल्याचें श्रेय देतात. जिज्ञासूस याहून दुःखकारक गोष्ट कोणती आहे? कळकळीनें चौकशी करणारा डिटेक्टिव्ह समजला गेल्यानें जसें त्यास दुःख होतें तसेंच जिज्ञासूस तो आविष्करणपर आहे अशा लौकिकानें दुःख होतें. थोतांडी विद्वानांची डिटेक्टिव्ह ही प्रसिद्धि मला नको आहे. लोकानीं मला जिज्ञासू म्हणूनच ओळखावें."

"तुम्हीं आतां व्याख्यात्यास सार्वजनिकपणें प्रश्न विचारण्याचें सोडून देणार तर?"

"दिलेंच पाहिजे."

"तुमचा निश्चय ऐकून नागपूरच्या पुष्कळ लोकाना वाईट वाटेल; नागपूरच्या व्याख्यानांतली एक मजा जाईल."

"ती कशी काय?"

"नागपूरची मंडळी जी व्याख्याने करविते ती आपलें ज्ञान वाढावें म्हणून थोडीच करविते? कांहींतरी मजेदार कोणी तरी बोललें पाहिजे एवढ्यासाठीं करविते."

"पण सर्वच व्याख्याते विनोदी किंवा खुमासदार बोलणारे कोठें असतात?"

"पण अशा प्रसंगीं कोणी तरी भोळसर मनुष्य पहावयाचा आणि त्याचे व्याख्यान करावावयाचें; आणि नंतर बाररूममध्यें नाहीं तर क्लबात त्यावर कुत्सित चर्चा करावयाची आणि या सगळ्या गोष्टी करण्यासाठीं व्याख्यान करावयाचें ही आजची पद्धति आहे."

"मंडळींनां व्याख्यानें ज्ञानासाठीं नको असतात काय?"

"मुळींच नाहीं. नाहीं तर स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, जातिभेद, वेदांतविषय आणि काव्य एवढ्यावरच चर्वितचर्वणाचीं व्याख्यानें पुन्हां पुन्हां कां

करविलीं असतीं ? या विषयांवर नवीन कोण काय सांगणार आहे ? आपल्या सुशिक्षित मंडळींना याच विषयावर गप्पा मारतां येतात, आणि इतक्या अनेक मंडळींनां टीका करण्यासाठीं मूलग्रंथ हवा आणि म्हणून या क्षेत्रांतलाच व्याख्यानविषय हवा. जर गहन विषय असला तर त्यावर टीका करणारानां तें व्याख्यान फार गैरसोईचे होतें."

"मग पुण्यामुंबईहून येथें येणारानां व्याख्यानाचा इतका आग्रह कां ?"

"त्यांत तर मजा जास्तच येते. पुष्कळदां हे पुण्यामुंबईकडचे शहाणे, मध्यप्रांतांतले लोक अगदीं मागासलेले, यांना साध्या गोष्टीहि समजायला कठिण आहेत अशा कल्पना घेऊन येतात, आणि त्याप्रमाणें बोलत सुटतात. आणि ते तशी कल्पना करून घेऊन बोलायला लागले म्हणजे आमच्या नागपूरकरानां हंसायला एक नवीन साधन प्राप्त होतें. अर्थात आम्हीं त्याच्या व्याख्यानांत कांहीं नवीन नाहीं, म्हणून पुष्कळसे जाडे जाडे संस्कृत शब्द आहेत म्हणून ओळखतों, तथापि त्यांनीं व्याख्यान देऊन लोकाच्या विचारशून्य अंधारांत आपल्या नवीन विचारांचा दिवा कसा लावला याची तारीफ करतों आणि त्या व्याख्यात्याची बोळवण करतों. आणि नंतर त्याच्या भोळसरपणाबद्दल हवें तितकें हंसतों."

"तर मग मी प्रश्न विचारून व्याख्यात्याला एखादे वेळेस निरुत्तर करतें हें तरी लोकांना कसें आवडलें ? हें तर त्यांच्या गोड शब्दानीं बोळवण करण्याच्या पद्धतीच्या विरुद्ध झालें."

"आवडलें एवढ्याचसाठीं कीं, तुमच्या पुण्याकडच्या लोकांनीं विद्वत्तेचें अवडंबर किती जरी माजविलें तरी नागपूरची एखादी बाई तुम्हाला वेळेवर कशी चूप करते याची चुणूक दाखवावयाला तुमच्यासारखीचे प्रश्न उपयोगी पडतात."

"तर मी माझ्या नकळत नागपूरच्या मंडळीच्या हातांतले परक्याला भोंसकण्यास हत्यार होतें."

" या नागपूरच्या भावनाशीं तुम्हांस सहानुभूति नसेल तर तुम्ही केवळ नागपूरकरांच्या हातांतलें खेळणें होतां हें उघड आहे."

" अस्सं! तरी म्हटलें कीं, मला त्या बंगाली वक्त्याच्या 'स्पिरिच्युअल' वैधव्याच्या व्याख्यानाच्या वेळेस अध्यक्षत्व कसें दिलें! प्रियंवदे, तुला असल्या तऱ्हेच्या नागपुरी पद्धती आवडतात काय?"

" कां आवडूं नयेत? खरें सांगायचें म्हणजे अशा मौजा करण्याच्या कामांत मीहि पुष्कळदां पुढाकार घेतला आहे. माझा रामचंद्र आणि मी या दोघांनां देखील असल्या गोष्टी आवडतात. व्याख्यात्याला सन्मानपूर्वक बोलवावें आणि त्याला कांहीं तरी बावळटपणानें भरलेली गंभीर वाक्यें बोलायला लावावें असें करण्यांत मला देखील मौज वाटते. वेळप्रसंगीं त्याची टवाळकी करावी असेंहि वाटतें. एकदां एका व्याख्यात्याचें फार लांबट झालेलें व्याख्यान बंद करावयाचें होतें. तेव्हां मुलानीं खालीं टाळ्या वाजविल्या, आणि त्यांनां तसें करण्यांत माझ्या रामचंद्रानें उत्तेजन दिलें. हें मला वरून दिसलें; मीं बायकांत बसलें होतें. तेव्हा मी कांहीं लहान मुलांनां चिमटे घेऊन रडायला लावलें आणि आम्हीं व्याख्यान बंद पाडलें; आणि माझ्या रामचंद्राला ही गोष्ट कळली तेव्हां त्यानें त्याबद्दल माझी फार तारीफ करून अगदीं एक गोड गोड दिला."

" प्रियंवदे, हें काय हें!"

" कांहीं असो; मला त्यावेळेस जो एक गोड गोड मिळाला त्याची किंमत मला वर्तमानपत्रांतल्या स्तुतीपेक्षां आणि सुशिक्षितपणा आणि साधुत्व याबद्दल नांव होण्यापेक्षां जास्त आहे."

" प्रियंवदे, तुमच्या दोघाच्या मानसिक सायुज्याची ही भावना पाहून मला इतकें तुझ्याविषयीं प्रेम वाटतें कीं त्याबरोबर तुझ्या या वाईट वागणुकीची क्षमा करावीशी वाटते. खरोखर नवरा आणि बायको यांनीं एकदिलानें तिसऱ्याची टवाळी केली तर तीमुळे दोघांतलें प्रेम वाढतें काय? मला वाटतें वाढतहि असेल."

" नवरा जे करतो तें वाईट असलें तरी बायकोला कौतुकाचेंच वाटतें. नवरा करतो, तर तें चूक कसें असेल, ही भावनाहि कांहीं नवीन नाहीं. ' ज्या घरीं तूं गेलीस बाळे, त्या घरचे तुज लागले चाळे ' ही म्हण आज मी किती वर्षें ऐकतें आहे. दोघांनीं मिळून तिसऱ्याची टवाळी करण्यानें प्रेम वाढतें कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. पण दोघाना एकमेकांच्या मसलतींत शिरायला जास्त सवड होते हें मात्र खरें."

" प्रियंवदे, व्याख्यानें वगैरे ऐकण्याचा आणि करविण्याचा हेतु समाज-सुधारणा हा आहे कीं, समाजाला थट्टा करायला आणि मौजेला साधन हा आहे ?"

" मला ' व्याख्यान पद्धतींचा हेतु ' असले जाडे जाडे प्रश्न नको आहेत. माझ्या स्वतःसंबंधानें सांगावयाचें म्हणजे मी व्याख्यानें करमणुकीची साधनें म्हणून समजतें. ज्याला तात्त्विक गोष्टी सांगावयाच्या असतील त्यांनीं त्या पुस्तकांत लिहाव्यात. आम्हां नागपूरकरांची व्याख्यानें योजण्याची आणि नंतर व्याख्यात्यांची त्यांच्या पाठीमागें टवाळी करण्याची पद्धति अत्यंत योग्य वाटते. आपल्या नीरस आयुष्यांत बोलण्याला विषयच नाहींत. इंग्रज लोकांनां बोलायला जेवढे विषय असतील तितके आपल्याकडे नाहींत, बायकांच्या पोषाखावर टीका करण्याची चाल आपल्याकडे नाहीं अशा वेळेस आमचे गरीब बिचारे पुरुष काय करणार !"

" आणि तूं नागपूरकर कधीं बनलीस ? तुझ्यापेक्षां जास्त वर्षें मी नागपुरांत घालविलीं अहेत."

" असतील, पण माझें दोन पिढ्या नागपुरांत असलेल्या कुटुंबांतल्या मुलाबरोबर लग्न झालें आहे. त्यामुळें मी नागपूरकर झालें. तुम्ही मात्र येथें उपरी आहांत. बायकांचा दर्जा नवऱ्याप्रमाणें ही सर्व लोकांची जुनी पद्धत आहे."

" ' नागपूरकर ' हा दर्जा आहे काय ?"

" अर्थात आहे. "

" तो कसा ? "

" महाराष्ट्रांतील महाराष्ट्रीय म्हणजे काय ? त्यांची कर्तबगारी एवढीच कीं, त्यांच्या देशांत मुसलमान आले असता त्यांनीं आपलें संरक्षण केलें पण आमच्या गोंडवनांतले म्हणजे नागपूरचे महाराष्ट्रीय म्हणजे ज्यानीं स्वतःचें संरक्षण तर केलेंच पण इतर लोकांनाहि आपल्या कबजाखालीं आणलें. तर नागपूरकर ही पुणेकरांची सुधारून वाढविलेली आवृत्ति होय; नागपूरकर हा अर्थात अधिक उच्चतर कोटींतील मानव होय. "

" काय चावट झाली आहेस — तुला इतकें तत्त्वज्ञान कोणी शिकविलें ? नवीन आलेल्या कोंकणस्थ मुलीनें नागपूरचा अभिमान बाळगून दुसऱ्या कोंकणस्थ बाईशीं तिला पुणेकर समजून भांडायचें ! तुला या हेंगाडे बोलणाऱ्या नागपुऱ्यामध्यें लोकप्रिय व्हावयाचें आहे काय ? "

" बरें तें असो, तुम्ही स्त्रियांच्या उन्नतीसाठीं काय करणार ? "

" मीच तुला विचारतें कीं, मी काय करणार ? "

" तुमच्या ज्ञानाचा फायदा इतर स्त्रियांस करून द्यावा. "

" आणि तो कसा ? इतर स्त्रियांच्या कोणत्या कार्यास मी मदत करूं शकेन ? "

" त्यांचें गृह सुधारण्यासाठीं तुम्हीं त्यास सूचना कराव्यात. "

" आणि मला गृहव्यवस्थेची काय माहिती आहे ? सात आठ मुलें, नवरा, आणि स्वतः इतक्यांचा संसार पंचवीस तीस रुपयांत करून दाखविणाऱ्या बायका मीं पाहिल्या आहेत. त्यांच्याकडे पाहिलें म्हणजे वाटतें कीं मीं यांनां काय सांगणार ! मला एकटीला पन्नास साठ रुपये खर्च येतो, त्यांतला दहा वीस रुपये खर्च पुस्तकांकडेच होतो. पण त्या पंचवीस तीस रुपयांत संसार करणाऱ्या बायकांनां पुस्तकें वाचीत पडा आणि मुलाकडे दुर्लक्ष करा म्हणून सांगूं, कीं त्या पंचवीस तिसांतले कांहीं रुपये पुस्तकांकडे खर्च करा म्हणून सांगू ? "

" मग तुम्हांस त्या नायकांविषयीं काय वाटतें ? "

" मला असें वाटतें कीं त्या सर्व माझ्यापेक्षां अधिक सुशिक्षित आहेत. त्यांनां मुलाच्या संगोपनाचा अनुभव आहे, मुलाच्या आवडी-निवडी, मनोरंजन, एकमेकांमधली वागणूक याची माहिती त्यांनां जास्त आहे. मी त्यांनां कदाचित जें बोलावयाचे तें आणि मला जें समजलें आहे तेवढेंच त्या प्रौढ शब्दांनीं संगतवार सागूं शकणार नाहींत आणि मी तें सांगूं शकेन एवढेंच. मला तर आतां अशी शंका उपस्थित होऊं लागली आहे कीं मुलींनां शिकविण्याच्या धंद्याला देखील मी लायक आहे काय – आणि मोकळेपणालें अंतनिरीक्षण करूं लागले म्हणजे ' मी नाहीं ' असेंच उत्तर येते. मला जरी मी लायक नाहीं असें कळलें तरी उपजीविकेच्या अन्य साधनाच्या अभावामुळें मला शिक्षकत्व सोडतां येणार नाहीं. "

" आतां तुम्हांला आपण अज्ञानी आहोंत असें दाखविण्याची इच्छा झाली आहे काय ? "

" माझें अज्ञान आतां मला पूर्णपणें कळूं लागलें आहे. आणि प्रत्येक संसारांत असलेली स्त्री माझ्यापेक्षां अधिक सुशिक्षित आहे असें वाटूं लागलें आहे. "

" तर मग मी देखील तुमच्यापेक्षां अधिक सुशिक्षित असणें शक्य आहे. "

" प्रियंवदे, मला तुझ्यापेक्षां अधिक ज्ञान आहे असें म्हणत नाहीं. कां कीं, पुष्कळ गोष्टींमध्यें मला तुलाच सल्ला विचारावासा वाटतो. स्त्री या नात्यानें मी तुझ्यापेक्षां बरीच अज्ञानी आहे. "

" मला तुम्हीं हरभऱ्याच्या झाडावर चढवतां वाटतें ? मी जरी एखाद्या व्याख्यात्याची टवाळी करण्यांत नवऱ्याला सामील होत असलें, तरी तुमच्यांत आणि माझ्यांत फरक काय आहे हें विसरण्याइतकी मी उद्धट झालें नाहीं. तुमचें वाचन, तुमचे विचार हें पाहून मला मी सामान्य स्त्रीपाशीं बोलत आहे

असें मुळींच वाटत नाहीं, मी उलट म्हणतें कीं तुमच्या वाचनाइतकें वाचन ज्यांचें झालें आहे असे पुरुषहि थोडेच दिसतात. "

" तें खरेंहि असेल, तरीहि मला मी स्त्री या नात्यानें अगदी अडाणी आहे अशी भावना होऊं लागली आहे."

" पुष्कळ विद्वान लोकांना 'मी पूर्वी विद्वान आहे असें मला वाटत होतें, पण माझें ज्ञान वाढल्यानंतर मी अगदी अज्ञानी आहे असें कळूं लागलें ' असें म्हणण्यांत आनंद वाटतो. तीच फॅशन तुम्हीं उचलली नाहीं काय ? "

" अर्थात नाहीं. "

" त्याच्या ' यदाकिंचिज्ज्ञोहं ' या बोलण्यांत आणि आपल्या बोलण्यांत मग फरक तो काय ? "

" फरक पुष्कळच आहे. असल्या विनयशील विद्वानांची विद्वान म्हणून ख्याति सर्वत्र झाली म्हणजेच आपण अज्ञानी आहों असें सांगण्यास त्यांनां फावतें, ही एक त्यांच्यासंबंधानें लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. आणि शिवाय ते विनयशीलपणाची कीर्ति मिळविणारे विद्वान दुसऱ्या त्याच्यापेक्षाहि कमी विद्वानांनां आपल्यापेक्षां अधिक जाणते म्हणून समजत नाहींत, किंवा म्हणत नाहींत. मी तुला मजपेक्षां अधिक जाणती असें समजतें. "

" आणि ती कोणत्या बाबतींत ? "

" स्त्री या नात्यानें तूंच काय तर अनेक स्त्रिया माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहेत अशी भावना मला होऊं लागली आहे. ज्या स्त्रियांना पत्नी, किंवा माता या नात्याने जगाची माहिती झाली आहे त्या स्त्रियांस मी माझ्यापेक्षा कमी कसें समजूं ? त्यांनां ग्रांथिक शिक्षण नसेल. अनेक गोष्टींविषयीं विचार करतां येत नसेल, पण विचार करतां येणें ही गोष्ट शिक्षणाचा मुख्य भाग आहे असें मी आतां समजत नाहीं. "

" तर मग ? "

"भावनांचें शिक्षण आणि भावनांची वाढ ही तितकीच महत्त्वाची गोष्ट आहे, किंबहुना जास्त महत्वाची गोष्ट आहे."

"म्हणजे काय — भावनांचें शिक्षण म्हणजे काय आणि ते कसें वाढवावयाचें ?"

"परमार्थाच्या मार्गांत ज्याप्रमाणें ज्ञान हें अंतिम शिक्षण धरले जातें आणि भक्ति आणि कर्म यांचें शिक्षण अगोदर असतें तोच नियम आपणांस रोजच्या व्यवहारांतहि लागू आहे. ज्या स्त्रीस मातृत्वाची भावना प्रबल असेल तीच स्त्री आपल्या मातृत्वाच्या कार्यास उत्तम प्रकारें लायक करणारें शिक्षण मिळवील. यासाठीं व्यक्तीच्या शिक्षणामध्यें भावनाशिक्षणास प्राधान्य दिले पाहिजे. भावना जेणेंकरून उत्कट होतील तेव्हांच कार्य करण्याची उत्कटता वाढेल, आणि तेव्हाच खऱ्या शिक्षणास प्रारंभ होईल. 'पाहिजे तो कळवळा मग बळा काय उणे' या उक्तींत तरी हेंच शिक्षणतत्त्व सांगितलें आहे."

"तर मग तुम्ही भावनास प्राधान्य देतां — देत असाल; पण आम्ही बायका तुमच्यापेशां अधिक सुशिक्षित कशा ? भावनाचें शिक्षण तरी आम्हांस कोठें आहे ? असतें तर आम्ही सर्वच बायका कवयित्री बनलों असतों."

"जर आयुष्यातील पत्नीत्व आणि मातृत्व, पुत्रविरह, पुत्रशोक इत्यादि अनुभवलेल्या स्त्रिया जर कवित्व करूं लागल्या तर त्या मजपेक्षां खात्रीनें अधिक सुंदर कविता लिहितील."

"आणि आमचें भावनांचें शिक्षण तरी कोठें झालें आहे ? तुम्हाला असें वाटतें काय कीं आम्हास आपल्या भावनांचा विकास करण्यासाठीं पुष्कळसें क्षेत्र आहे ? शारदाबाई, तुम्ही समाजांत फारशा वाढला नाहीं, तुम्हांला कांहीं वर्षे सर्वसामान्य परिस्थितींत घालवावीं लागलीं तथापि अलीकडे सात आठ वर्षें, तुमची गणना तीव्र बुद्धीच्या स्वतंत्र प्रवृत्तीच्या व्यक्तींत होऊन इतर स्त्रियांस जीं बंधनें आहेत त्यांपासून अबद्ध अशा स्थितींत गेलीं — त्यामुळें सर्व मानवी भावनांस पिळून काढणारी जी रूढी आहे त्या रूढीच्या चरकांतून तुम्ही पूर्णपणें

पिळून निघाला नाहीं, आयुष्याच्या पूर्वीच्या भागात तुम्हासहि रूढीचा चरक जाणवला असेल पण अलीकडच्या स्वातंत्र्यामुळें पूर्वीच्या गोष्टींचा थोडासा विसर पडला असेल. आज स्त्रियानां अवश्य अशा भावनाची वाढ होण्यास तरी कोठें जागा आहे ? स्त्रियांनां आज नवऱ्यास पत्र पाठवावयाची तरी किती चोरी— त्यांत वडिलाचा उपमर्द होतो अशी समजूत आहे; 'आम्ही काय तुझ्या नवऱ्याची खुशाली तुला कळवीत नाहीं, तर तुला स्वतंत्र पत्र यायला पाहिजे ?' अशी टीका प्रत्येक लिहिता–वाचतां येणारी स्त्री अनुभवीत नाहीं काय ? स्त्रीनें किंवा पुरुषानें आपल्या स्वतःच्या मुलास सासुसासरे घरात जिवंत असतां खेळविणें ही अमर्यादा समजली जात नाही काय ? एवढेंच नव्हे तर धार्मिक गोष्टीनीं देखील या भावनांच्या विकासास अनेक अडचणी उत्पन्न करून ठेवल्या आहेत. आई सोवळयांत असली आणि मूल तिला विळखा मारण्यासाठीं प्रेमानें आलें म्हणजे 'शिवशील' असेच ती ओरडेल. या तऱ्हेची प्रवृत्ति आहे तोपर्यंत पत्नीत्व आणि मातृत्व या भावनाची उत्कटता कशी उत्पन्न होणार ? स्त्रियांनीं पुस्तकें कोणती वाचावीं याविषयीं सुशिक्षित लोकहि निरनिराळीं बंधनें घालूं इच्छितात कीं नाहीं — मी तर असें पाहिलें आहे कीं बऱ्याच लोकाना असें वाटते कीं संतलीलामृत, भक्तिलीलामृतसारखींच पुस्तकें स्त्रियांनीं वाचावी ; दुसरी वाचूंच नयेत. तुम्हास भावनाचा विकास झाला पाहिजे ही गोष्ट पटली असल्यामुळे, तुम्ही स्वतःच्या भावनांचा विकास झाला नाहीं, इतरांचा झाला आहे अशी खोटी समजूत करून घेता. छे छे, आपल्या समाजांतील स्त्रियांच्या मनामध्यें भावनांचाहि विकास सभ्यतेच्या खोट्या कल्पनांनी होऊं दिला नाहीं."

"तरी देखील मी म्हणते कीं त्यांच्या मनांत भावनांचा विकास मजपेक्षां अधिक झाला असावा."

"खात्रीनें नाहीं."

"तूं असें कसें म्हणशील ? तुझे सगळे म्हणणें खरें धरलें तरी काय निष्पन्न होतें ? स्त्रियांनां पुरुषांविषयीं मनांत प्रेम उत्पन्न झालें तरी तें दाखवितां येणार

नाहीं, व मुलाविषयींहि प्रेम उत्पन्न झालें तरी तें व्यक्त करतां येणार नाहीं, पण ही अडचण जेव्हां भासतें तेव्हां प्रेमाचें कार्य व्हावयाचें तें होऊन गेलेलें असतें; प्रेमाचा जन्म झाल्याशिवाय या अडचणी भासूं लागल्या काय? प्रेमाचा उद्भव झाला असला म्हणजे या अडचणींतून प्रेम मार्ग काढीत नाहीं काय? नवराबायकोस एकमेकास पत्र पाठविण्याची चोरी असतां पत्रव्यवहार आपल्या समाजांत चालूं नाहींत काय?"

"ते आहेतच."

"प्रेमाचा उद्भव झाला म्हणजे प्रेम अडचणींतून मार्ग काढतें आणि आत्मविकास करून घेतें. पण प्रेम उद्भवलेच नाहीं तर प्रेमामुळें जें काहीं अध्यात्मिक शिक्षण स्त्रीपुरुषांनीं मिळवावयाचें ते मिळवावयाचे राहून जात नाहीं काय?"

"प्रेमाला तुम्ही अध्यात्म्याचें शिक्षण बनविता. इतक्या उच्च तऱ्हेनें प्रेमाची वाखाणणी तुम्ही प्रेमाचा अनुभव घेतल्याशिवाय केली नाहीं. खरें ना, हें शारदाबाई?"

"मी प्रेमाचा अनुभव घेतला आहे? छे, हें मुळींच खरें नाहीं."

"शारदाबाई, तुम्ही प्रेमाची इतकी उच्च तऱ्हेनें थोरवी वर्णन करूं लागलां, आपल्या आयुष्याची अशिक्षितता आणि व्यर्थता बोलूं लागलां, इतर सामान्य स्त्रियाना आपल्यापेक्षां अधिक अनुभवी व त्यामुळें अधिक सुशिक्षित, आणि त्यामुळें अधिक भाग्यवान असें जें बोलूं लागलां तें सर्व प्रेमाच्या जागृती-शिवायच काय? हें सर्व बोलणें प्रेमामुळें ज्या भावना उत्पन्न होतात त्यांच्या पुस्तकी ज्ञानानेंच काय? शारदाबाई, हें मला मुळींच खरं वाटत नाहीं—मला वाटतें शारदाबाई, आपल्या मनांत प्रेमविकार जागृत झाला आहे हें तुम्हीं लपवूं इच्छिता. प्रेमविकार जागृत होणें ही गोष्ट अनुचित असें तुम्हीं समजतां आणि तो नाकबूल करतां; हें परिस्थितीचें दडपणच तुमच्यावर पडलें आहे. स्त्रियांनीं परपुरुषांचे चिंतन करूं नये, परपुरुषाविषयीं प्रेमविकार उत्पन्न होऊं देऊं

नये, मृत पतीलाच आपला पती समजावें, अन्य पुरुषाविषयीं प्रेम भावना जर मनांत उत्पन्न झाली तर ती इतकी लाजेची गोष्ट कीं ती तर कोठेंच बोलूं नये, या तऱ्हेची समाजांत जीं मते प्रचलित आहेत आणि ज्यांचें सुंदर शब्दानीं वर्णन धार्मिक काव्य-ग्रंथांतून येतें त्या कल्पनांच्या बाहेरून होण्याऱ्या दडपणामुळे तुम्हांस आपल्या अंतःकरणांत उत्पन्न झालेले प्रेमविकार नाकारण्याची प्रवृति होत नाहीं काय? तुमचें वैजनाथशास्त्र्यावर प्रेम जडलें नाहीं काय?"

"वैजनाथशास्त्र्यांविषयीं मला काय भावना वाटते तिचें मला पृथक्करणच करता येत नाहीं — पण वैजनाथशास्त्र्यांसंबंधाची माहिती तुला कोठून?

"दादाला म्हणजे डॉ. भुसकुस्त्यांना हरिभय्याचे पत्र आलें; त्यांत हरिभय्यानें आपला बिंबाबाईशीं पुनर्विवाह होणार हें कळविलें; आणि एक मोठा गाजेल असा पुनर्विवाह, आणि तो वैजनाथशास्त्री आणि शारदाबाई यांचा कदाचित् होईल म्हणून लिहिलें आहे."

"हरिभय्याला एकादी स्त्री एखाद्या पुरुषाबरोबर फिरायला गेली व बोलत बसली म्हणजे पुनर्विवाहच दिसणार. बिंबाबाईलाहि आमच्या एकत्र बोलण्यांत पुनर्विवाह दिसूं लागला."

"तर मग तुमच्या मनांत वैजनाथशास्त्र्याविषयीं कोणती भावना उत्पन्न झाली?"

"तीच मला कळत नाहीं — मला प्रथमतः आदर, दया ही उत्पन्न झाली. या संशोधकास अन्नपाण्याच्या सोईवांचून दिवस काढावे लागतात याबद्दल दुःख वाटलें आणि आपण यांची चांगली काळजी घ्यावी असें वाटूं लागलें, आणि ते जरी मजपेक्षां वडील आहेत तरी त्यानां लहान मुलगा समजून त्यांच्या सुखाकडे लक्ष द्यावें असें वाटूं लागलें — म्हणजे थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मातृत्वाची भावना उत्पन्न झाली. स्त्रीपुरुषांतलें जें संभोगध्येय प्रेम असतें तत्सदृश भावना उत्पन्न झाल्या नाहींत; प्रेम हा शब्द ज्या अर्थानें वापरला जातो त्या अर्थाचें प्रेम उत्पन्न झालें नाहीं."

" शारदाबाई, तुमच्याशीं या विषयावर बोलतांना मात्र मी अधिक सुशिक्षित आहे असें मला वाटूं लागलें आहे. उत्कट प्रेम करणाऱ्या पत्नीच्या ठायीं मातृत्वाची भावना किती तीव्रत्वानें जागृत असतें ही गोष्ट प्रत्येक स्त्रीच्या अनुभवाची आहे. जुन्या संस्कृत कवीनांही या स्त्रीस्वभावाचा अनुभव आल्या-शिवाय कां ' भोज्येषु माता शयनेषु रंभा ' ही ओळ त्यांच्या लेखणींतून बाहेर पडली ? "

" हें पहा, मातृस्नेह वाटणें हें वैवाहिक प्रेमाचा भाग आहे ही गोष्ट माझ्या फारशी लक्षात आली नाहीं, पण तुझ्या बोलण्यावरून असें दिसते कीं या गोष्टीची जाणीव सर्व लोकांस असली पाहिजे. "

" तर मग आतां पुढचा कार्यक्रम काय ? "

" पुढचा कार्यक्रम कसला आला आहे ? "

" म्हणजे तुमची भावना, तुमचें उत्कंठित झालेलें मन हीं सर्व वैजनाथ-शास्त्र्यांच्या लक्षांत आलीं आहेत कीं नाहींत ? त्यांनां तुजबद्दल कांहीं प्रेम उत्पन्न झालें आहे कीं नाहीं ? "

" मला त्यांच्या मनाची मुळींच माहिती नाहीं. "

" शारदाबाई, हें सर्व तुमचें करणें अप्रयोजक आहे. जर पुरुषाविषयीं स्त्रीच्या मनांत प्रेम उत्पन्न झाले असेल, आणि स्त्रीला जरी ते शब्दांनीं व्यक्त करणें लोकरीतीच्या दृष्टीनें अयोग्य असलें तरी तीच गोष्ट अनेक क्रियांनीं व्यक्त करणें स्त्रीचें कर्तव्य आहे. पुरुषांस देखील त्यांच्यावर प्रेम करणारी स्त्री मिळणें सोपें आहे काय ? स्वतःचे प्रेम व्यक्त करणाऱ्या स्त्रियांस यूरोपांत लाघवी समजतात आणि स्त्रीनें पुरुषांस आपले अंतःकरण मोकळें करणें हें गैर समजतात. पण हे जे सर्व विधिनिषेध झाले आहेत ते सामान्यांसाठीं आहेत. तुमच्या-सारख्या ऋषितुल्य स्त्रीपुरुषांसाठीं खास नाहींत. पुरुष हा पैशाचा ठेवा किंवा स्त्रीचें उदरपोषण करण्यास साधन अशी ज्या व्यवहारांत कल्पना आहे, त्या व्यवहारांत स्त्रियांनीं लगट करणें म्हणजे आपले उदरपोषण त्यावर लादण्याचा

प्रयत्न करणें आहे. पण येथें तशी गोष्ट नाहीं. तुम्ही स्वतःचें उदरपोषण करण्यास समर्थ आहांत आणि कदाचित त्याचेंहि उदरपोषण करून त्यांनां ऐतिहासिक संशोधन करण्यास त्यांस अधिक समर्थ कराल. आपल्या महाराष्ट्रात शास्त्रसंवर्धन, इतिहास संशोधन इत्यादि क्रिया करण्यास द्रव्याचा अभाव आहे, अशा प्रसंगीं असल्या कामात गुंतलेल्या पुरुषांविषयीं प्रेमादर उत्पन्न होऊन त्याच्या रक्षणासाठीं मातृत्वाच्या भावानें युक्त असें प्रेम उत्पन्न झालेल्या महाराष्ट्रीय स्त्रिया त्यांच्याशीं विवाहास प्रवृत्त होतील तर त्या स्त्रियाविषयीं येथील स्त्रीवर्गास अभिमानच वाटेल. प्रसंगीं जगातील सुखाची आशा असलेल्या आम्ही, तुम्हांस सुशिक्षित व संपन्न विधुरांची मागणी येण्याचा संभव असल्यामुळें, तुम्ही संपत्तीत रहावें असें वाटून, तुम्ही त्या जोगड्याबरोबर लग्न कशाला लावतां असेंहि बोलूं, पण तुम्ही आमचा उपदेश दुर्लक्षिला याबद्दल तुमच्याविषयीं आमच्या मनांत आदरच राहील."

"प्रियंवदे, तुला टवाळ मुलगी म्हणूं, कीं प्रेमाची भाष्यकार म्हणूं? तुझें हें बोलणें हृदयातून आहे कीं दुसरीला बनवून तिची मौज करावी या हेतूनें आहे, हें मला कांहींच कळत नाहीं."

"शारदाबाई, मला टवाळकी करण्याची थोडीशी आवड आहे हें मी नाकबूल कसें करूं? पण हेंहि लक्षांत ठेवा कीं, स्त्रीचा प्रेमाचा विषय मी टवाळीचा कधींहि करणार नाहीं — मला इतके त्याचे पावित्र्य वाटतें. त्या विषयावर जे मी बोलेन तें गंभीरपणानेंच बोलेन. नवरा उपयुक्त कामात गुंतला असतां बायकोनें काम करून दोघांचेहि पोट भरण्यास तयार व्हावें हें मी कुटुंबास कमीपणाचें मुळींच समजत नाहीं. तुला आता खरें सांगायला हरकत नाहीं. सध्यां मुलींच्या शाळेंत मी जी नोकरी केवळ करमणुकीसाठीं पत्करिली म्हणून जो बोभाटा करविला आहे, तो अजिबात खोटा आहे. ती नोकरी मी केवळ पैशासाठींच करीत आहे. माझ्या रामचंद्राला तेथें अगदीं काटकसरीनें रहाण्याला देखील कमींत कमी दीडशें रुपये महिना खर्च येतो. मी जे येथे पन्नास रुपये नोकरी करून मिळवितें ते खरोखर माझ्या रामचंद्रासाठींच आहेत; त्या पैशाचा

माझ्या रामचंद्राला उपयोग आहे आणि हें सासूबाईंनाहि ठाऊक आहे, पण जणूं काय मला हे ठाऊकच नसावेसें मी दाखवितें. मी पगार सासूबाईच्या हातीं आणून देते. आमचा घरचा खर्च पन्नासच रुपयात चालतो आणि त्यामुळें मामंजीनीं ज्या प्रॉमिसरी नोटा घेऊन ठेवल्या आहेत त्यांचें सर्व व्याज तिकडे पाठवावयास सांपडतें."

"तूं नोकरी करतेस हे रामभाऊला ठाऊक आहे काय?"

"त्यांनां मी शिकवावयास जाते हें ठाऊक आहे. घरीं बसून राहण्याचा कंटाळा येतो म्हणून मी नोकरी करण्याची खबर लिहिली, आणि तीच खबर सासूबाईनाहि सांगितली आणि शिकवायला जायला सासूबाईची परवानगी मिळाली. मला पगार मिळतो की काय हें माझ्या रामचंद्राला कांहींच लिहिले नाहीं."

"पण ही छपवाछपवी नव्हे काय?"

"बायको मेहनत करून आपल्याला पैसे पाठविते हें माझ्या रामचंद्राला समजलें तर आपल्या सापत्तिक स्थितीबद्दल त्यास फार दुःख होईल. म्हणून मी मुद्दाम सत्य लपविलें आहे."

"सत्य लपविणें तूं योग्य समजतेस काय? तुझा हेतु चांगला आहे, पण तेवढ्यानें लपंडावाचें समर्थन होईल काय हें मला सांगतां येत नाहीं."

"बाई गे, तात्त्विक सत्याची अभिमानी मी कोठें आहे? मला सत्यवक्तेपणापेक्षां माझ्या रामचंद्राचे सुख हीं अधिक महत्त्वाची गोष्ट वाटते. मी कबूल करतें कीं, सत्यासत्यतेचा तंतोतंत हिशोब करणाऱ्याच्या दृष्टीनें मी असत्यवादी आहे व कदाचित् पापीहि असेन, पण मला तितकी पापाची तरी पर्वा कोठें आहे?"

"प्रियंवदे, मी तुला मुळींच दोष देत नाहीं. माझें अंतःकरण विचारशील तर तूं जें करतेस तें योग्यच आहे असें मला तें सांगेल. पण नीतिशास्त्राच्या दृष्टीने मी विचार करूं लागले म्हणजे चांगल्या गोष्टीसाठीं असत्य

आणि लपंडाव ही योग्य आहेत काय असा जर कोणी तात्विक प्रश्न केला तर नीतिशास्त्रवेत्ते त्या परिस्थितींत तरी असत्य योग्य धरतील काय असा मनांत विकल्प उत्पन्न होतो. माझ्या नीतिशास्त्रविषयक कल्पना अलीकडे सामान्यतः समाजापासून अलिप्त राहिल्यानें पुस्तकी बनूं लागल्या आहेत. आणि त्यामुळें मी संदेहांत मात्र पडतें."

"कांहीं असो, मी नीतिशास्त्राचा तात्त्विक दृष्टीनें विचार करूं शकत नाहीं. नवरा जेवीत नसला आणि चहा घेत असला तर त्या चहांत अधिक दूध मिसळून देणें, आणि चुकून पडलें म्हणून सागणें; जेवावयाला बसला म्हणजे हातून त्याच्या ताटात जास्त तूप पडूं देणें, व तें चुकून पडल्याचे ढोंग करणें या गोष्टी आई आणि सासू या दोघींपासून शिकले आहे, आणि मला त्यांत लबाडी वाटेनाशी झाली आहे. नाहीं तर हे पुरुष काय करतात, आपल्याला आणि बायकाना सारखें खायला मिळावें म्हणून आग्रह धरतात आणि मला तूप इतकेंच पुरें म्हणून सांगतात. अर्थात आम्हांला थोडीशी बायकी हुशारी लढवावी लागते."

"प्रियंवदे, मला असें वाटतें कीं मुलावर प्रेम करणाऱ्या आईचें, किंवा नवऱ्यावर प्रेम करणाऱ्या बायकोचें वर्तन त्याच्या बोलण्याशीं विसंगत आहे काय, असल्यास त्या दोषी आहेत काय ? याविषयीं सामान्य नीतिशास्त्राचे सिद्धात लावून उपयोगी नाहीं, किंवा लावावयाचे झालेच तर त्या मताला प्रत्यक्ष अनुभवाची जोड मिळून मर्यादा उत्पन्न झाल्या पाहिजेत."

"बरें तें असो; आतां वैजनाथशास्त्री कोठें आहेत ?"

"कोठें आहेत तें मला माहीत नाहीं. मी त्यानां त्यांचा पुढचा कार्यक्रम विचारला तेव्हां मी प्रथम नागपूरला जाऊन पुढें दुसरें कोठेंतरी जाईन एवढेंच त्यानीं सांगितलें."

"ते नागपूरला आले होते, आणि आमचे बधु डॉ. भुस्कुटे आणि आमचे दिनकर भावोजी हे त्यानां भेटावयाला गेले होते, व आमच्याकडे एक दिवस जेवावयाला या म्हणून आमंत्रण करण्यासहि गेले होते."

" मग ते आले काय ? "

" छे, व्याख्यान देण्याचें त्यानीं नाकारलें. ते म्हणाले ' व्याख्यान देण्याचा उपयोग काय ? कोणी एखादा वर्ग संघटित होऊन कांहीं कार्य करणारा असेल तर त्यांनां व्याख्यान देण्याचा उपयोग. ' तर मग दिनकर भावोजीनीं आमच्या आखाड्यांत या म्हणून सांगितलें, तेव्हां ते आखाडा पहावयास गेले. तेथें आखाड्याचे चालक एक पुण्याहून आलेले होते, ते लाठीबोथाटी शिकवून हिंदुस्थानाला स्वतंत्र करण्याचा मार्ग आपण कसें आचरीत आहोंत म्हणून सांगत होते. तेव्हां वैजनाथशास्त्री ' तुम्ही शरीरसंपादनासाठीं लाठीबोथाटी चालूं ठेवा पण त्यानें स्वराज्य मिळणार अशी जर तुमची कल्पना असेल तर तुम्ही वेडे आहांत ' असें म्हणाले आणि तेथें शास्त्रीबोवांचें वस्तादजींशीं भांडण लागलें — बरें तें असो, तुम्हीं वैजनाथशास्त्र्यानां आपल्या मनांतील भावनांचा भावनांचा पत्ता लागूं दिला काय ? "

" मी त्याच्याविषयीं उत्पन्न झालेली स्नेहबुद्धि त्यांस दाखविली नाहीं असें नाहीं. मी त्यास रायपुरास आहात तोपर्यंत माझ्याकडे किंवा बिंबाबाईकडे जेवायला या म्हणून आग्रह केला, पण त्यानीं त्याची आवश्यकता नाहीं म्हणून सांगितलें. मी नंतर त्यांच्यासाठीं लाडू करून त्यांच्याकडे फराळासाठीं पाठविले, ते त्यानीं घेतले, पण तुम्हाला त्याच्यासाठीं फार खर्च पडला असेल तर त्यासाठीं दोन रुपये घ्या म्हणून त्यानीं दोन रुपये पाठविले. "

" हें बिंबाबाईला कळले काय ? "

" तिला तें कळल्यावांचून राहिलें नाहीं. "

" ती काय म्हणाली ? "

" ती कांहीं विशेष बोलली नाहीं पण तिच्या एकंदर वर्तनावरून असें दिसलें कीं ती मला आपल्यापेक्षां कमी समजते. तिला असें वाटतें कीं पुरुषाशीं कसें वागावें, त्यांनां आपल्याकडे कसें वळवून घ्यावें या गोष्टी मास्तरीणबाईनां समजत नाहींत. "

" शारदाबाई, बिंबाबाईच्या या प्रकारच्या समजुतीचा तुम्हीं आपल्या मनावर परिणाम होऊं देऊं नका. आपलें गरीबाचें लग्न कसें होईल या फिकिरींत पडलेला हरिभय्या — याला वश करून घेणें आणि वैजनाथशास्त्र्या-सारख्या जगाकडे तुच्छतेनें पहाणाऱ्या आग्रही विद्वानास आपलासा करून घेणें या गोष्टी सारख्याच नाहींत. जर तुम्ही त्यास आपल्याशीं लग्न करावयास लावलें तर तो स्त्रीजातीचा मी विजयच समजेन. "

" स्त्रियांनीं लगट करून पुरुषाला आपल्या जाळयात ओढणें ही गोष्ट योग्य आहे काय ? "

" मला तर गैर वाटत नाहीं. जगातले पुरुष आहेत कोणासाठीं ? बायका-साठींच आहेत ना ? "

" मग ? "

" जगांतल्या पुरुषी धर्मशास्त्रीय कल्पना झुगारून द्या. "

" प्रियंवदे, मला गेल्या दोन तीन दिवसात असें वाटूं लागलें आहे कीं, तुझ्या मानसिक स्थितींत फरक पडूं लागला आहे. तूं स्त्रियाचे हक्क इत्यादि गोष्टी पूर्वी बोलत नव्हतीस. "

" मला उलट असें वाटूं लागलें आहे कीं, तुमच्याच भावनात वैजनाथ-शास्त्र्यांची ओळख झाल्यापासून फरक पडूं लागला आहे. तुम्ही नाकारता पण जगांतील तात्त्विक दृष्टीनें विचार करून दोष काढण्याकडे जी तुमची वृत्ति होती त्यापेक्षां आज तुमच्या ठायीं अधिक कोमल वृत्ति उत्पन्न झाली आहे. तुम्ही लबाड सुधारकांनां चाबकानें बडविण्याची भाषा या वेळेस बोलत नाहीं. "

येथें हें सांगितलें पाहिजे कीं शारदाबाईच्या शंकेत कांहीं सत्य होतें. गेल्या तीन वर्षांत प्रियंवदेचे मन आणि भावना ही रामभाऊ गेला त्यावेळेस होत्या तशाच ' अगदीं गोड ' राहिल्या असें सांगणें म्हणजे जगाचा क्रम प्रियंवदेच्याच बाबतींत निराळा झाला असें होईल, आणि प्रियंवदा मात्र अगदीं गोड राहिली असें आम्हीं सांगितलें तर ती आमची कादंबरीची नायिका म्हणून ती गोड

राहिली असे स्पष्टीकरण द्यावें लागेल. शारदाबाईस या वेळेस भेटणारी प्रियंवदा, थोडीशी चिडखोर, बरीचशी एखाद्या गोष्टीवर वारंवार विचार करून सामान्य दुःखे कल्पनेनें वाढविणारी, थोड्या गंभीर वृत्तीची अशी झाली होती, पण तिची स्वाभाविक आनंदीवृत्ति नाहींशी झाली नव्हती. नवऱ्याच्या जाण्याचें गडबडीचें तिचे दिवस काहीं अंशीं नवऱ्याला निरनिराळे कसे कसे अनुभव येतील, नवरा आपणांस काय लि ील, आपण त्यास काय लिहूं इत्यादि कल्पना करण्यांतच गेलें. पहिले पांच सहा महिने विलायतेच्या अनुभवाविषयी नवऱ्याला अनेक कुतूहल-मय प्रश्न विचारण्यात, नवऱ्याच्या प्रत्येक हालचाली सासूबाईस समजावून सागण्यात गेले. याच कालांत प्रियंवदा इंग्रजी कादंबऱ्या निराळया दृष्टीनें वाचूं लागली. मेफेअर, साऊथ केन्झिंगटन, रीजंट्स पार्क इत्यादि स्थानें तिला अधिक ठाऊक झालीं. लंडनचा एक नकाशा तिनें नवऱ्याकडून मागविला होता. त्यात निरनिराळे पार्क हिरव्या रंगानें दाखविले होते. तिकडे नवरा अमुक रस्त्याने गेला असेल इत्यादि कल्पना करण्यात काही महिने गेल्यानंतर त्या विषयाचाहि तिला वीट आला. आणि तिला रोजचा कार्यक्रम कंटाळवाणा भासूं लागला. रोज उठावयाचें, नित्यविधि करावयाचें, दिनकर भावोजीस जेवण करून द्यावयाचे, कसा तरी दिवस घालवावयाचा, जें पुस्तक हाताशीं येईल तें वाचावयाचे इत्यादि गोष्टी करूनहि तिचा वेळ जात नसे. नवऱ्याची आठवण करून सर्व वेळ घालवावयाचा हें शक्य तरी कसें आहे ?

प्रियंवदेला जें बराच काळपर्यंत रिकामपण मिळाले त्या वेळात तिचे डोकें बरेंच चालूं लागले. 'स्त्रियास अन्याय फार होतो, जे धर्मशास्त्राचे किंवा नीतिचे नियम तयार झाले आहेत ते बरेच पुरुषी आहेत' इत्यादि भावना तिच्या मनांत जोरानें संचार करूं लागल्या, आणि त्यावेळेस जर नागपुरास स्त्रियांचा अभिमान बाळगणारें वर्तमानपत्र चालूं असतें तर लोकांच्या मनाला धक्का देणारे अनेक विचार तिच्या लेखणींतून बाहेर पडले असते.

"माझ्या मनांत फारसा फरक झाला नाहीं." शारदाबाई म्हणाल्या.

"नसेल झाला पण जगाकडे पहाण्याच्या भावनेंत खास झाला आहे."

" माझ्या भावनेत झाला आहे कीं नाहीं हें मला सांगतां येत नाहीं पण तुझें डोके काहीं तरी निराळे विचार करीत आहे असें मला वाटतें. "

" तें अगदीं खरें आहे. माझ्या मनांत फारच फरक पडला असावा अशी मलाच शंका येते. स्त्रियांच्या कार्यासंबंधानें माझ्या मनांत पुष्कळ निरनिराळे विचार जागृत होत आहेत. पुष्कळदा मी पहातें कीं स्त्रियांच्या गर्भाशयास क्षेत्राची उपमा लोक देतात. जो शेताचा मालक आहे त्यानेंच कोणत्या प्रकारचें बीं शेतात पेरावयाचें हें ठरवावयाचे कीं बियाच्या मालकानें शेत शोधावयाचे ? जगांत काय प्रकार चालू आहे ? "

" त्रियांचा मालक काहीं शेत शोधीत नाहीं. "

" लग्नें खरोखर पुरुषाच्या इच्छेनें न ठरतां बायकांच्या इच्छेनें ठरलीं पाहिजेत आणि यासाठीं बायकांच्यातर्फे वरशोधनाची पद्धति मला, पुरुषांनीं ' प्रपोज ' करण्याची वाट पहात बसण्यापेक्षां अधिक योग्य वाटते. "

" पण ही लहान मुलीच्या बापाची गोष्ट झाली ; मोठ्या बायकांनीं काय करावें ? "

" आपल्याला जो पुरुष आवडतो तो पकडण्याचा निकरानें प्रयत्न करावा. जें फळ हातीं येईल तें येईल. वैजनाथशास्त्री पुनर्विवाहास अनुकूल आहेत काय ? "

" वैजनाथशास्त्र्यांचें पुनर्विवाहाविषयीं मत कसें काय आहे कोण जाणें — पुनर्विवाहाच्या प्रश्नास प्राधान्य जे रानडे वगैरे मंडळी देतात, त्याबद्दल अत्यंत तुच्छतेचें उद्गार त्यांनीं काढले. ते म्हणाले ' इंग्रजांचें राज्य घालवून देण्यासाठीं सर्व प्रकारची शास्त्रीय जोपासना करण्याऐवजी तो महाद्या पुनर्विवाह लावीत बसला आहे. ' "

" यावरून तुम्ही काय निर्णय काढाल ? "

" वैजनाथशास्त्री पुनर्विवाहाच्याविरुद्धच असतील असा निर्णय काढीत नाही. निदान मी त्यांची पुनर्विवाहास अविरुद्धता केवळ कल्पितहि असेन.

पण त्यांच्या बोलण्यावरून राष्ट्रास कोणती चळवळ अवश्य आहे याविषयीं त्यांचें मत त्यांनीं व्यक्त केलें. पुनर्विवाहाच्या युक्तायुक्ततेवर मत त्यांनीं दिलें नाहीं."

"राष्ट्रास पुनर्विवाह अवश्य आहे किंवा नाहीं हें सांगण्यास स्त्रियांस अधिक अधिकार आहे, पुरुषांस नाहीं. मी वैजनाथशास्त्र्यांप्रमाणें इतिहासज्ञ नाहीं. पण मला त्याबद्दल फिकीरहि वाटत नाहीं. त्यांनां ठाऊक काय असतात तर पुरुषी इतिहास. या पुरुषी इतिहासांत सत्य काय असतें ? माझ्या मनात अनेक विचार येतात पण ते पद्धतशीर मांडण्याची विद्वत्ता मला नाहीं. तुम्ही विद्वान आहांत; तुम्हीं माझे विचार जास्त चांगलें मांडूं शकाल पण मला काय वाटतें तें सांगतें. राष्ट्र म्हणजे बायका. पुरुष नव्हे. राष्ट्ररक्षण म्हणजे बायकांचें रक्षण; पुरुषांचें रक्षण नव्हे. राष्ट्रांतले पुरुष नाहींसे झाले तरी थोडक्या पुरुषांच्या साहाय्यानें अनेकपत्नीपद्धति सुरू करून किंवा बायकी भाषेंत बोलावयाचें झाल्यास सामुचयिक पतिपद्धति सुरू करून एका पिढींत पुन्हां राष्ट्र गजबजवितां येईल. पण राष्ट्रातल्या बायकाच नाहींशा झाल्या म्हणजे राष्ट्र गेलेंच. यासाठीं राष्ट्रांतल्या स्त्रीवर्गानें समाजसंरक्षण हें आपलें कर्तव्य म्हणून स्वीकारलें पाहिजे. पुरुष हें धर्मशास्त्राचे प्रश्न सोडविण्यास अगदी नालायक आहेत आणि याचें मुख्य कारण ते पुरुष आहेत हें होय. एखाद्या जमिनीचा विशिष्ट बी पेरण्याकडे उपयोग करावा, कीं करूं नये हें ज्याप्रमाणें जमिनीच्या मालकानें ठरवावयाचें असतें, बियांच्या व्यापाऱ्यानें ठरवावयाचें नसतें त्याप्रमाणें प्रजोत्पादनाचा प्रश्न केवळ स्त्रियांनीं आपल्या इच्छेनें सोडवावा. विवाह आणि प्रजोत्पादन या विषयीं झालेले सर्व पुरुषी नियम व्यर्थ आहेत."

"प्रियंवदे, तुझें मत कोणीकडे वहावत जात आहे ?"

"कोणीकडेहि वहावत जाईना, तें वहावत तसें जाऊं देण्यास कोणती हरकत आहे ? तुम्हांला ज्या मताकडे माझें तत्त्व वहावत जाईल अशी भीति वाटत असेल त्या विषयावरच बोलतें. स्त्रियांनीं लग्न न लावतां प्रजोत्पत्ति करण्यास सुरवात केली तरी ती गोष्ट तत्त्वतः चूक नाहीं असें मी म्हणेन. लग्न म्हणजे काय, तर अपत्याची जबाबदारी पुरुषावर टाकायची पद्धति."

" बरें तर प्रियंवदे, रामभाऊ इंग्लंडला गेला आहे. क्षेत्राची मालक तूं आहेस तर तुला वाटेल ती मोकळीक आहे काय ? "

" मुळींच नाही. मी लग्न केलें आहे, लग्न केलें नसतें तर माझ्या तत्त्वाप्रमाणें मला मोकळीक असती. त्या तत्त्वाप्रमाणें वागण्याचें धैर्य मला असतें कीं नसतें ही गोष्ट निराळी. "

" प्रियंवदे, तूं अगदी चहाटळ झाली आहेस. "

" शारदाबाई, लग्न झालेल्या बायका किती चावटपणाच्या गोष्टी बोलतात याची तुला माहिती नाहीं. मी बोलतें तें तुला जरी चावटपणाचें वाटलें तरी तत्त्व स्पष्ट मांडण्यासाठीं मी बोलत आहे. माझें म्हणणें हेंच आहे कीं, राष्ट्राचें रक्षण होणें, किंवा राष्ट्र नष्ट होणें ही गोष्ट स्त्रीसंख्येवर आहे, पुरुष संख्येवर अवलंबून नाहीं आणि राष्ट्ररक्षण, जातिरक्षण इत्यादि गोष्टीस जर अधिक महत्त्व असेल, तर प्रजोत्पादन ज्या स्त्रियांनां करावें लागणार त्यांनां नीतिनियमांनीं बद्ध करण्याचा अधिकार पुरुषांस पोंचतच नाहीं. राष्ट्राची लोकसंख्या वाढविण्याची शक्ति स्त्रीसंख्येवर व त्यांच्या विवाहित स्थितीवर अवलंबून राहणार, तर ज्या पुरुषांचें राष्ट्रसंख्यावर्धनांतील कार्य अप्रधान आहे त्यांनीं नीतिनियम उत्पन्न करावेत हा कोणता न्याय ? "

" प्रियंवदे, तूं जें बोलतेस तें थोडेसें पटतें, पण ते पटते असें कबूल करण्यास धैर्य होत नाहीं. "

" शारदाबाई, मी तुमच्यासारखी विद्वान नाहीं. पण मला असें वाटतें कीं बायकांनीं आपलें धर्मशास्त्र आपल्या इच्छेनेंच तयार करण्याची वेळ आली आहे. जो पुरुष आवडला त्यास आपलासा करण्यासाठीं किंवा जो आपला नवरा असेल त्याला आपल्या हातांत ठेवण्यासाठीं स्त्रीनें जर कांहीं खटपटी केल्या तर त्यांस मी मुळींच गैर समजत नाहीं. विधवा आणि कुमारिका हे भेद मी मुळींच मानीत नाहीं. जिला नवरा आहे, आणि जिला नवरा नाहीं, हे दोनच भेद आहेत. जिला नवरा नसेल तिनें इच्छा असल्यास तो

मिळविण्याचा प्रयत्न करावा असें माझें मत आहे. मी तुम्हाला आतां एवढेंच म्हणतें कीं तुम्ही वैजनाथशास्त्र्यांनां पकडलेंच पाहिजे. ”

“ पण तें कसें करावयाचें ? ”

“ तें मी तुमच्यावरच सोंपवितें. एका बाईचा सल्ला दुसरीला उपयोगी पडणार नाहीं. मी पुरुषांची कल्पना माझ्या रामचंद्रावरून करणार, आणि रामचंद्र व वैजनाथशास्त्री या दोन अगदीं भिन्न प्रकृती आहेत. ”

“ तरी कांहीं सामान्य गोष्टी निघतीलच. ”

“ तर मग एवढेंच सांगतें कीं तुमची आठवण त्यानां नेहमी राहील असें करा. पत्रव्यवहार ठेवा. इतिहासतत्त्वाच्या अभ्यासासाठीं पाहिजे तर तो असूं द्या. अनेक शंका विचारा. त्यांना वादात जिंकल्यासारखें करूं नका. उलटा स्वतःचा पराभव करून घ्या. त्यांच्याकडून शंकासमाधान झाल्यासारखें दाखवा. तथापि पत्रांत त्यांनां प्रकृतीची काळजी घेण्यासाठीं लिहा. त्यांची जेवण्याची सोय नीट नसते त्याबद्दल तुम्हांस जे दुःख वाटतें तें त्यांना दिसूं द्या. आणि एखाद्या दिवशी त्यांनीं आजारी पडल्याची बातमी दिली म्हणजे चटकन त्यांच्या गांवीं समाचाराठीं किंवा शुश्रूषेसाठीं जा. वैजनाथशास्त्र्यांस लोक विद्वान् म्हणतील पण त्यांच्या नित्य जेवणाची सोय कोठें होत नाहीं हें त्यांस ठाऊकच आहे. अशा वेळेस तुम्हीं त्यांच्यासाठीं इतकी फिकीर दाखवितां तिचा परिणाम त्यांच्या मनावर झाल्याशिवाय रहाणार नाहीं.”

प्रियंवदेचा हा अनुभवपूर्ण सल्ला शारदाबाईनीं ऐकला काय ? तो सल्ला वैजनाथशास्त्र्यासारख्या व्यक्तीच्या बाबतींत उपयोगी पडला काय तें पाहूं.

---

## प्रकरण २१ वें

# वैजनाथशास्त्री

वैजनाथशास्त्री धुळयाचे हे केवळ नावाखातरच होते. त्याचे कॉलेजचें शिक्षण झाल्यानंतर जे बरीच वर्षे पुणें व मुंबई येथेच असत. पुण्यातल्या एका स्वार्थत्यागी शिक्षण संस्थेंत त्यांनीं वर्ष-सहा-महिने नोकरी केली होती पण तेथें देखील त्यांची वागणूक स्वैरपणाची होती. वचक जबरा असे. इतर मास्तर-मंडळींत फारसें न मिळणारे असें ते त्यावेळेसच होते, आणि याचे कारण शिक्षक-वर्ग पोटभरू आहे, ज्ञानसंवर्धक नाहीं अशी त्याची समजूत होती हें होते. त्यांनां आपण इतरांपेक्षां उच्च आहों ही भावना फार लहानपणापासून असे. त्यांचें इतिहासशास्त्रज्ञ म्हणून नांव होण्यापूर्वी देखील आपण इतरापेक्षा शहाणे आहोंत म्हणून त्यांनां भावना असे. ते कॉलेजांत असतां गणितें तर त्यांनीं अनेकदां अशी सोडविलीं कीं प्रोफेसरला सोडविता आलीं नाहींत. एवढेंच नव्हे तर त्यांच्या यूरोपियन प्रोफेसरला त्यांच्याइतक्या मार्मिकपणानें इंग्रजी कविता वाचतां येत नाहीं असें त्यांस वाटत असे.

इंग्रज प्रोफेसरास इंग्रजी भाषा तरी आपल्याइतकी समजते किंवा नाहीं असा संशय त्यांस येत असे. पाणिनि ज्याला समजला त्याला व्याकरणशास्त्र समजलें, आणि त्यानें तें शास्त्र इंग्रजी भाषेच्या अभ्यासाला लावलें म्हणजे तो अभ्यासक सध्याच्या गचाळ इंग्रज प्रोफेसरापेक्षां खात्रीनें अधिक जाणता होईल; आणि ज्याअर्थी वैजनाथशास्त्र्यांस पाणिनीनें वापरलेलें व्याकरणशास्त्र अधिक समजत आहे त्याअर्थी त्यांस त्यांच्या इंग्रज प्रोफेसरापेक्षा इंग्रजी भाषेचें व्याकरण अधिक समजतें असें ते समजत.

वैजनाथशास्त्री बी. ए. जरी झाले होते, तरी त्यांस शास्त्रीबोवा म्हणत. आणि याचें कारण त्यावेळेस कॉलेजमध्यें जाण्यापूर्वीच त्यांना कोणी चेष्टेने शास्त्री-बोवा हें उपपद लावलें होते आणि तें पुढें चालू राहिलें; आणि त्यांस तीच पदवी अधिक आवडे. त्यांचें लग्न झालें होतें. पण त्यांची पत्नी त्यांच्या

वयाच्या पंचवीसाव्या वर्षीच वारली. पत्नीच्या शेवटच्या दिवसांत त्यांनीं तिची काळजी फारच ममतेनें घेतली असा त्यांच्यावर आरोप आहे. तसेंच ते आपल्या पहिल्या पत्नीस फार प्रेमानें वागवीत होते असें 'मूर्ख' लोक म्हणतात. पण तें शक्यच नव्हतें. शास्त्रीबोवासारख्या इतिहास भक्तास स्त्रीवर प्रेम करण्या-इतक्या हलक्या कोटींतले ठरविण्याचा कोणा तरी पाजी लोकांचा हा नीच प्रयत्न असला पाहिजे !! एवढें खरें कीं त्याची पत्नी जेव्हा वारली तेव्हां 'मी आतां स्वतंत्र झालों' असें त्यांनीं स्वतः उद्गार काढले होते. ते विधुर झाले; तेव्हां आतां तुम्ही दुसरें लग्न करा म्हणून ज्यांनीं त्यांनां उपदेश केला त्यांस 'तूं गाढव आहेस, तुला दुसऱ्यांच्या पंचायती कशाला पाहिजेत?' म्हणून त्यांची त्यांनीं संभावना केली; शास्त्रीबोवांचें उपजीविकेचें साधन निश्चित असें कांहींच दिसत नव्हते; त्यामुळें मुलींच्या बापांनीं त्यास आग्रहहि केला नाहीं, आणि त्यामुळें त्यांची पुढील विधुरावस्था सक्तीची होती किंवा खुशीची होती हेंहि सांगतां येत नाही. त्यांस ती गैरसोयीची वाटत होती हें खरें, पण लग्न केलें तर बायको आपला किती तरी वेळ घरगुती गोष्टीकडेच लावील याची त्यांस धास्ती वाटे. त्यांची पैशाच्या दृष्टीनें 'गैरसोय' नेहेमीं होतीच पण त्यांची शरीरप्रकृति मूळचीच कणखर असल्यामुळे ते अनेक अपेष्टांतून देखील जिवंत राहिले.

वैजनाथशास्त्री यांचा आणि शारदाबाईचा विवाह झाला किंवा नाहीं या विषयींची उत्कंठा पुष्कळांनां लागली असेलच. वाचकांनां ताटकळत ठेवण्याचें आम्हांस कारण नाहीं. शारदाबाई व वैजनाथशास्त्री यांचा पत्रव्यवहार अनेक अनेक वर्षे चालू होता. शास्त्रीबोवा धुळयास होते, हातानें स्वयंपाक करतां करतां कंटाळले. स्टोव्ह, कुकर, केवळ दुधावर रहाण्याची पद्धति, केवळ फळें खाऊन रहाणें, या सर्व क्रिया करून कंटाळले. त्यांनां कधीं स्वयंपाकाला बाईही ठेवतां येईना. बाई सड्या मनुष्याकडे स्वयंपाकास राहिली तर सर्व गांवभर चेष्टा होणार आणि पुण्याचे इतिहासविषयावरचे टीकाकार 'अस्त्रायफट बाई स्वयंपाकाला ठेवणारे वैजनाथशास्त्री' असा उल्लेख करून त्यांचें इतिहाससिद्धांत

खोडून काढणार, आणि तसा उल्लेख करतांना ' स्वयंपाकाला ' या शब्दावर खोंच देण्यासाठीं तो शब्द उलट्या स्वल्पविरामात लिहिणार इत्यादि गोष्टी वैजनाथ-शास्त्र्यांस दिसूं लागल्या; आणि शेवटीं आपल्या जेवणाची चागली सोय असल्या-शिवाय इतिहाससंशोधन अशक्य आहे ही गोष्ट त्याच्या लक्षात चांगल्या तऱ्हेनें आली. आपल्याला कोणी नाहीं, आपली फिकीर कोणी बाळगीत नाहीं, आपली किंमत जगास कळत नाहीं अशी जगाविरुद्ध त्याचीं तक्रार होतीच. शास्त्रीबोवास आपल्या कर्तृत्वाविषयीं गर्व वाटत होता हा केवळ जनप्रवाद आहे. शास्त्रीबोवांस इतिहाससंबद्ध अनेक शास्त्राचे ज्ञान होते. मानवेतिहास, मानव-वंशशास्त्र, समाजशास्त्र, राजनीतिशास्त्र, प्राचीन लिपिशास्त्र ही शास्त्रे ज्या प्रमाणें अवगत होतीं त्याप्रमाणेंच भोंवतालच्या समाजाचेंहि त्यास ज्ञान होतें. भोंवतालचे लोक केवळ क्षुद्र जीव आहेत, त्याना समाजात प्रगतीचा अभाव आहे याची लाज नाहीं, आणि अशा आधुनिक जगांत शास्त्राची काळजी बाळगणारे, देशाच्या पारतंत्र्याबद्दल लाज वाटणारे असे आपण एकटेच आहोत ही वस्तुस्थिति आहे अशी त्यांची पक्की खात्री झाली होती. भोंवतालचा लोक-समाज आणि शास्त्रीबोवा या दोघामध्यें जे हें अंतर आहे त्याच्या ज्ञानास, म्हणजे केवळ समाजशास्त्रीय ज्ञानाच्या या अल्प अंशास भोवतालचे अज्ञामी लोक ' गर्व ' म्हणतात, हा केवळ अवलोकन दृष्टीनें उत्पन्न झालेला ' भाषाभेद ' आहे असें त्यांस वाटत होतें. आपली खरी किंमत जगास कोठे कळणार? सध्याचे सुशिक्षित महाराष्ट्रीय म्हणजे निव्वळ कारकून आहेत; प्रोफेसर तर इतके क्षुद्र जंतू आहेत कीं, त्यांस ज्ञानश्रद्धा म्हणजे काय हेंहि कांहीं कळत नाहीं. आपला अधिकार म्हंटला म्हणजे बाजीराव, बाळाजी बाजीराव, मल्हारराव होळकर याचे कार्य पाहून त्याच्यावर न्यायाधिशी मत देण्याची आपली योग्यता. पाणिनीस संस्कृत भाषेचें व्याकरण बरोबर सांगतां आलें आहे किंवा नाहीं हें आपण तपाशीत बसणार आणि भोंवतालचे लोक फाटक्या कलेक्टरच्या हाता-खालीं कारकुनी करून जे रावबहादुर झाले आहेत त्यांनां मोठे म्हणण्याइतके मूर्ख आहेत. आपण आपलें कार्य जें कार्य चालू ठेवावयाचें तें भोंवतालच्या

मूर्ख जगासाठीं नव्हे. भोंवतालचे लोक विद्वान ग्रंथकार कोणाला म्हणणार कीं शाळाखात्यानें ज्याची पुस्तकें मंजूर केलीं आहेत अशा मनुष्याला, आणि त्यांत देखील लोकांची बुद्धि ज्ञानविकासाच्या दृष्टीनें तयार झालेली नाहीं. शाळाखात्याच्याच लोकांची तरी शास्त्रीय वाढ झाली आहे किंवा नाहीं, हें पहाण्याच्या दृष्टीनें पुस्तकाकडे पहाण्याइतकी कोठें अक्कल वाढली आहे, तर शाळाखात्याच्या मतास किंमत द्यावी? एखादा रडका शाळा मास्तर व्याकरणाचें चोपडें तयार करून शाळाखात्याकडे गेला आणि त्यानें खुशामत चागली केली तर त्याचें व्याकरण पास होणार. त्या मास्तरला व्याकरण थोडें तरी येत आहे किंवा नाहीं हें शाळाखात्याचे देशी अधिकारी किंवा खात्याशीं दोस्ती लावून महत्त्व पावलेले आपले लोक व्याकरणाविषयींच विचार करून न ठरवितां त्याचे पुनर्विवाहावर मत काय आहे याची चौकशी करून ठरविणार!! इंग्रज शाळाखात्याचे अधिकारी म्हणजे तेथले देव. तेच अगोदर शास्त्रीय ज्ञानाच्या दृष्टीनें कुचकामाचें, आणि त्यानीं आपल्यातलें 'कोणते लोक विद्वान' हें ठरवून माणसाची किंमत करावयाची! आणि त्यांच्या प्रसंशेला लोकांनीं मान द्यावयाचा. येणेंप्रमाणें लोकमान्यता हा सर्व मूर्खपणाचा बाजार आहे आणि ती लोकमान्यता खरेदी करूं पाहणारे अगदीं मूर्ख आहेत, असें वैजनाथशास्त्र्यास वाटत होतें. शास्त्रीबोवांस सर्व लोकाच्या मतांविषयीं तुच्छता जरी वाटत होती तरी त्याबरोबर आपली खरी योग्यता लोकास जरी समजत नाहीं याबद्दल रागहि येत होता. शास्त्रीबोवांस खाण्यापिण्याची जेव्हा अडचण अनेक तऱ्हेनें भासूं लागली, तेव्हां आपणच लग्न करून आपली व्यवस्था लागली पाहिजे असाहि विचार त्यांच्या मनांत उत्पन्न झाला, आणि त्याच विचाराचे पर्यवसान शारदाबाईशीं पुनर्विवाहांत झालें. तथापि दुर्बल लोकांच्या मनांत ज्याप्रमाणें स्त्रीप्रेम उत्पन्न होतें त्याप्रमाणें आपली स्थिति नाहीं. शारदाबाईबरोबर गप्पा मारण्यांत ती योग्य सहचरी आहे, तिच्याशीं गप्पा मारण्यांत त्यांस आनंद होतो या गोष्टी खऱ्या आहेत, पण त्याकरितां लग्न कशाला करायला पाहिजे? शारदा बरोबर असली म्हणजे झालें; पण शारदाबाई बरोबर असूं देण्यानें आपण

मूर्ख लोकांच्या टीकेला कारण होऊं, याकरितांच ते लग्नाला आणि पुनर्विवाहाला तयार झाले असें त्यांनीं एकदोन मंडळीस सागून टाकिलें; आणि तें देखील अशांस कीं ज्यांच्यामार्फत ते गांवभर पसरेल. शास्त्रीबोवानां खरोखर लग्नाची मुळींच जरूर नव्हती. आणि पुनर्विवाहाची त्याहून तर नव्हती. जर कोणी सुधारकांनी आपण त्यांच्यांतलें आहों असें समजून अभिनंदनाची पत्रें पाठविलीं तर तीं पत्रें फाडून टाकण्याचें त्यानीं ठरविलें.

दोघांचा पुनर्विवाह झाल्यानंतर वर्तमानपत्रांतून त्यासंबंधानें अभिनंदनपर उल्लेख आले, तेव्हां वैजनाथशास्त्री म्हणाले कीं, "लोक कसे" 'मूर्ख' आहेत. वररुची आणि हेमचंद्र यांच्या प्राकृत भाषेंत जे फरक आहेत ते भिन्नकालमूलक आहेत कीं भिन्नस्थानमूलक आहेत याविषयींच्या माझ्या शोधाचे महत्त्व या लोकांनां नाहीं; आंध्रकालीन प्राकृत अंकित लेखांत द्विवचनांची राहिलेली उदाहरणें मी शोधून काढली, त्याची यास किंमत नाहीं; आणि माझी दुसरी बायको ही कुमारी नसून विधवा होती याचेंच महत्त्व यांना आहे."

शारदाबाई हंसून म्हणाल्या "बायकोमुळेंच प्रसिद्धिविषय झाल्यास त्याचा पुरुषांस राग येणें स्वाभाविक आहे. पण अगोदरच जो मनुष्य प्रसिद्ध आहे, त्याच्या विवाहाचा उल्लेख झाला तर हा गौरव पुरुषाचा नसून बायकोचा आहे. माझा गौरव या नात्यानें झाल्यास त्यात कांहीं वावगें आहे काय?"

"लग्नानंतर प्रेम, प्रेमानंतर भांडण हा संसारातला क्रम असतो तर भांडण्यास सुरुवात आजच करावयाची काय?"

"सुरुवात तर कालच झाली पुस्तके जुळवितांना –" शारदाबाई म्हणाल्या. तें अगदीं खरें होतें. लग्नाचा पहिला परिणाम असा झाला कीं, दोघांची पुस्तकें एकत्र झाली. पुस्तकें एकत्र करतांना संयुक्त ग्रंथालयांत कांहीं पुस्तकांच्या दोन प्रती झाल्या असें दिसलें तेव्हा कोणाची पुस्तकें देऊन टाकावीत याविषयीं कडाक्याचा वाद झाला होता, आणि शारदाबाईनीं आपण वाचलेलीं व खुणा केलेलीं पुस्तकें गमवायाला तयार नाहीं हें त्यांनीं स्पष्ट सांगितलें होतें.

गोंडवनांतील प्रियंवदा व घरकुट्टे घराण्याचा इतिहास यांचा आपल्या आयुष्यक्रमावर काय परिणाम झाला याची पूर्ण कल्पना इतिहास संशोधक वैजनाथशास्त्री यांस तरी असेल काय अशी चर्चा त्यावेळेस बर्डीवरच्या कांहीं थोड्या मंडळींत झाली.

---

## प्रकरण २२ वें

# प्रियंवदा आणि पुतळी

डायमंड ज्युबिलीनंतर थोड्याच महिन्यानीं रामभाऊ बॅरिस्टर होऊन परत आला. त्याबरोबरच मध्यप्रांतातील 'काकाजी' आडनावाचा एक पारशी विद्यार्थीहि बॅरिस्टर होऊन आला होता. दोघेहि एकाच वेळेस नागपूरला बॅरिस्टरीच्या पटावर नोंदले गेले.

रामभाऊ परत आल्यानंतर प्रियंवदेस आनंद झाला हें काय सांगावयास पाहिजे ? तथापि इतर लोकांना जो फरक दिसला तो हा कीं, प्रियंवदा स्त्री-स्वातंत्र्य, स्त्रियाचे हक्क, पुरुषी धर्मशास्त्र इत्यादि विषयांवर बोलण्यास अजिबात विसरून गेली. ती इतकी कीं तिचीं मतें काय होतीं याचीहि पुढें लोकानांच काय पण प्रत्यक्ष तिलाच आठवण नाहींशी झाली. आणि ती सार्वजनिक आयुष्यक्रमांत पुढें कधींच आली नाहीं. तिला मुलें झालीं, आणि आपलीं मुलें इतर मुलापेक्षां किती टवटवीत आणि स्वच्छ आहेत एवढेंच दाखविण्यांत तिला आनंद वाटे. दिनकर भावोजींचें लग्न लवकरच झालें. त्यावेळेस तिनें आग्रह एवढाच धरला कीं नवराबायकोनीं एकमेकांशीं बोलतांना लाज धरावयाची नाहीं, आणि यासाठीं तिनें दोघांसहि तुम्ही महिनाभर माझ्या दादाच्या घरीं पाहुणे म्हणून रहा असा आग्रह धरला. आपल्या धाकट्या जावेस असें बजावलें कीं 'दिनकर भावोजी कविता करणारे आहेत, त्यांची कविता अधिक झोंकांत व्हावी अशी तुझी इच्छा असेल तर स्त्रीच्या प्रेमाचें केवळ कल्पनेनें वर्णन करण्याचा प्रसंग त्याच्यावर येऊं देऊं नका.'

पुतळी पेनांगवाला ही जर कादंबरीची नायिका असती तर तिची कथा सविस्तर लिहिण्याइतकी मनोरंजक झाली असती. बंडुनाना मधून मधून पेनांगवाला शेटजींच्या घरीं जाऊं लागले तेव्हां प्रथम तिचें मन बंडुनानांवर जडलें. पण पुढें कांहीं दिवसांनी एका बॅंडवाल्यावर प्रेम जडून ती बंडुनानांस भेटण्याचेंहि टाळूं लागली. तिला कोणते तरुण केव्हां आवडूं लागतील आणि केव्हा नकोसे होतील याचा नेमच नसे. ती प्रियंवदेकडे येई तेव्हा ती खरोखर दिनकर भावोजींशी बोलण्यास येत आहे काय, तिचें त्यावर प्रेम जडलें आहे काय, असा प्रियंवदेस संशय आला होता आणि या सर्व गोष्टी पाहून पेनागवाला शेटजींस मजा वाटत असे. सुस्वभावी, पण स्वतंत्र आणि भावनाप्रिय अशा मुलीची संगति त्याना फारच आवडूं लागली होती. त्यांना ठाऊक होतें कीं, ही अल्लड मुलगी अनेकदां प्रेमांत पडेल आणि प्रमातून बाहेर पडेल. पुतळी जेव्हां वयानें पंचविशीच्या जवळ जवळ येऊं लागली तेव्हा तिच्या हृदयांतली खळबळ बरीच निवळली आणि ती आयुष्याकडे अधिक विचारपूर्वक पाहूं लागली. तिच्याशीं लग्न लावण्यास तयार असे तिच्या जातीचेच पुष्कळ लोक होते. पुढें एक पारशी तरुण बॅरिस्टर होऊन मध्यप्रातांतच ई. ए. सी झाला. तेव्हां त्याच्याशी मिस पेनागवालाचें लग्न झालें. त्यानें ( मि. काकाजी यानीं ) पुढें ई. ए. सी. ची नोकरी सोडून देऊन बॅरिस्टरी पुन्हा पत्करली. आणि ते बॅरिस्टर पुढें बरेच नांवारूपाला आले. मिसेस काकाजी पुढें हुशार होस्टेस म्हणून नागपुरांत प्रसिद्ध झाली. आतां पुरंध्रीच्या वाढलेल्या प्रौढपणामुळेच मिसेस काकाजी आपण एका बॅंडवाल्यावर प्रेम कसें करीत होतों, आपलें प्रेम एका ब्राह्मणावर कसें जडलें होतें इत्यादि गोष्टी सांगून लोकांची बरीच करमणूक करतात, आणि मि. काकाजी देखील त्या गोष्टी मोठ्या मौजेनें ऐकतात. त्यांनां असें वाटतें कीं इतक्या जास्त लोकांवर प्रेम करून पुतळी शेवटीं आपल्याकडे आली त्या अर्थी आपली श्रेष्ठता सहजच सिद्ध झाली. पण ते कधीं कधीं मिसेसला म्हणतात कीं ‘ असें फारसें मुलामुलींच्या देखत बोलत जाऊं नको, कारण मुलांची व मुलींची पारशी जातीच्या बाहेर लग्न करण्याची प्रवृत्ति झाली तर त्या

प्रवृत्तिला तुझ्या प्रेमकथांनीं उत्तेजन मिळेल.' मिसेस काकाजी उत्तर करते, 'छे! अशी गोष्ट मुळींच होणार नाहीं. मुलींच्या मनांत प्रेमाचे खेळ हे त्या पंधरा वर्षांच्या असतांनाच सुरू व्हावयाचे. ते मग त्या आईबापांनां किंवा दुसऱ्या कोणाला कळवोत अगर न कळवोत. भोंवतालीं जीं तरुण माणसें असतील त्यांवर त्यांचे प्रेम जडायचें, आणि प्रथम दिसतात त्यापेक्षां अधिक योग्यतेचीं माणसें दिसलीं म्हणजे तें उडायचें, हा क्रम चालूच रहावयाचा. पुष्कळ पारशी बायका आपला दिल खोलून बोलायला लागल्या तर त्या माझाच अनुभव सांगतील. पण त्यांचें लग्न कोठें जातीच्या बाहेर झालें आहे? लग्नाचें दिवस आले म्हणजे आपल्या योग्यतेचें कोण आहे, आपल्या रहाणीसारखी रहाणी कोणाची आहे असले विचार येतील आणि मग त्या मुली पुढें पारशाशींच लग्न लावतील.'

या तऱ्हेनें मिसेस काकाजी बोलायला लागली म्हणजे आपणांपेक्षां मनुष्यस्वभावाविषयीं ती कांहीं अधिक जाणते असें काकाजीस वाटे आणि तेहि उत्तर देत कीं 'मी पैशाचा कायदा शिकलों आहे, पण प्रेमाचा कायदा कुठें शिकलों आहे!'

प्रियंवदा आणि पुतळी या दोघींचेहि पती बॅरिस्टर, आणि सारख्याच उत्पन्नाचे, आणि त्यामुळें जवळ जवळ सारखेच पुढें आलेले. 'ज्युडिशरी' मध्यें दोघेहि प्रसिद्ध होते, व दोघांनींहि पैसे चांगले मिळविलेले. यामुळें दोघानाहि समाजांत बरेंच प्रामुख्य आलें होतें. पण पुतळी जितकी पोषाखाच्या बाबतींत बरीचशी वाढत्या अभिरुचीची झाली होती तितकी प्रियंवदा नव्हती, व त्यामुळें आणि ब्राह्मणी आयुष्यक्रमात उत्पन्न झालेल्या खाद्यपेयांच्या निर्बंधामुळें प्रियंवदा सिव्हिल लाईनमधल्या स्वागत करण्यांत कुशल अशा स्त्रीवर्गात झळकली नाहीं. तथापि तिची उपयुक्तता नागपुरास कमी झाली नाहीं. हिंदु स्त्रिया ज्या घरांत वाटेल तेव्हां जातील, नवीन मराठी कादंबरी कोणती निघाली आहे, आणि कोणतें नाटक कसें आहे इत्यादि गोष्टींची चर्चा करतील असें स्थान तिचें गृह झालें होतें. तिची उपयुक्तता हिंदु पुरुषांस देखील मान्य होई. हळदी-कुंकुवाच्या प्रसंगीं गावांतील वकील लोकांस फराळास बोलावणें इत्यादि स्वागताचें

प्रकार करण्यांत ती आपली कुशलता दाखवी. ज्याचें स्वागत करावें असा वर्ग दोघींच्या बाबतींत निरनिराळा होता. दोघींनाहि त्याची स्तुति करणारा वर्ग लाभला होता पण तो निरनिराळया वर्गांत होता. प्रियंवदेच्या स्तुति करणाऱ्या वर्गांत मि. काकाजी होते, तर पुतळीची तारीफ करण्याऱ्या वर्गांत रामभाऊहि कधीं कधीं असत. कधीं काकाजी बॅरिस्टरला 'इलेक्शनला' उभे रहावयाचें मनांत आलें म्हणजे सामान्य हिंदूंचें स्वागत करण्यास तयार अशा प्रियंवदेच्या नवऱ्याचा मत्सर उत्पन्न होई, आणि तिचे उदाहरण तो पुतळीस देई. पण इंग्रजी तऱ्हेची भोजनपद्धति अधिक परिचित असलेल्या पुतळीच्या नवऱ्याला सरकारी अधिकाऱ्यांस घरीं जेवावयास बोलविण्यास अधिक संधि मिळते याबद्दल रामभाऊस देखील पुतळीच्या नवऱ्याचा मत्सर होई. पुतळी कधीं कधीं प्रियंवदेस म्हणे कीं, 'नवरे आपल्या घरच्या बायकावर कधीं संतुष्ट नसतात, त्यांनां आपल्या बायकोपेक्षा दुसऱ्याची बायको अधिक चांगली आहे असें वाटतें.'

---

प्रकरण २३ वें

## भोंसले विजय मिल्स–उपसंहार

हा घरकुट्टे घराण्याचा इतिहास इतक्यांतच कसा संपेल? बंडुनानास तर मुलें झालीं आहेत आणि त्यामुळें घरकुट्टे घराणें अधिक चिरंजीवी झालें आहे. सौ. बिंबाबाई मोघे यांचा जरी अनंतरावास सपाटून राग आला होता तरी तिला कोर्टांत खेंचून तिची फजीति करावयाची हें, स्वाभाविक पितृवात्सल्य जागृत झाल्यामुळें म्हणा झालें नाहीं किंवा हरिहरराव तांबडे यांचें दुसरें आप्त हरिहररावाचा मुलगा वारल्यास आपण इस्टेटीचे मालक होऊं इत्यादि भाषा बोलूं लागले म्हणून म्हणा, किंवा आपण पूर्वी पुनर्विवाहातर्फेचें व्याख्यान दिलें होतें तें बिंबाबाईचे वकील बाहेर काढतील या धास्तीमुळें म्हणा, किंवा आपलें शरीर

खंगत चाललें आतां आपणांस जास्त काम करतां येत नाहीं या प्रकाराची जाणीव होऊन म्हणा त्यानीं तें योजिलेलें कार्य सोडून दिलें. ते पुढें फार दिवस जगलेहि नाहींत.

रूपराम मारवाडयाच्या ताब्यांत मिल भाडवलाच्या अभावानें जाईल अशी धास्ती होती पण ती तशी गेली नाहीं, आणि यास रूपरामाची व्यवहार-दृष्टीच कारण होती. रूपरामाला गिरणी नको होती, पण आपल्या रकमेवर नऊ ठक्याचें व्याज नियमानें पाहिजे होतें, आणि यासाठीं त्यांनीं आपलें ऋणको डायरेक्टर म्हणून ठेविले होते. पेनांगवाला शेटजीनें घरकुट्टयांची मॅनेजरी काढून आपल्याकडे घेण्याची खटपट केली पण रूपरामनें त्यास ती मिळूं देण्याचे नाकारलें त्यास बंडुनानाच्या नेटाची व धडाडीची कल्पना असल्यामुळें त्यास कांहीं गोष्टींत सल्ला दिल्यास किंवा खरेदी विक्री त्याच्याकडून काढून घेऊन अंतर्गत व्यवस्थाच त्याच्याकडे ठेवल्यास गिरणीस फायदा पडेल, गिरणी चालू राहील, आणि आपळें व्याज चालूं राहील अशी कल्पना येऊन त्यानेंच घरकुट्टयास नेटानें पाठिंबा देण्याचें ठरविलें. आणि त्याचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं, पेनागवाला रूपरामाच्या पैशावर मधल्यामध्येंच दोनशें रुपये उपटीत होता त्यास खो मिळाला. पुढें कापसाची खरेदी व कपडयाची विक्री रूपरामानें आपल्याच ताब्यात घेतली आणि भोंसलेविजय–मिल्सचें काम सुरळीत चालू झालें. पुढच्या अनेक वर्षांत बंडुनानांचा औद्योगिक उन्नतीसाठीं खटपट करणारा म्हणून ख्याति झाली.

---



**लेखक : डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर**

एम्. ए., पीएच्. डी.

( कार्नेल युनिव्हर्सिटी, यू. एस्. ए. )

जन्म—रायपूर (म. प्र.) २ फेब्रुवारी १८८४.

मृत्यु—पुणें, १० एप्रिल १९३७.

- समाज शास्त्रज्ञ, राजशासन शास्त्रज्ञ, समाज-सुधारक, अर्थशास्त्रज्ञ, इतिहास संशोधक, राजकारणी, व्यापक दृष्टीच विद्वान महापुरुष.

- मुख्य ग्रंथ : भारतीयांच्या जातींचा इतिहास २ खंड, भारतीयांचें अर्थशास्त्र, हिंदू कायदा, भारतीयांचें समाजशास्त्र, निःशस्त्रांचें राजकारण, व्हिक्टोरियस इंडिया, महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण, प्राचीन महाराष्ट्र ( सातवाहन पर्व ) भाग २ व ३ अप्रकाशित. मराठी ज्ञानकोश प्रमुख संपादक, विद्यासेवक संपादक, माझें बारा वर्षांचें काम.

- मराठी कादंबऱ्या : गोंडवनांतील प्रियंवदा, गांवसासू, विचक्षणा, ब्राम्हणकन्या, आशावादी, परागंदा, भटक्या.

- साहित्य, टीका, वगैरे शेकडों लेख, मासिकें व वर्तमानपत्रांत लिहिले.

- सर्व देशभर प्रवास करून, समाजनिरीक्षण करून, वाङ्‌मयाचें गाढ अवगाहन करून त्यांनीं मराठी साहित्य व जीवन यांत नवयुगाचा प्रारंभ केला:—कै. राजवाडे, टिळक वगैरे महाराष्ट्राच्या विद्वत्परंपरेंतील एक अलौकिक महापुरुष.